# श्रीशिवकाव्य

-सदाशिव माणकेश्वर व दौलतराव शिंदे यांचे आश्रित पंडित
पुरुषोत्तम कवि ह्यांनीं केलेल्या संस्कृत शिवकाव्याचा
मराठींतील पद्यमय अनुवाद-

अनुवादक
कै. वासुदेव भास्कर भावे
माजी हेडमास्तर हेरलें. ता. अलतें, सं. कोल्हापूर

शक १८६५] किंमत रुपये अडीच [इ. १९४३
भा. इ. सं. मं चे सभासदांस हा ग्रंथ २ रु. स मिळेल.

# पुरस्कार

प्रस्तुत मराठी काव्य 'श्रीशिवकाव्यम्' या पुरुषोत्तम कविविरचित संस्कृत काव्याचा सुंदर अनुवाद आहे. शिवाजी महाराजापासून तों दुसऱ्या बाजीरावापर्यंतचा बखरवजा इतिहास यांत गोंविला असून उत्तर पेशवाई पाहिलेल्या एका महाराष्ट्र कवीनें पुण्यांतच तो रचिला हा यांतला विशेष आहे. या ऐतिहासिक पद्यप्रबंधांतील गुणावगुण व इतर अभ्यासाच्या बाबी पुढील प्रस्तावना आणि विवेचन यांतून सांपडतील. भा. इ. सं. मंडळाचे नाणावलेले संशोधक **श्री. शंकरराव जोशी** यांनीं विशेष परिश्रमानें पुस्तकाला जो विवेचक भाग जोडला आहे व विस्तृत पादटीपा दिल्या आहेत त्यामुळें तर त्याचें महत्त्व वाढून महाविद्यालयीन अभ्यासक्रमांत स्थान मिळविण्यायोग्य तो झाला आहे यांत शंका नाहीं.

पुरुषोत्तमपंडितजी बंदेष्टि यानें इ. स. १८२१ त हें काव्य समाप्त केल्यानंतर पुढें पांच वर्षांनी त्यावर संस्कृत टीका लिहिली. इ. स. १८५६ सालीं हा वारला. १८८४ त काव्येतिहाससंग्रहांत त्याचें श्रीशिवकाव्य छापून निघालें; व पुढील सालींच वा. भा. भावे यांनीं त्याचा मराठी अनुवाद कोल्हापुरास प्रसिद्ध केला. म्हणजे मूळ कवि दिवंगत होऊन पाव शतक लोटल्यानंतर लगेच त्याचा परामर्ष घेण्यांत आला. हें त्याचें भाग्यच समजलें पाहिजे. शिवभारतासारखे श्रेष्ठ दर्जाचे ग्रंथ जेथें शतकानुशतकें अज्ञात राहातात व अद्यापि असंशोधित असे सहस्रावधि संस्कृत-प्राकृत ग्रंथ जेथें कोठेंतरी बासनांत पेटारांत दडून आहेत तेथें पुरुषोत्तमाचें संस्कृत काव्य उजेडांत येऊन त्याचें पद्यमय मराठी भाषांतरहि व्हावें याला सुदैवच म्हणणें योग्य होईल. सुदैवाबरोबर या काव्याच्या अंगचा साहित्य गुणहि याच्या प्रसिद्धीस कारण असला पाहिजे. यांतील कांहीं श्लोक लोकांच्या तोंडीं होते व त्यामुळें याचें लवकर संशोधन झालें. भावे मास्तरांनीं काव्येतिहास संग्रहांतून हा ग्रंथ प्रसिद्ध होण्याआधींच याची उपलब्धि करून अभ्यासाला आणि अनुवादाला सुरवात केली असावी. कोल्हापुरास याच्या प्रति असल्याचा दाखला काव्येतिहास संग्रहांत आपणांस मिळतो. असो.

कोल्हापूर संस्थानांत एका खेडेगांवांत प्राथमिकशि क्षकाचें नीरस काम करीत असणाऱ्या गृहस्थास एक अज्ञात ऐतिहासिक संस्कृत काव्य सूक्ष्मरीतीनें अभ्यासण्याची बुद्धि व्हावी व असें काव्य समजून अनुवादण्याइतपत त्याच्या बुद्धीची तरतरी असावी हा एक एकविसावा 'चमत्कार' समजला पाहिजे. एरवीं असलें सुंदर, सुबोध मराठी काव्य महाराष्ट्राला मिळतें ना! या मराठी कवीनें फार समर्पक शब्दांत ऐतिहासिक स्थलांचें, व्यक्तींचें व घटनांचें वर्णन दिलें आहे. भाषा फार सुबोध व गोड आहे. वेगवेगळीं वृत्तें आणि पदांच्या चाली वापरल्यामुळें काव्य कंटाळवाणें झालेलें नाहीं. पुण्याचीं वर्णनें तर बहारीचीं वाटतील. पुण्याला अमरावतीची उपमा दिली आहे. पांथस्थ लोक "ह्या नगरींत वसावें आपण ही आस तेधवां धरिती।" याची प्रचीती आजहि येते. पानिपतच्या महा अनर्थानें नागरिकांना जें दुःख झालें त्यामुळें ळामुठा वाहूं लागली ही उत्प्रेक्षा हृद्य आहे. 'जिंकीतसे सुरपुरीसहि पर्वती तो।' या पालुपदानें केलेलें पर्वतीचें वर्णन फार मनोरम वाटेल. नाना फडणिसानें सांगितलेली 'शस्त्रास्त्र—शब्दसिद्धि' व्युत्पत्ति शास्त्रज्ञांनीं अवश्य वाचावी (हिंसार्थी तुफ् धातूपासून तोफ, दारणार्थी दृ धातूपासून दारू, ध्वन्यर्थ वण् धातूपासून बाण, बिंदुलक्ष्या ती बंदूक.) याप्रमाणें अनेक काव्यगुणदर्शक उतारे दाखवितां येतील. श्री. शं. ना. जोशी यांनीं आपल्या विवेचनांत कांहीं बाकी ठेविली नाहीं; तेव्हां अधिक वानगी देत बसत नाहीं.

पुरुषोत्तम कवीचें संस्कृत काव्य आज दुर्मिळ व बरेंच अज्ञातहि आहे. तेंहि असेंच पुन्हां प्रसिद्ध होणें अवश्य आहे. बडोदा ओरिएंटल इन्स्टिटयूट, भांडारकर ओ. सोसायटी किंवा अन्य संस्कृत प्रकाशनें काढणाऱ्या संस्थेनें हें काम हातीं घेतलें तर सहज होण्यासारखें आहे. मराठींत या शिवकाव्याचा अनुवाद व्यवस्थित प्रसिद्ध करून श्री. हरि वासुदेव भावे यांनीं नुसतें पितृऋण फेडलें असें नव्हे तर कांहीं समाजऋणहि फेडलें आहे. त्यांनीं विद्यमान निर्वाणीच्या परिस्थितींतहि मोठी झीज सोसून प्रस्तुत ग्रंथ लोकांपुढें आणला नसता तर मराठी काव्याची खचित हानि होती. या काव्याचें महत्त्व ओळखून याच्या पूर्वार्धाच्या पहिल्या आवृत्तीच्या वेळींच डे. व्ह. ट्रा. सोसायटीनें

मोठें बक्षीस दिलें व उत्तरार्धासाठींहि कवीला आश्वासन–प्रोत्साहन दिलें होतें. तथापि हा वेळगावेतों समग्र ग्रंथ निघूं शकला नाहीं. आतां सर्वांग-परिपूर्ण प्रसिद्ध होत आहे तेव्हां आश्रयदात्या संस्थांनीं व विद्वानांनीं याचें योग्य चीज करावें. शिक्षणसंस्थांनीं क्रमिक पुस्तकांच्या पंक्तींत याला बसवून विद्यार्थिजनास याची अभिरुचि द्यावी व सर्व साहित्यकांनीं या पेशवाईच्या सांवलींतील अभिजात सुंदर काव्याचें रसग्रहण करावें अशी विनंति आहे.

आम्हांस भारत इतिहास संशोधक मंडळाच्या पुरस्कृत ग्रंथमालेंत याचा समावेश करण्यास आनंद वाटत आहे.

चिंतामण गणेश कर्वे
चिटणीस,
भा. इ. सं. मंडळ, पुणें.

ज्येष्ठ शुा ३ शक १८६५

# निवेदन

'वडिलांची कीर्ति वर्धमान करतां न आली तरी ती नष्ट न होऊं देतां तिचें संरक्षण शक्य तों अगत्यपूर्वक करावें' ह्या महदुक्तीप्रमाणें आज परमपूज्य तीर्थरूप कै. वासुदेवरावजी तथा बाबा भावे यांनीं मराठींत अनुवादित केलेलें श्रीशिवकाव्य संपूर्णपणें ग्रंथरूपानें आमचेकडून प्रकाशित होत आहे ह्याबद्दल एक प्रकारें आम्हांस फार आनंद वाटत आहे. वस्तुतः ह्या शिवकाव्यग्रंथाचें प्रकाशन हें आमच्या कर्तव्यांपैकींच एक होय; तेव्हां तें केल्याबद्दल उल्लेख करण्याजोग्या आनंदाचें वास्तविक कारण नाहीं. पण कर्तव्य न केल्याबद्दल जर दुःख वाटलें पाहिजे, तर केल्याबद्दल बरें वाटणें हें सहजच आलें. शिवाय आमच्या आनंदाचें दुसरें व मुख्य कारण असें आहे.—

हा ग्रंथ तीर्थरूप विद्यमान असतां, पूर्वार्धापुरता म्हणजे टीपा, विषयानुक्रमणिका इ. विरहित नुसत्या कवितारूपानें, इ. स. १८८५ मध्यें क्षेत्र करवीर येथील ज्ञानसागर नामक शिलामुद्रणालयांत छापून प्रसिद्ध झाला होता; खरें म्हटलें तर प्रसिद्ध झाल्यासारखा झाला होता. कारण वडिलांनींच प्रस्तावनेंत लिहिलें आहे तेंच उद्धृत करून सांगतों—"हा ग्रंथ पूर्ण झाला खरा; परंतु माझ्या दारिद्र्यामुळें तो छापून प्रसिद्ध करणें कठिण आहे; हल्लीं मोठ्या प्रयासानें ह्या ५१६ प्रती काढल्या आहेत. व जे श्रीमंत, दयाळू व गुणग्राहक असे सद्गृहस्थ मला आश्रय देतील असें वाटलें त्यांकडे त्या पाठविल्या आहेत. ह्याकरितां कीं, त्यांनीं आपल्या थोरवीप्रमाणें मीं केलेल्या श्रमाकडे लक्ष देऊन द्रव्यद्वारां साह्य व्हावें. जगच्चालक प्रभु अशा गृहस्थांस मला साह्य होण्याची बुद्धि देवो,' असें मी त्यास प्रार्थितों" इ. इ. सारांश, ज्याच्या पांचसहाच प्रती मुद्रित झाल्या तो काय ग्रंथ प्रकाशित झाला म्हणावयाचा! पण आतां हा ग्रंथ पूर्वार्ध—उत्तरार्धासह, अर्थबोधक टीपांनीं युक्त, ग्रंथांतर्गत इतिहासवृत्ताविषयीं तात्त्विक प्रस्तावना व तीहि विद्वन्मान्य अधिकारी लेखकांनीं लिहिलेली, काव्यविषयक विस्तृत विवेचन जोडलेला,

ससूचिक, अनुक्रमणिका, वृत्तयादी इ. इ. संस्करणांनीं परिपूर्ण असा प्रसिद्ध होत आहे. त्यांतहि हा प्रश्न आहेच कीं, ग्रंथाच्या प्रती किती काढावयाच्या? कारण कागदाचें 'महर्घ' व दुर्मिळत्व आजही चांगलेंच जाणवत आहे- म्हणजे ६० वर्षांमागल्या इतकाच निराळ्या रूपानें पण प्रतींचा प्रश्न आजहि अवघडच होऊन बसला आहे व हें अधिक स्पष्ट करून सांगण्याचें कारण नाहीं. तात्पर्य, अशा स्थितींत आणि अशा उत्तमपणें हा ग्रंथ भावेकुलवृत्तान्तांत सांगितल्याप्रमाणें प्रसिद्ध होत आहे ही आनंदाची गोष्ट होय ह्यांत संशय नाहीं.

हेंही येथें सांगितलें पाहिजे कीं, ग्रंथाला आलेलें हें सोज्वळ रूप अनेक विद्वान् व्यासंगी मंडळींच्या साहृचामुळें आलेलें आहे. प्रथम जेव्हां हा ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याचें आमच्या मनांत आलें तेव्हां आमच्या व्यवसाय-भिन्नत्वामुळें साहजिकच विचार पडला. पण आमचे विद्वान् सुहृद श्री. आचार्य वि. प्र. लिमये ह्यांजपाशीं ही गोष्ट काढतांच त्यांनीं मनावर घेतलें व सर्व काम मार्गी लागलें. त्यांनीं लगेच मूळ हस्तलिखित मागितलें. आमचे जवळ फक्त उत्तरार्धच होता. कारण तो छापावयाचाच राहिला होता आणि पूर्वार्ध वर लिहिल्याप्रमाणें मुद्रित (!) झाला असल्यामुळें त्याची हस्तलिखित प्रत असण्याचें तादृश कारण नव्हतें व मुद्रितही प्रत आमचे संग्रहीं नव्हती. मग ६।१२।१९३२ च्या 'केसरीं'त प्रकट विनंति करून कोणाजवळ पूर्वार्धाची प्रत असल्यास ती मागविली. तों एक प्रत सुदैवानें तीर्थरूपांचे ऋणानुबंधी स्नेही श्री. भाऊ गोविंद कर्णेकर मास्तर मंगळवेढें यांजकडून हातीं आली. मग हें संपूर्ण काव्य वर म्हटल्याप्रमाणें श्री. लिमये यांनीं नेऊन तें भा. इ. सं. मं. चे एक कार्यकर्ते, प्रसिद्ध इतिहास संशोधक श्री. शंकरराव जोशी यांजकडे सुपूर्त केलें. व आज सर्वांगसुंदर होऊन तें वाचकांच्या हातीं देतां येत आहे. ग्रंथाला श्री. द. वि. आपटे यांनीं प्रस्तावना लिहिली आहे. इतकेंच सांगितलें म्हणजे पुस्तकाचें महत्त्व व उपयुक्तता निराळी सांगू पहाण्याचें कारण नाहीं. श्री. आपटे ह्यांचा ह्या विषयांतील अधिकार फार थोर आहे. तसेंच ग्रंथास जोडलेलें शिवकाव्यविवेचन व टीपा विख्यात भाषापंडित श्री. गो. कृ. मोडकशास्त्री ह्यांचे साहाय्यानें श्री. शंकरराव जोशी ह्यांनीं केलें आहे. ग्रंथाचें इतर सर्व कामही श्री. जोशी ह्यांनींच उरकलें आहे. जोशी यांनीं ह्या कामीं फार परिश्रम घेतले आहेत.

आमचें मनांत श्री. लिमये यांचेही दोन शब्द ह्या ग्रंथांत यावें असें होतें. पण आज ते परकीय आंग्ल सरकारचे पाहुणे झाले असल्यामुळें अशक्य आहे. हा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा मध्यंतरीं एकदां प्रयत्न आमचे वडील बंधू ती.रा. शंकरराव यांनीं एकदां केला होता; ४८ पृष्ठें म्ह. चमत्कार ६ पर्यंतचा कांहीं भाग मुद्रित झाला होता. पण तें काम तेव्हां द्रव्याभावीं अपुरेंच राहिलें. पूर्वार्धाचे वेळीं डे. व्ह. ट्र. सो. नें मोठें बक्षीस देऊन शिवाय उत्तरार्धासाठीं स्वतंत्र प्रोत्साहकपत्र पाठविलें होतें व म्हणून तीर्थरूपांनीं उत्तरार्ध पुरा करून तो कमेटीकडे पाठविला. त्यांजकडून तो कांहीं दुरुस्त्या सुचवून परत छपाईसाठीं आला. पण मुद्रित होऊन ग्रंथ प्रकाशित होण्याचे पूर्वीं तीर्थरूपांचा स्वर्गवास घडला.

हें शिवकाव्य मूळ संस्कृतासह छापलें असतें तर अधिकच उत्तम झालें असतें. कारण तें प्रस्तुत दुर्मिळ आहे. पण मूळ छापावयाचें म्हणजे काव्य व त्यावरील टीका हीं दोन्ही छापणें इष्ट. कारण पुरुषोत्तम कवींनींच आपल्या काव्यावर टीका लिहिलेली आहे. तात्पर्य, मूळ म्हणजे दोन्ही व त्यांसह हा अनुवाद छापणें हें उघडच आम्हांस अशक्य. शिवाय ह्या आवृत्तीवरून त्याची आवश्यकता दिसून आल्यास पुढील आवृत्ती मूळासह काढण्याचें पाहूं. असो. तीर्थरूपांच्या आशीर्वादानें त्यांच्याच वार्षिक स्मृतिदिनीं हें शिवकाव्य महाराष्ट्र वाचकांच्या हातीं पडत आहे हाही एक योगच आहे. शेवटीं पुणें भा. इ. सं. मंडळानें हा ग्रंथ आपल्या पुरस्कृत ग्रंथमालेंत अंतर्भूत केला ह्याबद्दल त्या संस्थेचे, लोकसंग्रह छापखान्याचे व वरील सर्वांचे नम्रपणें आभार मानून नि आमच्या ह्यावेळच्या प्रकाशनाला महाराष्ट्रीय जनता उदार आश्रय देईल ही आशा व्यक्त करून व 'ती पूर्ण राघव करो मज तो न शक्ती' (पृ. ४ पद्य ९), एवढें सांगून निवेदन पुरें करतों.

हरि वासुदेव भावे
सांगली.

# प्रस्तावना

पुरुषोत्तम-कविकृत 'श्री-शिवकाव्य' हा संस्कृत ग्रंथ पेशवाई संपल्या-नंतर ४ वर्षांनीं म्हणजे शक १७४३ मध्यें लिहून पुरा झाला; तो त्यानंतर सुमारें ६० वर्षांनीं (शक १८०६मध्यें) काव्येतिहाससंग्रह मासिकांत छापण्यांत आला. त्याचें मराठी भाषांतर प्रसिद्ध करण्याचा योग आज त्यानंतर ६० वर्षांनीं येत आहे. संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध झाल्यानंतर त्याची माहिती मराठी वाचकांना करून देण्याचें काम आपण करावें असें रा. भावे यांच्या मनांत आलें व दोनहि भाषांचें आवश्यक ज्ञान त्यांना असल्यामुळें त्यांनीं मराठी पद्यमय भाषांतर लिहून ठेवण्याचें काम कित्येक वर्षांपूर्वी केलें; पण तें लेखी भाषांतर बरींच वर्षें पडून राहिलें होतें; आतां तें त्यांच्या वंशजांकडून पितृऋण फेडण्याच्या बुद्धीनें प्रसिद्ध होत आहे. इतिहास हा विषय महाराष्ट्रांत अनेक लोकांच्या अंतःकरणांत जिज्ञासा व कर्तव्य-बुद्धि जागृत ठेवण्यास कारणीभूत झाला आहे; त्यांतलेंच हेंहि एक उदाहरण आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. असलेलें स्वराज्य ज्याच्या दृष्टीसमोर नष्ट झालें त्या पुरुषोत्तम कवीला इतिहासाची काय माहिती होती व त्याचें इतिहासविषयक तत्त्वज्ञान काय होतें हें आजच्या स्वराज्यवादी काळांतल्या लोकांना या ग्रंथाच्या प्रकाशनानें वाचण्यास मिळत आहे; तें त्यांच्या मनांत विचारजागृति करण्यास अंशतः तरी उपयोगी पडेल यांत शंका नाहीं.

आजच्या वाचकांच्या ऐतिहासिक जिज्ञासेची तृप्ति हा ग्रंथ करील असें न म्हणतां तो त्यांच्या विचारास चालना देईल असें येथें म्हटलें; त्याचें कारण ऐतिहासिक जिज्ञासेच्या बाबतींत गेल्या १२५ वर्षांत महाराष्ट्रांत फार अंतर पडलें आहे. शिवकाव्य हें ज्या परिस्थितींत लिहिलें गेलें ती परिस्थिति आजच्याहून इतकी निराळी होती कीं, ती लक्षांत न घेतां हें काव्य वाचूं लागल्यास कवीच्या विचारसरणीबद्दल वाचकांचें मन गोंधळून जाण्याचा संभव आहे. यासाठीं हें काव्य रचणाऱ्या पुरुषोत्तम-कवीचा वृत्तान्त थोडक्यांत सांगणें अवश्य दिसतें.

हा कवि वत्सगोत्री व माध्यंदिनशाखाध्यायी असून त्याचें उपनांव बंदेष्टी असें होतें. अहमदनगर जिल्ह्यांतील 'पेडगांव' या गांवीं त्याचा जन्म, माधवराव बल्लाळाच्या कारकीर्दीत, शक १६८८ (इ. स. १७६६)-मध्यें झाला. नंतर सातारा प्रांतांतील इस्लामपूर गांवीं त्यानें १२ वर्षेपर्यंत वेदशास्त्राध्ययन केलें. नंतर वयाच्या १९ व्या वर्षी सातारा दरबारांत त्यानें पुराण सांगून वाहवा मिळविली व त्याला दरमहा ५० रुपयांची नेमणूक झाली होती. पुढें पेडगांवास येऊन त्यानें लग्न केलें व तेथें तो कांहीं वर्षे रहात होता. तो नंतर सुप्रसिद्ध रणभूमि 'खरडे' या गांवीं १२ वर्षे राहिला असें त्याच्या काव्यांतील एका उल्लेखावरून दिसतें. तो व्याकरण, न्याय, मीमांसा, ज्योतिष, धर्मशास्त्र इत्यादि विषयांत निष्णात असल्यामुळें त्याचा प्रवेश तत्कालीन दरबारांतील विद्वत्सभेंत होण्यास अडचण पडली नाहीं. धाकट्या बाजीरावाच्या वेळीं सदाशिव माणकेश्वर हा अधिकारावर असतां पुरुषोत्तम कवि पेडगांव येथें त्याच्या भेटीस गेला. तेव्हां सदाशिवानें दिलेल्या समस्येची पूर्ति पुरुषोत्तमानें केल्यामुळें त्याला आश्रय मिळाला. पुढें त्याची विद्वत्ता पाहून सदाशिवानें शिवाजीपासून मराठी राजांचें ऐतिहासिक काव्य रचण्यास त्यास सांगितलें. त्यावरून हें काव्य लिहिण्यांत आलें. सदाशिव माणकेश्वराची आज्ञा ऐकून "अशा प्रकारच्या ग्रंथांत देवादिकांची स्तुति न येतां नरस्तुति येईल यामुळें माझा उपहास होईल. यासाठीं काय करावें? या विचारांत मी असतां स्वप्नांत मला व्यासानें दर्शन देऊन शिवाजीपासून हूणापर्यंतच्या राजांचें वर्णन कर; म्हणजे त्या योगानें तुझें व हा ग्रंथ ऐकणाऱ्यांचें पाप नाहींसें होईल असें सांगितलें." इत्यादि पुरवणी ग्रंथकारानें आपल्या ग्रंथलेखनाच्या समर्थनार्थ जोडली आहे. सदाशिव माणकेश्वरानें या कवीला हें काम सांगितलें तेव्हां धाकट्या बाजीरावाची कारकीर्द चालू होती. त्या अर्थी 'शिवाजी पासून बाजीरावापर्यंतचा इतिहास लिही' इतकें फार तर त्यास व्यास त्याच्या स्वप्नांत सांगू शकेल; पण 'शिवमुखान् हूणान्तिमान् वर्णय' असें व्यासानें सांगितल्याचें कवि वर्णन करतो त्या अर्थी हा श्लोक रचला तेव्हां इंग्रजी राज्य सुरू झालें असलें पाहिजे असें अनुमान करावें लागतें. कवीनें आपला ग्रंथ शक १७४३मध्यें म्हणजे पेशवाई गेल्यावर ४ वर्षांनीं पुणें येथें

पुरा झाल्याचें सांगितलें आहे. हें लक्षांत घेतलें असतां व्यासांच्या दृष्टांताची संगति लागते.

यानंतर पांच वर्षांनीं यावरील स्वकृत टीका पुरुषोत्तमानें दौलतरावाच्या राजधानींत म्हणजे लष्कर-ग्वाल्हेर येथें पुरी केली. हा शिवकाव्य ग्रंथ कवीनें सातार्‍याच्या राजाकडे नेला होता. तेव्हां राजा संतुष्ट होऊन त्यास जहागीर देत होता; परंतु कवीनें ती स्वीकारली नाहीं. तेव्हां राजानें शेलापागोटें इत्यादि पांचशें रुपयांचा विषय देऊन त्याची संभावना केली. पुण्यास त्याला ५० रुपये दक्षिणा मिळत असे. त्यानें गंगालहरी, सीताशी, साखर व आंबा ह्यांचा कल्पित कलह इत्यादि आणखी ग्रंथ लिहिले होते आणि यानें उत्तरवयांत संन्यास-ग्रहण करून वयाच्या ९० व्या वर्षीं (इ. १८५६मध्यें) देह ठेविला. ही माहिती काव्येतिहाससंग्रहाच्या संपादकांनीं दिली आहे; ती विश्वसनीय दिसते.

अशा प्रकारें थोरल्या माधवरावापासून इंग्रजी राज्य सुरू होईपर्यंतचें मराठ्यांचें राज्य ज्यानें प्रत्यक्ष पाहिलें त्याचा हा ग्रंथ; या दृष्टीनें त्यांत बराच विश्वसनीय इतिहास सांपडेल असें कोणासही सहृदयांनीं वाटण्याचा संभव आहे. पण हा ग्रंथ प्रत्यक्ष वाचून पाहतां अशी फारशी माहिती त्यांत आढळत नाहीं; आणि विचाराअंतीं असें असणेंच स्वाभाविक दिसतें. कारण, या कवीचे समकालीन व आजच्या लोकांच्या आदरास पात्र झालेले इतिहासकार म्हणजे मल्हार रामराव चिटणीस व ग्रँडफ; ह्यांच्याहि ग्रंथांबद्दल आपणांस असेंच म्हणावें लागतें कीं, "त्यांनीं दिलेली ऐतिहासिक माहिती फार त्रोटक आहे; व जी आहे तिच्यांत दंतकथेचा भरणा अधिक असून विश्वसनीयतेचा अंश कमी." त्यांतून चिटणीस व ग्रँडफ यांना शिवाजीपासूनचे मराठी कागदपत्र पाहण्यास मिळण्याजोगे होते; तसा प्रकार पुरुषोत्तम कवीचा नव्हता. खुद्द बाजीरावाच्या पदरीं परंपरा जाणणारीं माणसें फारशीं नव्हतीं; आणि बाजीरावाचें व सातारा दरबाराचें आणि जुन्या परंपरेच्या घराण्यांचें वाकडें होतें. यामुळें पुरुषोत्तम कवीला मागील माहिती मिळण्यास अडचण होती. शिवाय ऐतिहासिक वृत्तान्ताचें सांगोपांग वर्णन व त्याचें पौर्वापर्य इत्यादि गोष्टी बिनचूक देण्यासाठीं झटणें हें इतिहास-लेखकाचें खास कर्तव्य आहे अशी जी आज सर्वमान्य कल्पना

आहे तिच्या उलट प्रकार सवाशें वर्षांपूर्वी होता. चिटणीस व ग्रँडफ यांनीं शकावली व वृत्तान्त यांची अपेक्षा धरली; पण ती कामापुरती. कालनिर्णय व घडामोडीचे बारीक वृत्तान्त त्यांना सहज मिळाले तेवढे त्यांनीं घेतले व आपल्या इतिहास–लेखनाचें काम पुरें केलें. बारीक तपशील निश्चित केल्यावांचून आपण तो ग्रंथांत घेऊं नये असें त्यांच्या मनांत आलें असतें तर त्यांना आजच्या शतपटीनें कागदपत्र मिळण्याजोगे होते. पण त्यांत त्यांनीं लक्ष घातलें असतें तर त्यांच्या हातून ग्रंथरचना इतक्या लवकर झाली नसती. तात्पर्य, इतिहासलेखनापूर्वीं इतिहाससंशोधनाची म्हणून एक किचकट कामाची पायरी ओलांडावी लागते याची जाणीव त्यावेळीं नसल्यामुळें तेव्हांचे ऐतिहासिक ग्रंथ आज इतिहास या दृष्टीनें मान्य होत नाहींत. याचा अर्थ सवाशें वर्षांपूर्वींचे लेखक ऐतिहासिक काव्यांत केवळ काल्पनिक गोष्टी लिहीत, असा नाहीं; तेहि कांहीं गोष्टी निश्चित करण्यासाठीं खटपट करीत होतेच. पुरुषोत्तम कवीनें शिवाजीच्या, नानासाहेबांच्या व नारायणरावांच्या मृत्युतिथी बरोबर दिल्या आहेत व प्रत्येक कारकीर्दींतल्या एकदोन ठळक गोष्टी बिनचूक सांगितल्या आहेत. यावरून माहिती मिळविण्यासाठीं जुनीं टिपणें पाहणें व वृद्धांच्या तोंडून दंतकथा ऐकणें हे उपाय योजले असले पाहिजेत. पण यासाठीं त्यानें फार थोडा वेळ घालविला असला पाहिजे असें त्याच्या ग्रंथावरून दिसतें. बारीक घडामोडी व पौर्वापर्य यापेक्षां आपला ग्रंथ काव्य या दृष्टीनें सरस कसा ठरेल याची चिंता त्याला अधिक वाटत होती. कालिदासानें रघुवंशांत ज्याप्रमाणें एका राजाच्या कारकीर्दींतला एखादा प्रसंग निवडून त्याचें उठावदार वर्णन केलें आहे त्याचप्रमाणें पुरुषोत्तम कवीनेंहि केलें आहे. उदा०—शिवाजी-चरित्रांतले अफजल, शास्ताखान व जयसिंह आणि मुरारप्रभु हे चार प्रसंग मुख्यतः सांगितले आहेत. पुढें कबजीच्या खटपटीनें दिल्लीपतीची कन्या व संभाजी यांची भेट व त्यांचें परस्परांवरील प्रेम यांचें वर्णन आहे; आणि नंतर त्रिंबकराव दाभाड्यांशीं बाजीरावाचें युद्ध, चिमाजीचा वसई-संग्राम, पानिपतचें युद्ध, राक्षसभुवनची लढाई, तळेगांवचा व खर्डें येथील संग्राम या ऐतिहासिक भागांचें कांहीं वर्णन या ग्रंथांत आहे. पण या ऐतिहासिक भागाला समुद्रस्तुति, कृष्णास्तुति,

ऋतुवर्णन, जलक्रीडावर्णन, इत्यादि प्रकार, काव्यांत असले पाहिजेत म्हणून मुद्दाम जोडलेले दिसतात. ऐतिहासिक दृष्टचा त्यांना कांहींच महत्त्व नाहीं, पण घडामोडीचा कार्यकारणभाव जोडतांना ज्या कल्पना ग्रंथकारानें लिहिल्या त्या मात्र रावबाजीच्या अखेरीस लोकांच्या मनांत घोळत असलेल्या विचारसरणीचा भाग म्हणून समजण्यास हरकत नाहीं. शिवाजी हा अवतारी पुरुष होता व त्यानें स्थापिलेलें राज्य सवाई माधवरावाअखेर चाललें होतें; तें रावबाजीच्या कारकीर्दीत एकदम नाहीसें झालें; या प्रकाराचा उलगडा कोणत्यातरी रीतीनें करणें पुरुषोत्तम कवि व त्याचे समकालीन लेखक यांना भाग होतें. त्यांनीं कलियुगाच्या कल्पनेचा आश्रय करून हा उलगडा केला असें तत्कालीन लेखनावरून म्हणतां येतें. सवाई माधवरावाच्या वेळीं मराठी राज्य चांगलें उभें असलेलें दिसत असल्यामुळें त्या वेळच्या लेखकाला मराठी राज्याचा चालक हा ईश्वरी अंश अथवा अवतारी पुरुष आहे एवढें म्हणणें पुरेसें वाटलें. त्याला कलियुगांत 'यवनांचेंच राज्य शेवटीं शिल्लक रहावयाचें' असें भविष्य कोणत्याहि पुराणांत आढळलें नाहीं. ही गोष्ट राजवाडे खंड ४मध्यें छापलेल्या साठे-बखरीवरून सहज ध्यानांत येण्याजोगी आहे. पण त्यानंतर २५।३० वर्षांनीं लिहिणाऱ्या पुरुषोत्तमाला मराठी राज्य संपलें ही गोष्ट दृष्टीआड करतां येईना; त्यामुळें त्यानें 'स्वराज्यांत अवतारी पुरुष झाले, तरी त्यांच्याहि वेळीं कलीनें डोकें वर काढण्याचा प्रयत्न केला' असें गृहीत धरून 'ब्राह्मणांचें राज्य १०० वर्षे टिकेल' असें व्यासवचन असल्याचेंहि पुरवणी जोडली. तात्त्विक भूमिका ही प्रत्यक्ष घडामोडींच्या उलगड्यासाठीं कल्पनेनें बसवावयाची असते हें लक्षांत ठेवल्यास आणि पुरुषोत्तम कवि हा पुराणिक होता हें लक्षांत ठेवल्यास त्याचें म्हणणें समजण्यास अडचण पडत नाहीं.

उदा०—शिवाजीला भवानीनें स्वप्नांत येऊन स्वराज्य स्थापण्यास सांगितलें व 'तूं खणशील तेथें तुला द्रव्य मिळेल' असें अभिवचन दिलें. यामुळें शिवाजीला ठिकठिकाणीं द्रव्याचे हांडे सांपडले व पुष्कळ द्रव्य खर्चून अनेक गड त्याला बांधतां आले. पण जलदुर्ग कसा बांधावा याची त्याला चिंता पडली; तेव्हां समुद्रदेवीनें त्याला स्वप्नांत येऊन या कामासाठीं योग्य जागा नेमकी दाखविली. तेव्हां मालवणचा पाणदुर्ग बांधण्यांत आला.

अशा रीतीनें राज्याचा जम बसूं लागला तेव्हां कलिराजाला चिंता पडली. कीं, 'कृतयुगांत देखील नलादि राजांना मी आपला प्रभाव दाखविला; आणि आतां तर कलियुग म्हणजे माझें युग चाललें आहे, तेव्हां या वेळीं शिवाजीला जर मीं वठणीवर आणलें नाहीं तर माझी अपकीर्ति होईल.' अशा वेळीं गागाभट्टानें शिवाजीची मुंज केली व शिवाजीला गायत्री-जप करण्याची बुद्धि झाली. अर्थात् कलीच्या प्रतापामुळें शिवाजीला ही कल्पना प्रिय वाटली. पण या जपामुळें त्याला भूमिगत द्रव्य दिसणारी जी दृष्टि होती ती नाहींशी झाली. त्याबरोबर कलीला आपण कृतकृत्य झालों असें वाटलें. नंतर जयसिंहाला औरंगजेबानें पाठविलें तेव्हां त्याला शिवाजीचें बळ भवानीच्या साह्यांत आहे हें माहीत होतें. यामुळें त्यानें सहस्रचंडी जप करून आधीं देवीला प्रसन्न करून घेतलें व देवीनें शिवाजीला सांगितलें कीं, तूं जयसिंगाच्या भेटीस जा, त्याच्याशीं लढूं नको. यामुळें शिवाजी जयसिंगाशीं लढला नाहीं.

पुढें औरंगजेब दक्षिणेंत पंढरपुरास आला तेव्हां तेथील देवाच्या डोक्यास केंस आहेत अशी खात्री झाल्यावरून त्यानें त्यास साष्टांग नमस्कार घालून अलंकार इ० दिले. नंतर नरसोबाच्या वाडीस जाऊन तो मूर्तींची फोडाफोड करणार होता; पण त्या देवळांतून विंचू, साप इ० अनेक घातुक प्राणी धावून आले हें पाहून औरंगजेब निघून गेला.

बाजीराव बल्लाळाच्या वेळीं पुनः सर्व बाजूंनीं जम बसूं लागला; व चिमाजीला समुद्रानें प्रसन्न होऊन आपण दुभंगून सैन्याला वाट दिली. तेव्हां पुनः कलीला चिंता पडली व त्यानें मस्तानीला प्रेरणा देऊन बाजीरावाला मोहित केलें. तेव्हां यवनीसंगामुळें त्याचें संचित तप नाहींसें झालें; नंतर तो लवकरच मरण पावला.

नानासाहेबांच्या वेळीं देखील राज्याची वाढ झाली तेव्हां कलिप्रेरित गोपिकाबाईनें विश्वासरावाला यौवराज्य देण्यांत यावें असा आग्रह धरिला. आणि पानिपतच्या युद्धांत मराठ्यांचाच जय झाला होता; पण पळून सुटलेल्या मुसलमानी सैन्यांतील एका शिपायाला कलीनें बुद्धि दिली कीं एक वेळ आपण गोळी झाडावी! आणि ती गोळी नेमकी विश्वासरावाला

लागली; व तो मरून पडला तेव्हां मराठ्यांच्या सैन्याचा धीर सुटून ते पळूं लागले.

पुढें माधवरावाला कलीनें क्षयाच्या रूपानें ग्रासलें; नारायणराव हा पूर्वजन्मीं सिद्ध पुरुष होता, पण त्याच्या हातून ब्रह्महत्या झाली होती. यामुळें त्याचा वध होणें क्रमप्राप्त होतें. सवाई माधवरावाच्या वेळीं फारच चांगला जम बसत चालला; तेव्हां कलीनें त्याला गच्चीवरून मुद्दाम ढकलून दिलें. अशा रीतीनें शिवाजीपासून सवाई माधवरावाअखेर कलीचा प्रादुर्भाव अधून-मधून झाल्याचें पुरुषोत्तमानें वर्णन केलें आहे. पण राव-बाजीची कारकीर्द त्यानें स्वतः पाहिली असल्यामुळें त्यांत केवळ कलीचा महिमा सांगून त्याला संगति लावितां येईना. बाजीराव कर्मनिष्ठ होता, उदार होता; पण त्याचें राज्य गेलें. याची उपपत्ति सांगतांना पुरुषोत्तम म्हणतो कीं, त्याच्या अंगीं शौर्य नव्हतें; आणि इंग्रजांच्या साहाय्यानें पेशवाईच्या पदावर तो आला; तेव्हां त्यानें आपल्या राज्यांतील सर्व सरदार सेनापति आपल्या विरुद्ध आहेत असें पाहिलें आणि त्यानें इंग्रज सेनापति नेमला. तो इंग्रज सेनापती बाजीरावाच्याच हुकुमानें बाजी-रावाच्या विरुद्धपक्षास असलेल्या सरदारांना मोडून राज्याची व्यवस्था पाहूं लागला. त्याचप्रमाणें सदाशिव माणकेश्वर यांजकडे कारभार सोंप-विण्यांत आला. तेव्हां इंग्रज सेनापति व सदाशिव माणकेश्वर यांच्याकडे सर्व राज्याची व्यवस्था सोंपवून बाजीराव चैनींत राहिला. अशा रीतीनें नऊ वर्षें लोटल्यानंतर कलीच्या प्रभावानें बाजीरावाची बुद्धि फिरली त्यानें आपल्या इंग्रजी सेनापतीला काढून तें पद बापू गोखले याला दिलें; आणि कारभार सदाशिव माणकेश्वर यांजकडून काढून मोर दीक्षित यांज-कडे सोंपविला. बापू गोखले यानें पूर्वी लढाई पाहिलेली नव्हती. पण पोरांना जशी युद्धाची कथा गोड वाटते तशी त्याला वाटून तो युद्धाला आनंदानें उत्सुक झाला. आणि एकादशीच्या दिवशीं हरिचरणाचें स्मरण करून अल्फिन्स्टनरूपी अग्नीवर उडया घेऊन खाक झाला. बापू मेल्यावर बाजीराव जिवंत होता तरी निर्माल्यवत् झाला आणि पुढें गंगातीरीं राहून देवपूजेंत कालक्रमण करूं लागला.

मिळून यवनराजाकडून शिवराजादिकांनीं जें राज्य जिंकून घेतलें होतें तें परत यवनांना अर्पण करून कलिराजा कृतकृत्य झाला.

पुरुषोत्तम-कवीचा समकालीन सोहनी यानें लिहिलेल्या पेशव्यांच्या बखरींत देखील कलीच्या प्रभावाची उपपत्ति सांगितलेली आहे; व हें राज्य जाणार असें कलिवचन असल्याचा उल्लेख आहे. पण यापेक्षां अधिक सुसंगत अशीहि उपपत्ति त्यानें एके ठिकाणीं दोनतीन वाक्यांत सांगितली आहे, ती अशी. "शके १६३५ या वर्षी पेशवाई सुरु झाली; ती शके १७३९त हातची जाऊन राज्य गेलें. त्यांत सवाई-माधवरावापावेतों राज्य मोठें जुर्तीचें, सारे शत्रू हात जोडून पादाक्रांत होत्साते पेशवे यांपुढें उभे होते. त्याच्या-मागें बाजीराव रघुनाथ राज्यावर बसल्यापासून कोठें स्वारी, शिकारी किंवा मोहीम झालीच नाहीं, व प्रभूस फौजेची गरज लागली नाहीं. यामुळें अशी अवस्था झाली" (सोहनी–बखर, पृ. २३७).

यावरून पेशवाई-अखेरच्या लोकांना राज्य कां गेलें याचा उलगडा करतांना "बाजीराव हा लढवय्या नव्हता, व त्याच्या सरदारांना प्रत्यक्ष लढाईचा सराव नव्हता; असें असून बाजीरावानें इंग्रजांसारख्या प्रबळ शत्रूशीं तोंड देण्याचें ठरविल्यामुळें त्याला राज्य गमावून बसावें लागलें." इतकेंच सांगतां आलें. पण बाजीरावाला नऊ वर्षे राज्य भोगल्यानंतर इंग्रजांशीं बिघाड करण्याची बुद्धि एकदम कां सुचली याची माहिती पुरुषोत्तम-कवीनें दिलेली नाहीं. पुरुषोत्तम-कवीचा ग्रंथ मराठी भाषांतराच्या रूपानें आतां लोकांपुढें आला असल्यामुळें यापेक्षां अधिक मजकूर प्रस्तावना म्हणून सांगण्याचें कारण नाहीं.

भाषांतराच्या दृष्टीनें वाचकांनीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, संस्कृतांतला भाग मराठींत शब्दशः आणलेला नाहीं. पुष्कळ ठिकाणीं सारांश देऊनच काम भागविलें आहे. तथापि, मुळांतला संस्कृत श्लोक व मराठी भाषांतर हें ताडून पाहण्याची सोय टीपा-लेखकांनीं केलेली आहे. कांहीं श्लोक तर श्लेषप्रधान असल्यामुळें श्लेष कायम ठेवून मराठी भाषांतर करणें अशक्यच होतें. उदा० विसाव्या अध्यायांत पहिले १५ श्लोक एका दृष्टीनें बाजीरावाच्या स्तुतिपर असून दुसऱ्या दृष्टीनें बाजीराव नादान होता हाहि अर्थ त्या श्लोकांतून

निघतो. दोनहि अर्थ कवीला अभिप्रेत आहेत ही गोष्ट, स्वतः पुरुषोत्तम कवीस टीका लिहितांना स्पष्ट करावी लागली. कदाचित् असाहि संभव आहे कीं, बाजीरावाच्या हयातींत कवीनें स्तुतिपर श्लोक रचले, व ते कांहीं लोकांकडे गेले. नंतर राज्य गेल्यावर बाजीराव नाकर्ता होता असें म्हणणें कवीला आवश्यक दिसल्यामुळें पूर्वींच्याच श्लोकांत निंदापर अर्थ गर्भित आहे असें टीकेच्या रूपानें त्यानें भासविण्याचा प्रयत्न केला. संस्कृत भाषेंत शब्दांचे पदच्छेद निरनिराळ्या रूपानें करण्याची सवड व्याकरणानें ठेविली असल्यामुळें असल्या शाब्दिक कोटयांना तेथें अवसर असतो हें प्रसिद्ध आहे.

कवीनें मूळ ग्रंथ संपल्यानंतर परिशिष्ट रूपानें कांहीं प्रकरणें मागाहून जोडलीं आहेत. उदा०,–प्रतापसिंह वर्णन, परशुरामभाऊचा अंत इत्यादि. परंतु हे भाग मराठी भाषांतरांत मुळींच आलेले नाहींत.

द. वि. आपटे

( विश्वस्त भा. इ. सं. मं. पुणें)

# श्रीशिवकाव्यविवेचन



श्रीशिवराज्याच्या म्हणजे महाराष्ट्र साम्राज्याच्या समाप्तिकालीं लिहिल्या गेलेल्या ह्या शिवकाव्यांत जो एतिहासिक वृत्तान्त आला आहे त्यासंबंधानें सांप्रतचे सर्वश्रेष्ठ अधिकारी महाराष्ट्रेतिहासवेत्ते श्री. द. वि. आपटे ह्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत विवेचन केलेंच आहे. येथें केवळ त्याविषयीं काव्य ह्या दृष्टीनें थोडेंसें लिहावयाचें आहे. म्हणजे मूळ '**संस्कृत शिवकाव्य**' आणि त्याचा मराठींत अनुवाद केलेलें हें '**मराठी शिवकाव्य**' ह्यांत कोठें काय बदल झाला आहे, संस्कृतांतील कोणचा भाग विस्तर वा संकोच करून सांगितला आहे, विस्तार केला तेथें नवीन कांहीं माहिती आली आहे कीं वर्णनाचीच वाढ झाली आहे, जो भाग वगळला आहे तो कोणचा आणि कां, तसेंच मूलभिन्न किंवा मूलाहून सरस असें वर्णन कोठें आलें आहे, मूळ संस्कृत शिवकाव्यापेक्षां त्या काव्यावरील टीकेचेंच अनुकरण कोठें कसें केलें आहे, मराठींतील उपमाविशेष, सुभाषितें, समवृत्त भाषांतराचीं कांहीं स्थलें इत्यादिसंबंधानें, तसेंच काव्यांत आलेल्या इतिहासकथाभागाला पत्रें, बखरी वगैरेंचा आधार किती आहे ह्याविषयीं, थोडक्यांत लिहावयाचें आहे.

**संस्कृत शिवकाव्य प्रत**—प्रथम ज्या मूळ संस्कृत शिवकाव्याचें हें मराठींत पद्यमय भाषांतर केलें आहे त्या काव्याच्या मूळ प्रतिसंबंधानें थोडेंसें लिहिणें युक्त होईल. सांप्रत हें संस्कृत शिवकाव्य 'काव्येतिहास–संग्रहां'त पूर्वार्ध इ. स. १८८४ मध्यें ( श्री. साने ) आणि उत्तरार्ध इ.१८८७ मध्यें (श्री.मोडक) प्रसिद्ध झालेलें आहे. वाटतें कीं, ह्या एका ठिकाणाशिवाय *अन्यत्र कोठें हें काव्य मुद्रित झालेलें नाहीं. इतकेंच नव्हे तर ह्या

*बॉम्बे संस्कृत–सीरिज; गायकवाड संस्कृत सीरिज बडोदें. इ. इ.

काव्याच्या हस्तलिखित§ प्रतीहि पोथी-संग्रहांतून आढळल्या नाहींत. ह्या संस्कृत काव्याचा पूर्वार्ध जरी इ. स. १८८४ मध्यें प्रसिद्ध झालेला आहे आणि नंतर एकच वर्षानें त्याचा मराठींत अनुवाद प्रसिद्ध म्हणण्यापेक्षां सिद्ध झालेला आहे, तरी अनुवादकर्त्या भावे कवींना हा मुद्रित ग्रंथ मिळून त्यावरून त्यांनीं आपलें भाषांतरित काव्य केलें, असें, किंवा हें काव्य ज्या मूळ लिखित प्रतीवरून मुद्रित केलें तसली प्रतहि भावे कवींना मिळाली असावी असें, म्हणतां येत नाहीं. कारण, संस्कृत श्लोकानुक्रमाहून मराठी श्लोकानुक्रम कांहीं ठिकाणीं वेगळा म्हणजे मागेंपुढें झालेला आहे; काव्येतिहाससंग्रहांतील काव्यांत जे कांहीं पाठभेद तळटीपेंत दर्शविले आहेत, त्या पाठभेदांचाच अनुवाद एक दोन स्थळीं झालेला आहे; आणि मुख्य ग्रंथांतील कांहीं श्लोक वा तसेच कांहीं चरण, योग्य कारण कांहीं दिसत नसतां, अनुवादित झालेले नाहींत. ह्या-वरून पहिल्याप्रमाणें दुसरेंहि अनुमान म्हणजे कोणती प्रत कवी-पुढें नव्हती, तसेंच कोणती होती, हें काढतां येतें. प्रसिद्ध मुद्रित काव्याच्या शेवटीं, शिवकाव्याच्या प्रतींच्या उपलब्धीची हकीकत म्हणून चौथें परिशिष्ट संपादकांनीं दिलेलें आहे. त्यांत पेडगांवप्रत, पुणेंप्रत आणि कोल्हापूरप्रत अशा तीन प्रती मिळाल्याचें सांगितलें आहे. पैकीं तिसरी म्हणजे कोल्हापूरप्रत भावे कवींना मिळाली असावी असें सामान्यतः म्हणतां येईल. चमत्कार १० मधील मराठी ३०।३१ श्लोक म्हणजे संस्कृत-मधील ३५,३४ श्लोक; तसेंच मराठी ६३,६४ म्हणजे संस्कृत ७५,७४; चमत्कार ७ मधील २४,२५ म्हणजे संस्कृत २९,२८ आणि चमत्कार ५मधील मराठी ९१ म्हणजे संस्कृत ९०, मराठी ९२ म्हणजे संस्कृत ८९ व मराठी ९३ म्हणजे संस्कृत ९१ हे श्लोक होत. पण हा श्लोकव्युत्क्रम, त्यांतील वर्णनाचा भाग लक्षांत घेतां काव्यप्रत अमुक हें ठरविण्याच्या कामीं प्रथम लक्ष्य नाहीं, कारण 'पर्वती-वर्णन,' 'महादजी शिंदे ह्यांचें गणवर्णन,' 'पंढरीच्या विठ्ठलाचे कटीवर कर कां' ह्यासंबंधींचे स्फुटपर श्लोक, अशा प्रकारच्या वर्ण्यविषयांत एखादा दृष्टान्त किंवा एकादें रूपक मागेंपुढें आल्यानें

§आफ्रेट सूचि, लिविन—ग्रंथसूची, मद्रास भा. इ. सं. मं. संस्कृत ग्रंथयादी, बर्नेल कॅटलॉग—मॅन्युस्क्रिप्ट्स् ऑफ तंजावर.

रमहानि अथवा इतिहासाच्या घटनेंत कांहीं वेगळी मांडणी होत नाहीं व त्यामुळें श्लोकानुक्रमाची बाब तादृश महत्त्वाची न वाटली तरी चालेल. पण चमत्कार १८ मधील ७७ व्या श्लोकाच्या चौथ्या चरणांत कवीनें स्वीकृत केलेल्या पाठावरून कोल्हापूरप्रत भावे कवींना मिळाली असावी असें अनुमान निघतें.' जान्हव्या निकटेऽस्ति दौलत इतिख्यातो महीमण्डले 'ह्याचा पाठभेद 'शास्ता ते करवीरनामनगरे श्रीदौलताख्य: सुधी: ' असा तळटीपेंत दिला आहे. ह्या पाठभेदाचाच अनुवाद ' किंवा तो करवीर नामनगरीं वास्तव्य शास्ता करी, ' (७७ पृ.२२७) असा केला आहे. ह्यावरून कोल्हापूरप्रतीची प्रत भावे कवींना मिळाली असावी असें वाटतें. शिवाय, भावे कवींचा ओढा करवीरविषयीं अंमळ अधिक आहे, व तें साहजिकहि आहे. कारण ते त्या संस्थानांत अध्यापक असतांनाच हा अनुवाद त्यांनीं केला आहे. कोल्हापूरप्रत भावे कवींच्या हातीं आली असावी असें म्हटलें तरी कोल्हापूर छत्रपतींसंबंधानें जें स्वतंत्र वर्णनाचें ' शिव-प्रताप-काव्य ' म्हणून सुमारें १२५ श्लोकांचें ३ रें परिशिष्ट आलें आहे तें भावे कवींना मिळालेलें दिसत नाहीं. कारण त्याचें भाषांतर कवींनीं केलेलें नाहीं. पुरुषोत्तमकवींनीं आपलें हें शिवकाव्य* पुणें येथें शक १७४३ च्या माघ महिन्यांत समाप्त केलें आणि त्यावरील ' काव्यप्रकाशिका ' ह्या नांवाची टीका कवींनीं स्वतःचा† ग्वाल्हेर येथें दौलतराव शिंदे यांच्या सैन्यशिबिरांत असतां शक १७४८च्या श्रावण महिन्यांत पुरी केली. म्हणजे काव्य आणि त्यावरील टीका ह्यांच्या रचनेंत साडेचार वर्षांचें अंतर आहे. त्या काळीं मुद्रणकलेचा इतका प्रादुर्भाव नसल्यामुळें एकाद्या ग्रंथाचा प्रसार होण्याचें साधन म्हणजे कथा, पुराण, पाठांतर व लेखन हें चतुष्टय होय. ह्या शिवकाव्याच्या कांहीं हस्तलिखित प्रती त्या कालीं होऊन त्यावर कथा-पुराणांतून क्वचित् कथनश्रवणहि होऊं लागलें असावें. आणि त्या कथनप्रसंगांत आपण जें काव्यांत सांगितलें नाहीं तेंहि सांगितलें जाऊं लागल्याचें

---

*त्र्यब्ध्यब्ध्येकमिते शके तपसि तत् पुण्याभिधायां पुरी।

† गालवपुरसमीरे श्रीदौलतराजसैन्ये। (गोपाळपूर असें ग्वाल्हेरचें नाव प्राचीन लेखांत येतें.)

जेव्हां कवीच्या कानीं आलें तेव्हां आपल्या काव्यांतील अर्थ आपणच त्यावर व्याख्यान करून त्यांतल्या त्यांत स्पष्ट केलेला असावा, असें वाटून कवींनीं स्वत: टीका लिहिली असावी. टीकेंत कांहीं ठिकाणीं कवीनीं अपपाठ कसे तेंहि सांगितलें आहे. चम.१८ पद्य ४२ वरील टीकेंत 'समं इति अपपाठ:' असें म्हटलें आहे. पुढें ह्या टीकेच्याहि प्रती हातच्या केल्या गेल्या. म्हणजे काव्याची पोथी वेगळी आणि काव्यटीकेची पोथी वेगळी झाली.कांहीं काळानें,काव्याचे श्लोक व तेथेंच त्या श्लोकाची टीका, एकाच प्रतींत श्लोकाच्या वर-खालीं लिहून तशी सटीक पोथी लिहिली गेली असेल. पण तशी सटीक पोथी फार प्रसृत झाली नाहीं. ह्यामुळें काव्येतिहास संग्रहकारांना ज्या प्रती मिळाल्या त्यांतहि कांहीं प्रती सटीक तर कांहीं अटीकच मिळाल्या. तरी ह्या काव्याचें महत्व त्या वेळीं बरेंच झालें होतें हें, एका प्रतींत प्रसंगानुसार १०।१५ चित्रेंहि घातलेलीं होतीं ह्यावरून, अनुमानितां येतें. हीं चित्रें १५ पर्यंत असून त्यांत शिवाजी व अफजलखान ह्या प्रसंगांतीलच ५ चित्रें; शिवाजी, शहाजी, रामदास, मारुतिराय ह्यांचींहि दोन चित्रें आहेत. आणि काव्याच्या प्रारंभीं असलेल्या देवतावंदनांतील प्रसंगांचीं इतर चित्रें आहेत. ह्या काव्याची जी प्रत, काव्येतिहाससंग्रहांत ११ वें पुस्तक म्हणून प्रसिद्ध झाली; तीन श्लोक आणि त्यावरील टीका अशा दोन स्वतंत्र प्रती मिळाल्या असाव्या व त्यावरून ह्या काव्याचें मुद्रण झालें असावें; असें जें वर सूचित केलें त्याचें कारण, कांहीं श्लोकांवरील टीका श्लोकक्रमानें आल्या नसून त्या आगेंमागें मुद्रित झाल्या आहेत. चम. २ मध्यें श्लो. ५७,५५ व ५६ असा टीकाक्रम आला आहे; ज्या श्लोकावर टीका आहे तो प्रक्षिप्त नसतांना त्यावर तसें चिन्ह पडलें आहे. (चम. १८ श्लोक ५९; चम. ११ श्लोक ५८ पहा.) आणि चमत्कार १६ मधील २७ हि श्लोकांवर टीका असतांना ती नुसती टीकाच, स्वतंत्र परिशिष्ट १ लें म्हणून काव्यसमाप्ती नंतर छापली आहे. ह्या काव्यांत एकंदर २० चमत्कारांत मिळून ६०८ श्लोक आहेत; ५० अधिक श्लोक प्रक्षिप्त म्हणून आहेत. ते पुरुषोत्तमकविकृत नव्हेतच असें नसेल. परिशिष्ट २ रें व ३ रें मिळून १३४ पद्यें अधिक आहेत तीं वेगळीच. श्लोकांतील एका शब्दाबद्दल दुसरा शब्द, कित्येक ठिकाणीं सबंध चरणच पाठभेदाचा तर कांहीं पद्यच्या पद्यच पाठभेद म्हणून दिलीं आहेत. अशीं ७

पद्यें आलीं आहेत. अशी ही मूळ संस्कृत प्रतीची व कवी भावे यांना मिळालेल्या प्रतीची हकीकत आहे.

ह्या काव्याचा उपयोग महाराष्ट्रेतिहासज्ञात्यांकडून आतांपर्यंत वेळोवेळीं होत आला आहे. 'शिवाजीच्या उत्तरार्धांतील राजकारण' ह्या शीर्षकाचा एक उत्कृष्ट लेख मंडळ त्रैमासिक वर्ष ५ मध्यें प्रस्तुत ग्रंथाचे प्रस्तावनालेखक श्री. द. वि. आपटे ह्यांनींच लिहिलेला आला आहे. त्यांत शिवाजीचे जशास तसें हें धोरण सांगण्यासाठीं लेखाच्या शेवटीं ह्या शिवकाव्यांतील चमत्कार २ मधील ४३ वा श्लोक उद्धृत करून लेखसांगता केली आहे. तो श्लोक एऱ्हवींहि शिवनीति व सुभाषित म्हणून सर्वांनीं लक्ष्यांत घेण्याजोगा आहे.

**धूर्ते तु धौर्त्यं सुधिया विधेयं सदार्जवं कार्यकरं न शत्रौ ।**
**ज्वरेण कट्वी रसना भवेच्चेद्धितावहा स्यात्कटुकी सिता न ॥४३॥** चमत्कार २

'शिवदिग्विजय' ह्या बखर-ग्रंथाच्या प्रस्तावनेंतहि प्रकाशकांनीं ह्या काव्याचा निर्देश केला असून 'होळकरांच्या कैफियती' चें मुखपृष्ठ, होळकर ह्या शब्दाची निरुक्ति असलेल्या ह्या काव्यांतील श्लोक उद्धृत करून, अलंकृत केलें आहे. ह्या काव्याचा प्रस्तुतप्रमाणें अनुवाद नाहीं, पण त्या काव्याधारें मराठींत काव्य करण्याचाहि प्रयत्न झालेला आहे. काव्यरत्नावलीकार श्री. ना. न. फडनवीस ह्यांनीं आपल्या रत्नावलीच्या अंकांतून हें काव्य चमत्कार तीनपर्यंत स्वकृतपद्यें करून प्रसिद्ध केलें आहे. इ.१८९३अं.५६,५८वर्ष६वें पहा.

**काव्यनाम**—पुरुषोत्तम कवींनीं आपल्या संस्कृतमधील शिवकाव्याचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग करून त्यांत अनुक्रमें ११ व ९ असे एकूण २० पोटविभाग म्हणजे अध्याय केले आहेत. पण ह्या पोटविभागांना अध्याय, सर्ग, तरंग, स्तबक, उल्हास, शाखा, प्रसंग, इत्यादींपैकीं सामान्यतः परिचित अशी एकादी संज्ञा न योजतां 'चमत्कार' हें नांव दिलें आहे. अर्थात भावे कवींनींहि आपल्या मराठी अनुवादांत हेंच नांव घेतलें आहे आणि मूळ काव्यातल्याप्रमाणें तितक्या म्हणजे २० चमत्कारांतच आपलेंहि शिवकाव्य संपूर्ण केलें आहे. अध्यायाला 'चमत्कार' हें नांव संस्कृत वाङ्मयांत जसें अपरिचित, तसें मराठी वाङ्मयांतहि नवीनच दिसतें. रमावल्लभदास ह्या मराठी साधुकवींनीं आपल्या गीतेवरील ओवीबद्ध टीकेस 'चमत्कारी टीका' हें नांव दिलें आहे. पण तें अध्याय म्हणून नसून टीकेचेंच तें नांव आहे.

ह्याप्रमाणें वीस चमत्कार असलेल्या ह्या काव्यांत, मराठी साम्राज्याच्या पाउणे दोनशें वर्षांचा म्हणजे त्यांतील बारा राजकारकीर्दीचा कथाभाग कवींना सांगावयाचा आहे. पैकीं पूर्वार्धाच्या अकरा चमत्कारांत शिवाजी, संभाजी, शाहू म्हणजे बाळाजी विश्वनाथ, थोरले बाजीराव आणि बाळाजी बाजीराव पूर्वार्ध, अशा चार साडेचार कारकीर्दी सांगितल्या असून, उत्तरार्धातल्या नऊ चमत्कारांत बाळाजी बाजीराव-उत्तरार्ध, थोरले माधवराव, नारायणराव, सवाई माधवराव, अमृतराव आणि शेवटचे बाजीराव अशा सहा राजवटींचें वर्णन आलें आहे. म्हणजे छ० राजाराम व ताराबाई ह्यांच्या कारकीर्दीचा ओझरता उल्लेखच कवींनीं केला असून, बारांपैकीं एकंदर दहाच कारकीर्दी आपल्या काव्यांत घेतल्या आहेत. ह्या दहा कारकीर्दींपैकीं उत्तरार्धांतील सहा कारकीर्दी नऊ चमत्कारांत सांगितल्या असून पूर्वार्धांतील अकरा चमत्कारांत मिळून चार साडेचार राजकथा दिल्या आहेत. त्यांतहि पहिल्या पांच चमत्कारांत केवळ श्रीशिवराजांचीच कथा कवींनीं गायिली आहे. ह्यावरुन व आद्य संस्थापक ह्या नात्यानें एकंदर काव्याला 'शिवकाव्य' हें नांव कवींनीं दिलें आहे हें युक्तच होय. त्यांतहि संस्कृत शिवकाव्य-कर्त्या पुरुषोत्तम कवीपेक्षां मराठी अनुवादकर्त्या भावे कवींच्या ठिकाणीं, शिवाजीराजांविषयींचा आदर व पूज्यभाव अधिक आहे हे शिववर्णनाच्या शेवटीं स्वतंत्र केलेल्या एका श्लोकावरुन स्पष्ट होत आहे. व त्यावरुन 'शिवकाव्य' हें काव्यनाम अधिक अर्थपूर्ण झालें आहे. संस्कृत काव्यकर्त्यापेक्षां मराठी काव्यकर्त्याचे ठिकाणीं असा आदर असण्याचें कारण मुख्यतः उघडच, दोन कवींमधील कालानें पाडलेलें अंतर हें होय. दुसरें असें कीं, मूळ संस्कृत काव्यांत कवीनें 'शिवकाव्य' हें आपल्या काव्याचें नाम, ह्या काव्याच्या निर्मितीचीच* जेथें हकीकत दिली आहे तेथें ( चम. २० श्लोक २०–३२ ) किंवा प्रारंभीं मंगलाचरण होऊन

*राजन्यानखिलान् वरान् शिवमुखान् हृणान्निमान् वर्णय ।
... यया ते भारतं तथा ।।–२९ चम. २०
—स एकदा मामवदत् कृतज्ञः सुराधिराजाश्रितभूपतीनाम् ।
शिवादिकानां चरितं विचित्रं सखे मुदा त्वं बहु वर्णयेति ।।२५।।

विष्णुपंचायतन-वंदनानंतर प्रत्यक्ष काव्यनिर्देश करून कथाभागाला आरंभ केला आहे तेथें ( चम. १–५, ६ ) दिलेलें नाहीं. फक्त प्रत्येक चमत्काराच्या शेवटीं काव्य व त्यावरील टीका ह्या दोन्ही ठिकाणच्या पुष्पिकेंत म्हणजे समाप्तीदर्शक वाक्यांत 'इतिश्री पुरुषोत्तमकवि-विरचिते शिवकाव्ये चतुर्थश्चमत्कारः'। 'इतिश्री शिवकाव्यव्याख्यायां स्वकृतायां काव्य-प्रकाशितायां प्रथमश्चमत्कारः।' अशा प्रकारें 'शिवकाव्य' असा स्पष्टपणें काव्यनामनिर्देश केला आहे.

'शिवकाव्य' असें जरी ह्या काव्याचें मुख्य नांव* असलें तरी ह्या काव्याच्या ज्या निरनिराळ्या प्रती प्रकाशकांना मिळाल्या होत्या त्यांत 'कलिविलास' हेंहि ह्या काव्याचें आणखी एक नांव असल्याचें, तीनचार चमत्कारांच्या शेवटीं पाठभेद म्हणून आलेल्या उल्लेखांवरून दिसून येतें. आणि तें एका अर्थी उचितहि वाटतें. कारण, सर्व काव्यभर बहुतेक सर्व हालचालींच्या बुडाशीं 'कलीचा संचार,' 'कलि-प्रेरणा' 'कलीला वाटलें म्हणून असें झालें' हेंच जेथें तेथें सांगितलें आहे. म्हणजे राज्याभिषेकापासून राज्यनाश होईपर्यंतच्या प्रत्येक राजवटींचा अंत किंवा महाराष्ट्र-राज्यचाल-

* 'शिवप्रताप' असेंहि दुसरें एक ह्या काव्याचें नांव त्यास जोडलेल्या तिसऱ्या परिशिष्टावरून म्हणतां येईल. पण ह्या परिशिष्टांतील कोणत्याच पद्यावर कवीची व्याख्या म्हणजे टीका नाहीं. आणि ज्या अर्थी कवीनें स्वतः ह्या आपल्या शिवकाव्यावर टीका केली असून त्या टीकेंतून हें परिशिष्ट आणि कांहीं श्लोक टीका न देतां ते सोडून दिले आहेत, त्या अर्थी ते तसेच टीकारहित असलेले चमत्कार हे, ह्या मुख्य शिवकाव्यांतील समजण्याचें कारण नाहीं. भावे कवींनीहि असे बिनाटीकेचे श्लोक अनुवादांत न घेतां सोडून दिलेले आहेत. हें परिशिष्ट प्रस्तुत लक्ष्यांत न घेण्याचीं दुसरींहि दोन कारणें आहेत. ह्या परिशिष्टांतील पद्यांच्या शेवटीं चमत्कार हें अध्यायवाचक नांव न येतां 'सर्ग' हें नांव आलें आहे आणि करवीरस्थ दुसऱ्या शिवाजीचा वृत्तांत-रत्नाकरपंत राजाज्ञा, तासगावकर परशुरामभाऊ व त्यांचे चिरंजीव रामचंद्र परशुराम पटवर्धन, सिद्धेश्वरबुवा इत्यादिकांच्या हालचालीसह—आलेला आहे. प्रस्तुतच्या शिवकाव्यांत केवळ सातारकर छत्रपतींचाच तेवढा वृत्तान्त आलेला आहे. ह्यावरून असाहि तर्क संभवनीय वाटतो कीं, 'शिवप्रताप—काव्य' ह्या नांवाचें ह्याच कवीचें आणखी एकादें स्वतंत्र काव्य असेल कदाचित्.

कांना युद्धांत आलेला पराभव इत्यादि सर्व गोष्टी ह्या ‘कलिविलास’ होत; असें कवीच्या मतानें दिसतें. अर्थात् ‘कलिविलास’ हें काव्यनाम सुयुक्त ठरतें व तें एकदां लक्ष्यांत घेतलें म्हणजे त्या काव्याच्या पोटविभागाला ‘चमत्कार’ हेंच नांव सहज साजरें व जुळतें ठरणारें आहे. कलिच्या विलासाचें अथवा लीलेचें वर्णन चमत्काराशिवाय अन्य कोणत्या शब्दानें करणार! चमत्कार हें अध्यायाचें नांव कां आलें हें आतां नीट उलगडतें; आणि प्रस्तावनेंतील विवेचन अधिक पटतें.

ह्या ठिकाणीं काव्यनामनिर्देशासंबंधींच आणखी थोडा निराळ्या दृष्टीनें विचार केल्यास तो उद्बोधकच होईल. महाराष्ट्रसाम्राज्याचा साद्यन्त इतिहास अर्थात् इंग्रजी अंमलाच्या प्रारंभकालीं, कोणच्याहि कारणानें, पण ज्या स्वकीय लेखकांनीं लिहून ठेविला, त्यांनीं ह्या शेंसवाशें वर्षांच्या अधि-सत्तेस काय म्हणून संबोधिलें, कोणचें नांव दिलें व ती सत्ता लुप्त झाल्याचें सांगितलें? ‘स्वराज्य गेलें’ असें सांगितलें, कीं ‘साम्राज्य नष्ट झालें’ असें म्हटलें; कां ‘महाराष्ट्रराज्य’ ‘शिवराज्य’ नाहींसें झालें असें म्हणून त्या राज्याचा निर्देश केला? अशा दृष्टीनें पाहतां ‘मल्हार रामराव चिटणीस’-लिखित ‘छत्रपतींचें चरित्रग्रंथ,’ ‘महाराष्ट्र साम्राज्याची छोटी बखर,’ ‘शेड-गांवकर बखर’ ह्या दोनतीनच ग्रंथांत असा साद्यन्त इतिहास आलेला दिसतो. ह्यांतहि पहिले दोनच ग्रंथ कालदृष्टया अधिक लक्ष्यांत घेण्याजोगे आहेत. म्हणजे शक १७३९–४० (इ. स. १८१७–१८) हा ह्या ग्रंथांचा रचनाकाल असून तिसऱ्या ग्रंथाचा समाप्ती-काल इ. स. १८५४ हा येतो. ह्या तिन्ही ग्रंथांप्रमाणें आणखीहि दोनतीन ग्रंथ ह्या विचाराच्या वेळीं लक्षांत घेतले असतां इष्ट होईल. त्या ग्रंथांत वरील तीन ग्रंथांप्रमाणें आदि नाहीं व असणें शक्यहि नाहीं; पण अन्त मात्र बरोबर आहे. व त्याच दृष्टीनें येथें पाहावयाचें आहे. ते ग्रंथ म्हणजे मोहोनींहून ‘पेशवे बखर,’ ‘नागपूरकर भोसले बखर, आणि ‘होळकरांची कैफियत’ ह्या ग्रंथांचे काल शक १७३९, शक १७४४, १७४९ म्हणजे इ.स.१८१७,१८२२ व १८२७ असे क्रमानें सांगतां येतील. ह्यांतच प्रस्तुतच्या शिवकाव्यरचनेचा काल इ.स.१८२१ किंवा २६ हा, येतो. सारांश, ह्या सातहि ग्रंथांपैकीं ज्यांत प्रस्तुत अपेक्षेप्रमाणें राज्यनाम दिलें आहे असे ग्रंथ केवळ तीनच आहेत. म. सा. छोटी बखर, पेशवे बखर आणि

प्रस्तुनचें हें काव्य. म. सा. छो. ब. मध्यें 'पेशव्यांचें राज्य व दौलत' कुल इंग्रजानें घेतली 'पेशवाईची हकीकत जहाली' असेंच लिहिलें आहे. (पृ. ११२); सोहोनीकृत पेशवे बखरीमध्यें 'श्रीमंतांची दौलत इंग्रजांचे हातीं पुष्कळ लागली' हें सांगितलें आहे (पृ.१९२). आणि प्रस्तुनच्या ह्या काव्यामध्येंहि 'ख-वेद-ऋषि-भू शकीं (श.१७४०) सकल पेशवाई बुडे' असें जरी म्हटलें आहे (मुळांत 'नवत्रिसप्तैकमिते (१७३९) स शाके हूणाधिपो-ऽल्फिष्टन–नामधेयः। पुण्याभिधानां द्विजराजधानीमध्यास्य भूमिं निखिलां शशास ॥४॥ असें आहे) तरी काव्याला 'शिवकाव्य' असेंच नांव देऊन एका अर्थी शिवराज्यच गेलें असें सुचविलें आहे. शिवाजी, बाजी इत्यादि राज्य-कर्त्यांनीं जें राज्य मुसलमानांच्या हातून सोडविलें, व म्हणून जें स्वराज्य उपभोगिलें तें राज्य पुनः त्यांच्याच (म्हणजे म्लेंच्छ = हूण = ) इंग्रजांच्या हातीं गेलें व हें कलीमुळें झालें, असें स्पष्ट सांगितलें आहे.

यवनपाद्विहृतां सकलां महीं शिवनृपप्रमुखैः पुनरेव ताम्।
यवनपेषु निधाय कलिः कृती समभवत् कृतहृत्यमनाः किल ॥४९॥

म्लेंच्छादिकां जिंकुनि जें मिळालें। तें राज्य त्यांच्याच करांत गेलें ४
चमत्कार २०

तात्पर्य, ह्या सात ग्रंथकारांचा हेतु सामान्यतः काय आहे हें वाचकांच्या लक्ष्यांत येईल. आणि प्रस्तुत सांगावयाचें म्हणजे संस्कृत काव्यामध्यें जरी नुसतें 'काव्य' किंवा 'भारताप्रमाणें काव्य,' असें म्हटलें आहे; तरी भावे कवींनीं मात्र ठिकठिकाणीं प्रत्यक्ष काव्यामध्यें 'शिवकाव्य' हेंच नांव पुनःपुनः घेऊन आपलें मत यथोचित व्यक्त केलें आहे व हा अनुवादांतील विशेष लक्षांत घेण्याजोगा आहे. भा. इ. सं. मं. इ. वृ. १८३७ पृ. १४८ वर पतप्रधानप्रशस्तिपर कविता आहेत. त्यांत 'पादाक्रांत करूनि म्लेच्छ नृपती, शिवराज्य हे रक्षिलें' असेंच सांगितलें आहे असो.

संस्कृत काव्याचे हे जे पूर्वार्ध नि उत्तरार्ध असे दोन विभाग केले ते महाराष्ट्रराज्याच्या किंवा शिवराज्याच्या चढत्या उतरत्या स्थितीचे दर्शक होत असें नाहीं. कवीच्या मतानें ही स्थिती, म्हणजे राज्याची उतरती कळा व तो उत्तरार्ध मानावयाचा तर, महादजी शिंदे व हरिपंत फडके हे

' 'जातां दोन चमू-प देवभुवनीं, तें राज्य झालें ढिलें'
म्लेच्छांना कळतां असें, निजबळें त्यांनीं तया व्यापिलें ५३ चम. १७

हा मानतां येईल; किंवा हें शिवकाव्य ज्या एका विवक्षित धाटणीनें लिहिलें आहे त्या दृष्टीनें पाहतां उद्भव, उत्कर्ष व उच्छेद म्हणजे उत्पत्ति-स्थिति-लय-कर्ते जे ब्रह्मा, विष्णु, महेश त्यांचे अंश जे महाराष्ट्रराज्यचालक त्यापैकीं रुद्रांशापासूनचा तो उत्तरार्ध, ती ह्या महाराष्ट्रराज्याची किंवा शिवराज्याची उतरती कळा, असें म्हणतां येईल.

ब्रह्मांशप्रभवास्त्रयः शिवमुखाः विष्ण्वंशभूतास्ततो
बालाजिप्रमुखाः सदा जनसुखाः यावुत्तमोपोत्तमौ ।
रुद्रांशप्रभवास्ततो गुणगणानेषामलं वर्णय
स्यात् पापस्य लयस्तवापि पठतः श्रोतुश्च नित्यं तथा* ॥३०॥

**अनुवादकौशल्य**—संस्कृतांतून मराठींत कथाभाग आणतांना भावे-कवींचे पद्यरचनाचातुर्य अनेक ठिकाणीं अनेक प्रकारानें सहज दिसून येतें. वाटतें कीं, हा अनुवाद नसून ही स्वतंत्रच काव्यकृति आहे. इतकी ती रचना ओघवती व प्रसादपूर्ण झाली आहे. कांहीं ठिकाणीं दोनदोन तीन-तीन संस्कृत पद्यांचा एकाच शार्दूलविक्रीडितासारख्या मोठ्या वृत्तांत सारांश सांगितला आहे; कांहीं ठिकाणीं मूळाहूनहि सरस दृष्टान्त योजून वर्ण्य विषय अधिक स्पष्ट व रम्य करून सांगितला आहे, कांहीं ठिकाणीं समवृत्त भाषांतर साधलें आहे, तर कांहीं ठिकाणीं एका श्लोकाचा एकाधिक श्लोकांत विस्तार केला आहे. कित्येक स्थलीं पद्यांच्या शेवटच्या चरणांत सुभाषित योजून कथाभाग व नीतिकथन; म्हणजे गोष्ट व तिचें तात्पर्य, अथवा उदाहरणानें सांगितलेलें तत्व, असा काव्यगुणांतील जो द्रष्टेपणा तोहि निदर्शनास येतो; कांहीं ठिकाणें तर अशीं आढळतात कीं, तेथील पद्यरचनेसाठीं घेतलेलें वृत्त हें कवीच्या योजकतेचें म्हणजे रसोत्कर्ष-

*ह्या श्लोकावर कविकृत टीका नाहीं. आणि 'एकस्मिन् पुस्तक इदम-धिक-पद्य' अशी मात्र टीप प्रकाशकांनीं दिली आहे. ह्यावरून हा श्लोक भावे-कवींनी अनुवादार्थ घ्यावयास नको होता; पण तो घेतला आहे. व हेंच एकच उदाहरण ह्या पद्धतीचें सर्व वीस चमत्कारांत घडलें आहे.

साधकतेचें उत्कृष्ट उदाहरण म्हणून दाखविणें इष्ट होईल, म्हणजे वर्ण्य विषयाशीं तादात्म्य आणि अंगची प्रतिभा ह्यांची अशा ठिकाणीं प्रतीति येते. तसेंच निरनिराळे अलंकारहि पाहूं जातां ह्या काव्यांत साधिले आहेत. कांहीं स्थलीं मूळ संस्कृतांतील पद्यांत कवीनें स्वनाम घातलें आहे तर मराठींतहि भावे यांनीं आपलें नांव दर्शित केलें आहे. भावे कवींनी आपल्या काव्यांत निरनिराळीं ३५ वृत्तें योजिलीं आहेत. त्यांची अकारानुक्रम यादी पुढें स्वतंत्र जोडिली आहे. ह्या वृत्तांशिवाय भावे यांनीं एक-दोन स्थलीं प्रचलित पदांच्या चालीहि घेऊन नाटकांतल्यासारखीं पदें आपल्या काव्यांत दिलीं आहेत आणि वर्ण्यविषय अधिक गेय व मनोरम केला आहे. त्या चालीवरून सांगतां येतें कीं, आण्णा किर्लोस्करांचें सौभद्र नाटक नुकतेंच रंगभूमीवर येऊन अत्यंत लोकप्रिय झालें होतें व त्यांतील पदें जनतेच्या तोंडीं फारच झालीं होतीं. म्हणून त्यांतील 'वैशाख मास वासंतिक समय शोभला' ह्या चालीवर पुणें नगर वर्णन '**हिंदुतख्त पुण्य-पुरीं फार शोभलें**' ह्या पदांत अति सुंदर केलें आहे. (चमत्कार ११ पद्य १०). तात्पर्य, अशा प्रकारें मनोरम व विविध वृत्तें व लोकरूढ चालींचीं पदें योजून भावे कवींनीं आपलें काव्य चांगलेंच गेय केलें आहे. आणि म्हणूनच डे. व्ह. ट्र. सो. नें दीडशें रुपयांचें पारितोषिक पूर्वार्धापुरतें देऊन उत्तरार्ध लिहिण्यास आग्रहपुरस्सर सांगितलें होतें व त्याबद्दलहि रु. दोनशेंच्या बक्षिसाची योजना सूचित केली होती. तें हें संपूर्ण 'मराठी शिवकाव्य' आतां प्रसिद्ध होत आहे.

काव्यामध्यें रसानुकूल निरनिराळीं पद्यवृत्तें योजणें हें जसें कवीच्या अंगच्या काव्यकर्तृत्वगुणाचें एक उत्तम लक्षण, तसेंच वर्णनामध्यें उपमा, दृष्टांत, अलंकार, इत्यादि सहज साधलेले असणें हेंहि दुसरें उत्तम लक्षण होय. भावे कवींचें हें काव्य उघडच अनुवादात्मक आहे. म्हणजे मूळ संस्कृतांत ज्याप्रमाणें काव्यगुण व वर्ण्यविषय आला असेल त्याप्रमाणेंच त्याच्या भाषांतरांत तो येणार; तथापि भावे कवींनीं संस्कृत मूळकाव्यांत जेथें अतिशयोक्ति आली आहे तेथें ती, आपल्या अनुवादांत तशी न दाखवितां समुचित वर्णन करून तो दोष टाळला आहे. उदा०—अफजलखानाच्या स्वारींत शिवाजी राजांनीं खानाचें कपट खानावरच उलटवून त्याचा

वध केल्यानंतर मराठ्यांनीं खानाच्या सैन्याच्या केलेल्या लुटीचें वर्णन चम. ३ मध्यें आलेलें आहे. हें वर्णन संस्कृतमध्यें शंभर हत्ती, पांच सहस्त्र घोडे, त्याच्या दुप्पट उंट, रत्नें, मोतीं इत्यादींच्या तर राशीच्या राशी असें अतिशयोक्त आलें आहे. संस्कृतांत जवळजवळ दोन श्लोक ह्या लुटी-विषयीं आले आहेत. पण भावे कवींनी आंपल्या अनुवादांत

**'गज, क्रमेला, तसेच वाजी सांपडले यवनांचे ।**
**रत्न भूषणें बहुत लाभलीं अगणित धनही साचे ॥'**

अशा एका साकीवृत्त पद्यांत ही लूट सांगितली आहे.

चमत्कार ११ मध्यें छत्रपती शाहू हा, राज्यरक्षण व राज्यवर्धन प्रधानपंतां-करवीं उत्तम चाललें आहे असें पाहून 'त्यानें तें निज राज्यभार अवघा त्यांच्या शिरीं अर्पिला' आणि क्रोशयुग म्हणजे दोन कोस अंतरावर असलेल्या माहुली क्षेत्रीं 'कृष्णातटीं निजवधूसह शीघ्र गेला,' असतां त्याच्या तोंडीं पुरुषोत्तमानें एक कृष्णाष्टक घातलें आहे व त्याच्या शेवटीं

**इदमष्टकमिष्टसिद्धिदं पठतां पापचयापहं परम् ।**
**पुरुषोत्तम–तुष्टिकारकं पठनीयं मनुजैरुषस्यतः ॥५६॥**

असा स्वनामनिर्देश केला आहे. मराठी अनुवादांतहि हें सर्व कृष्णाष्टक ३९–४६ ह्या श्लोकांत समवृत्तांत देऊन शेवटीं भावेकवींनींहि आपलें नांव पुढीलप्रमाणें सहज आणिलें आहे.

**गाहो, नित्य तुम्ही प्रभातसमयीं हें शुद्ध कृष्णाष्टक**
**कृष्णास्नान परी खचीत तुमच्या पापा असे नाशक ।**
**हें गातां सुख वाटतें बहु मनीं श्री वासुदेवास हो**
**श्रीकृष्णाष्टक कष्टनष्टकर हें इष्टार्थ देईल हो ॥४७॥** चम. ११

पुढल्या म्हणजे बाराव्या चमत्कारांत बाळाजी बाजीरावाच्या राजवटींत सर्वांना सुखस्वास्थ्य लाभून वैभवाची स्थिति अनुभवास मिळूं लागली तें वर्णन आलें आहे. अशा वर्णनांत वसंतऋतुवर्णन, त्यांतहि उपवनविहारवर्णन न आलें तर तो कवि कसचा व त्याचें तें काव्य कसचें!! तात्पर्य, हीं वर्णनें आलीं आहेत. अशा ठिकाणीं द्रुतविलंबित हें वृत्त व त्यांतहि त्याच्या चौथ्या चरणांत यमक साधलेलें असणें ही खरी कविकाव्यचातुरी व तें वाचण्यांतहि

अभिनव माधुरी आहे. (पृ. १४८–१५८). अशीं स्थलें बरीच आहेत. पैकीं कांहीं उद्धृत करतों.

उपवनीं पवन–स्तुतशा हर्यी
भ्रमुन जाय नृपाल सुखालयीं ।
ऋतु सुखावह माधव पाहिला
नर–मणी रमणीसह राहिला ॥१२॥

चमत्कार ३ मधील शिवाजी सैन्य व अफझल सैन्य ह्यांमधील युद्ध-वर्णनांत मुळांत

'नृपस्य वीरैर्बहुधा विशीर्णा विदुद्रुवुस्ते यवनाः प्रभीताः ।
तृणं दधुः केचन वक्त्रमध्ये भटाः प्रणेमुश्च तथैव केचित् ॥ ३८॥

असा श्लोक आला आहे. ह्यांतील हेंच वर्णन मराठींत शार्दूल––विक्रीडितांत कसें आलें आहे पहा–

हिंदूंनी स्वकरीं स्वशस्त्र निकरीं जे मर्दिले संगरीं ।
ते हिंदूंस वरी सुकीर्ति नवरी सन्नम्र झाले अरी ।
कोणी भीति धरी पलायन करी कोणी गिरीकंदरीं ।
कोणी दीनपरी नमस्कृति करी दांतीं तृणातें धरी ॥३५॥ चम. ३

चमत्कार ११ मध्यें पुण्यनगरीचें वर्णन ११–२६ श्लोकांत आलें आहे. ह्याचा मराठी अनुवाद, एक पद व ११ ते २२ निरनिराळीं वृत्तें योजून १२ श्लोकांत मोठा सुंदर केला आहे. ह्यांतहि आनृण्य–वर्णनाच्या श्लोकाचा अनुवाद लक्षांत घेण्याजोगा झाला आहे. मुळांतील पद्य

ऋणत्रयं भूमितले प्रसिद्धं तथा चतुर्थं व्यवहारजन्यम् ।
ऋणत्रयान्नैव नरोऽविमुक्तस्तुरीयकं यत्र तु नैव दृष्टम् ॥२१॥

असें आहे. व त्याबद्दल भावे कवींनीं

देवांच्या ऋषिच्या तसेंच पितरांच्याही ऋणापासुन ।
झाले मुक्त समस्त लोक तिथले चौथें नसे त्या ऋण ॥
यज्ञानें पहिलें फिटे ऋण पहा, वेदें फिटे दूसरें ।
सत्पुत्रें तिसरे पहा फिटतसें, चौथें धनानें सरे ॥१८॥ चम. ११

हा श्लोक दिला आहे. ह्यात संस्कृतपेक्षां प्रत्येक व्यक्तीला व्यवहारांतील

धनऋण धरून चार ऋणें असतात व तीं यज्ञयाग करून, वेदाध्ययनानें, सत्पुत्रवंत असून आणि धनवान होऊन फेडावयाचीं असतात. हें विशद करून सांगितलें आहे.

चमत्कार १७ मध्यें सवाई माधवरावांच्या जन्माचें वर्णन आलें आहे तेथें किंवा चमत्कार १८ मध्यें खर्ड्यांच्या लढाईचें वर्णन आलें आहे तेथें मूळांतील सर्वच पैलू प्रतिबिंबित झाले आहेत.

शचीप्रयुक्ताप्सरसां समूहैर्न्यधायि यद्वार्यवगाहहेतुः ।
घटेषु गांगं वहतिस्म तद्यदद्यापि शैलस्य तटात् प्रयाति ॥४॥ चम. १७

मराठी पद्य :—

बालावगाहार्थ सुरस्त्रियांनी । जें आणिलें गांग विशुद्ध पाणी ।
पुरंदरांतून अपार वाहे । तें आजपर्यंत तसेंच आहे ॥५॥

खर्ड्याची लढाई

कपित्थफलसन्निभा अपि च कन्दुकाभाः परे
खगा इव दिनात्यये झटिति संहृताः स्वाश्रयम् ।
सुयन्त्रमुखनिर्गता अविरतं तदा गोलकाः
निजामपृतनां ययुर्विदलितध्वजच्छत्रकाः ॥४२॥ चम. १८

आतां मराठी पद्य :—

कपित्थफळसे किती, कितिक कंदुकाचे परी
खगासम दिनात्ययीं जणुं समस्त आले घरीं ।
तसे प्रखर गोल ते वरिवरी जवें येउनी
निजामपृतनेवरी, करिति ठार शूरा रणीं ॥४१॥ चम. १८

असो. असे आणखीहि अनुवादकौशल्याचे दाखले दाखवितां येतील. विस्तर-भयास्तव येथें अधिक देतां येत नाहींत. तात्पर्य, असा हा भावे कर्वांनीं मूळ संस्कृतमधील कथाभाग उत्तम प्रकारें अनुवादित करून मराठी वाचकांची मोठी सोय केली आहे.

**अलंकार**— कांहीं ठिकाणीं व्यतिरेक, उत्प्रेक्षा, उपमेयोपमान, रूपक, श्लेष इत्यादि अलंकारहि भावे कर्वांनी साधले आहेत. त्यांतहि व्यतिरेक व उत्प्रेक्षा ह्या अलंकारांचींच उदाहरणें अधिक आढळतील. चमत्कार पद्य १८ पूर्वार्ध १२–४०, १३–५ ह्या पद्यांत व्यतिरेक अलंकार साधला आहे. तर

७-२२ व ५-२६ मध्यें उत्प्रेक्षा हा अलंकार आला आहे. उपमेयोपमान हा १८-१ मध्यें आणिला आहे. पैकीं अफजल प्रसंगीं अफजल कपट सांगतांना व्यतिरेक अलंकार साधला आहे. तो लक्ष्यांत घेण्याजोगा आहे. विशेष हें कीं, मूळ संस्कृतांतल्यापेक्षां हें वर्णन सरसहि आहे.

आलिंगनक्षण इभं मृगराडिवैनं
धृत्वा नृपस्य स शिरःप्रविधाय बाह्वोः।
तस्थौ नृपोऽपि बलवान्नखतोऽस्य कुक्षी
शक्त्या बिभेद विशिखो हृचवनौ पपात ॥५९॥ चम. २

ह्याचा मराठी अनुवाद पहा—

संगमवेळीं धरिला म्लेंच्छानें तो शिवाजी बाहूंत।
दाबून मारण्याला इच्छी, ही दुष्टता न राहूंत ॥४९॥
शिखाहीन त्यातें जरी अल्प मानी
तरी तो तया हार जाई न मानी।
नखानें नृपें फोडिता म्लेंच्छ-कुक्षी
पडे तो, तदा शुभ्र होऊन अक्षी ॥५०॥ (५९) चम. २

येथें म्ह. मराठींतील ४९ व्या पद्यांत राहूनहि अफजलाची दुष्टता अधिक आहे हें सांगून व्यतिरेक अलंकार सांधिला आहे. व्यतिरेकालंकाराचें लक्षण, उपमेहून उपमान सविशेष सांगितलें जाणें, असें आहे. पृ. १७७ वर अप्रस्तुत प्रशंसालंकार आला असून पृ. २३६ वर अर्थान्तरन्यासाचें उदाहरण आलें आहे. तें टीपेत दर्शविलेंच आहे.

**उचित मूललोप**—संस्कृत साहित्य-वाङमयावर असा एक आक्षेप आहे कीं, ह्यात शृंगारपर कविता आली कीं, तींत बहुधा असभ्य, अश्लील व चारचौघांत अनुच्चारणीय असा भाग असावयाचा. व त्यामुळें संस्कृत ह्या सजेजीऊ थोरवीच कमी होऊन जाते. असल्या आक्षेपास प्रस्तुत काव्यानहि म्हणजे मूळ संस्कृत शिवकाव्यांत चांगला अवकाश मिळतो. चमत्कार १२ मध्यें बाळाजी बाजीरावाच्या सुखस्वास्थ वैभवयुक्त राज्य-कारभाराच्या वर्णनांत त्याचा वसंतविहार वर्णिला आहे. प्रथम १-१० पद्यांत बाळाजी बाजीराव, राघोबा व सदाशिवरावभाऊ ह्या धान-बंधुत्रयाचा राज्यसंरक्षण, सेनापतित्व व प्रजासंरक्षण ह्यासंबंधींचा गौरवपूर्ण उल्लेख

असून पुढें ११–५० पद्यांमध्यें उपवनवर्णन आलें आहे. म्हणजे फुलझाडें व फळझाडें ह्यांचीं तत्तद्गुणकथक अशीं सरस वर्णनें दिली आहेत. पलाश, आंबा, बकुल, चंपक, अशोक, जास्वंदी, कवठ, ऊंस, बोरें, नारळी, सुपारी, पिंपळ, तुळशी, दवणा, मोगरी, डाळिंब, द्राक्ष इत्यादि वृक्षवेलींचीं उपमा–अलंकार-उत्प्रेक्षांनीं नटलेलीं अशीं वर्णनें आलीं आहेत. आणि त्यानंतर उपवनविहार गायिला आहे. मूळ संस्कृत काव्यांत त्यासंबंधींचीं पद्यें ६२–८८ अशीं आलीं आहेत. पण हीं सर्व पद्यें भावे कवीनीं सोडून दिलीं आहेत. कारण त्यांतील वर्ण्यविषय अतिशय उत्तान शृंगार किंवा उघडानागडा शृंगार असा आहे. अर्थात् हीं पद्यें भावे कवींनी अनुवादिलीं नाहींत हें उचितच होय. अशा उचित मूललोपाचीं आणखीहि ३।४ स्थळें निरनिराळ्या प्रसंगांतील आढळतील.

उचित मूललोपाप्रमाणें उचित मूलांतरांचींहीं उदाहरणें पाहण्यासारखीं आहेत. जयसिंह जेव्हां आपल्या प्रचंड सेनेसह व दळेलखानासह शिवाजीस जिंकण्यासाठीं उत्तरेकडून दक्षिणेकडे निघाला तेव्हां वाटेंत त्यानें देवी भवानीची, पतकरलेल्या कामांत यश यावें म्हणून अनुष्ठानें, यज्ञ इत्यादि धर्मकृत्यें करून प्रार्थना केली. त्यामुळें देवी प्रसन्न होऊन 'तुझे मनोरथ पूर्ण होतील' असा वर तिनें दिला. ह्या प्रसंगीं देवीच्या तोंडचें 'हे वीर ते मनसि यत्सकलं भवेतत्' एवढेंच मूलांत वाक्य आलें आहे. पण भावे कवींनी तेथें

> **तुझ्या यज्ञानें तुष्ट मनीं झालें।**
> **ब्राह्मणांच्या भक्तिनें चित्त धालें,**
> **'पूर्ण इच्छा होईल तुझी आतां'**
> **वदे ऐसे म्लेच्छास जगन्माता ॥३६॥ चम. ५**

असें दिंडी वृत्तांतील एक पद्य दिलें आहे. म्हणजे मूलांतील 'वीर' ह्या जागीं 'म्लेच्छास' म्हणजे म्लेच्छसेवकास, असें पद योजून जयसिंहाचा पक्ष म्हणजे परधार्जिणेपणाचा गुण व्यक्त केला आहे. हें मूलांतर उचित होय.

**टीकानुकरण**—भावे कवींनी आपल्या अनुवादांत, कांहीं ठिकाणीं मूलपद्यांत नाहीं पण पद्यावरील टीकेंत आहे तोहि अर्थ विशेष स्पष्टतेकरितां म्हणून स्वतंत्र पद्य न करतां घेतला आहे. शिवाजी–अफजल–प्रसंगांत उभयसैन्यवर्णनाच्या शेवटीं युद्धाला आरंभ कोणीं केला तें साभिप्राय सांगितलें आहे व तो भाग टीकानुसारी आहे. मूळ पद्य

**यवनभूपतिसैनिकपालका विविधवाद्यविवादनतत्पराः ।**
**कवचिनो रथिनो ध्वजिनोऽखिला रणभुवि व्यसृजन् शरसंहतीः ॥**
९ चम. ३

असें आहे व ह्या पद्याचा अनुवाद—

**वाद्यें वाजवितीं अनेक परिचीं तें म्लेच्छ नानारितीं**
**जे ल्याले कवचें, रथांत बसले होते विचित्राकृति।**
**आरंभीं शरपंक्ति सोडिती, न कीं माहीत मूर्खांप्रती**
**येतो दुर्जय त्या रणीं प्रथम जे युद्धास आरंभिती ॥ ९ ॥** चम. ३ पृ.२८.

ह्याप्रमाणें केला आहे. पण ह्या मराठी पद्यांतील शेवटच्या चरणांत आलेल्या प्रासंगिक न्यायास मूळ संस्कृत पद्यांत आधार नाहीं. त्या पद्याच्या टीकेंत पुरुषोत्तम कवीनें 'यवनसेनापतयः पूर्वं युद्धारंभं चक्रुरित्यर्थः। प्रायः युद्धारंभं प्रथमं कृतवतः पराजयो भवतीति'। असें सांगितलें आहे व त्यावरून भावे कवींनीं आपल्या अनुवादांतील चतुर्थ चरण युद्धन्यायपर केला आहे. अशीं टीकानुकरणाचीं स्थलें आणखीहि आहेत. चमत्कार ८ मराठी पद्य ११ संस्कृतपद्य ८ इ. इ.

मूळामध्यें म्हणजे संस्कृत शिवकाव्यामध्यें कलि हा जेथें तेथें शिवराज्याच्या व साम्राज्याच्या उच्छेदाचें कारण होय, हें जसें सांगितलें आहे; तसेंच 'वृद्धेः क्षयस्य भूपानां दैवमेव हि कारणम्' १९ असा दैववादहि सांगितला आहे. शिवाजी राजांनीं विजापूरकर सुलतानाकडून प्रथमच आलेल्या 'धर्मधुरंधर' ह्या नांवाच्या सरदाराचा शिरच्छेद केला व त्या प्रसंगीं त्या सरदाराबरोबर आलेले अदिलशाही " जे वीर तेथें नृपतीस भ्याले 'त्यांनी शिवाजीकृत विक्रमातें'। सांगीतलें स्वीय पराभवातें." (१३चम.२) तेव्हां अदिलशाहाच्या तोंडीं 'दैवें यशोलाभ तसाचि होतो। चिंता आम्ही व्यर्थ मनीं वहातो' १४ असा दैवविचार घातला आहे. पण मराठी-मध्यें भावे कवींनीं ह्या दैववादानंतर 'सत्यार्थ हा यद्यपि सिद्ध आहे। यत्नाविना गूज करा न राहे ॥' असा प्रयत्नवाद पदरचा घालून पुढें खानाची, आदिलशाही सुलतानानें शिवाजीवर पाठवणी केली तो कथाभाग लिहिला आहे. साराश, मूळांत फक्त दैववादच तेवढा उल्लिखित केला असतां थोडक्यांत प्रयत्नवादाचा निर्देश करून अफजलखानाच्या पाठवणीचें कारण

सूचित केलें. व ही भावे कवींनीं कथानक-जुळणीस योग्य अशी भर आपल्या काव्यात केली हा विशेष लक्ष्यांत घेण्याजोगा आहे. दैववादाचाच दुसरा उल्लेख पुढें चम. १८ श्लो. ५ मधील म्हणतां येईल.

चमत्कार ३ मधील ४२ व्या मूळ संस्कृत श्लोकाचा मराठींत अनुवाद करतांना मूळांतील आदि शब्दाच्या आधारानें उचित भर घातली आहे. मूळ पद्य युद्धांतहि अवध्य कोण कोण तें सांगण्याकरितां आलें आहे. तें असें—

**पचिक्रियार्णोनयनादिकर्म-रता मनुष्या अपि भिक्षुका ये ।**
**भिषग्वराः स्त्रीनिचयाश्च दीनाः शस्त्रैर्विहीना अपि तान्न जघ्नुः॥४२॥**

ह्याचें भाषांतर

**युद्धांत त्या भिषज, भिक्षुक, आणि सूद । स्त्रीसंघ याचक तसे असिहीन योध ।**
**नापीत दीन जलवाहक चर्मकार । यातें रणीं न वधिती बुध हिंदुवीर ॥३९॥**

ह्या पद्यांत केलें आहे. मूलामध्यें पचिक्रिया (पाकसिद्ध करणारे-स्वयंपाकी) अर्णोनयन (जलवाहक), भिक्षेकरी, वैद्य, स्त्रिया, दीनदुर्बल व शस्त्रहीन इत्यादि, हे युद्धप्रसंगीं अवध्य होत असें सांगितलें. आणि भाषांतरांत नापीत व चर्मकार ह्याहि दोघांचा समावेश अवध्यांच्या वर्गांतील म्हणून केला आहे. ह्या ठिकाणीं नापीत शब्दाची व्युत्पत्ति प्रस्तुत पुस्तकांत पृ. ३६ वर टीपेंत दर्शविली आहे ती लक्ष्यांत घ्यावी. ह्या अनुवादक पद्यांत 'असिहीन' हें पद 'योध' शब्दापूर्वीं आलें आहे. हा शब्द प्रासार्थ म्हणून किंवा चवथ्या चरणांतील बुध हिंदुवीर ह्या पदांशीं संबद्ध असा दूरान्वयानें मानावा. पण दोन्ही पक्ष गौणच होत. मुख्यतः ज्या दोन अधिक अवध्यांची भर भाषांतरांत घातली ती येथें दर्शित करावयाची आहे व ह्याप्रमाणें सबंध पद्यच 'माहात्म्याचें जनन असतें सौख्य लोकांस द्याया' हा चरण असलेलेंच चम. १० मध्यें (थोरले बाजीराव ह्यांच्या राजवटीस अनुलक्षून हा श्लोक आहे त्यांत) आलें आहे. पृ. १२२ श्लोक ३४ पहा.

मूळामध्यें अशीच अभिमत भर चमत्कार ३ श्लोक ३२ मधील पद्यांत केली आहे. मूळ पद्य

**'दिनावसाने नृपसैन्यनाथः खलीनलीनाननवाजिसादी ।**
**कृपाणपाणिः सह योधसंघैः पुरोऽभियातो यवनाधिपस्य ॥ ३५ ॥**

असें आहे; ह्याचें भावे कविकृत मराठी पद्य साकी वृत्तांत

नथु नामा जो शिवसेनापति हयारूढ तो झाला।
दिनावसानीं निजयोधांसह यवन-चमूवरि गेला ॥ ३२ ॥

असें आहे. ह्यांत संस्कृतांतील सर्व अर्थ येऊनहि नेताजी पालकराचा नथु ह्या नांवानें निर्देश केला आहे. मूळ पद्यांत हें नांव नाहीं. हें नांव पुढें ४५ व्या संस्कृत श्लोकावरील टीकेंत व मूळ पद्य ५१ मध्यें आलें आहे. आणि तेथेंहि त्या त्या पद्याच्या मराठींतील भाषांतरांत म्हणजे पद्य ४१ व ४८ मध्यें भावे कवींनीं गोविलेंच आहे. पण येथेंहि दर्शित केलें ही युक्त भर आहे. आतां, नेताजीचें नथु हें नामांतर किंवा संस्कृतीकरण चिंत्य वाटतें. एकनाथ, गोपीनाथ, अशांसारख्या नांवांतील नाथ ह्या पदाचें नाथु-नथु हें लघुरूप होईल. पण नेताजीचें नथु हें रूप कसें? अथवा नथु ह्या नांवानें ओळखला जाईल असा नेताजीवांचून अन्य कोणी शिवाजीचा सेनापति ह्या वेळीं असल्याचेंहि दिसत नाहीं. असो. मूळ भिन्न पण उचित भर, चम. १७ श्लो. ३ मध्येंहि आढळून येते. हा प्रसंग सवाई माधवराव यांच्या जन्माचा आहे, मूळांत ह्या ठिकाणीं असें वर्णिलें आहे कीं, सवाई माधवरावांच्या जन्मामुळें सहजच त्यांच्या पित्याचें म्हणजे नारायणरावांचें स्मरण जनतेला होई. अर्थात्च दुःखाश्रु येत. पण लगेच सवाई माधवरावांचें जनन लक्ष्यांत येई व ह्या दुःखाश्रूंचा पूर आटे आणि तो पूर शत्रूंच्या डोळ्यांतून वाहूं लागे.

नारायणं संस्मरतां नराणां यदश्रुपूरो नितरामुवाह।
विहाय तान् तद्रिपुलोचनानि समाससादापभयः स पूरः ॥ ३ चम. १७

भावे कवींनीं ह्यांत भर घालून, दुःखाश्रु आले नि शत्रुनेत्रीं गेले, एवढेंच न सांगतां जनतेच्या ठिकाणीं आनंदाश्रु आले, हें ४ थ्या चरणानें सांगितलें आहे. हें सबंध मराठी पद्य असें.

नारायणा आठवितां प्रजांचे। जे अश्रु ते जाति अपाय साचे॥
आले परी तद्रिपुलोचनांना। तेव्हां नवे अश्रु अपाय नाना ॥ ३ ॥

मूळ संस्कृत पद्यांत ह्याप्रमाणें अशी क्वचित् उपयुक्त भर घालून मराठी पद्यें केलीं असल्याचें दिसून येतें; त्याप्रमाणें मूळांत मूळीच जी घटना वर्णिली नाहीं तीहि मराठीमध्यें स्वतंत्र पद्यें करून सांगितली

आहे असेंहि दिसून येतें आणि हीहि **'स्वतंत्र भर'** इतिहासांत अमान्य नसल्यामुळें भावे कवीची ही रचना अभिनंदनीय व कौतुकास्पद वाटते. चमत्कार १७ श्लोक ४९, ५० मध्यें शक १७१४ मधील फर्मानिवाडी समारंभ व शक १७१६ मधील रंगपंचमीसमारंभ आणि ह्या प्रसंगानें पर्वतीजवळ जी 'दारूची लंका' केली ती दोन स्वतंत्र पद्यें करून सांगितली आहे. ह्या पद्यांस मूळ पुरुषोत्तम कविच्या संस्कृत शिव-काव्यांत आधार नाहीं. अशी अगदीं स्वतंत्र जोड ह्या व आणखी एकाद्याच ठिकाणीं पण आहे.

अफजल प्रकरणांत चम. ३ मध्यें यवनसैन्यांतील सैन्यांच्या टोळीपुढें शिवाजीराजांच्या ध्वजिनीशांनीं म्हणजे सेनानायकांनीं आपल्या एकेक पथकाची योजना केली, एवढेंच मूळ संस्कृत श्लोकांत सांगितलें (द्विषतश्चमूं पुरतः नरपतिध्वजजिनीरतिपालकाः एकगणं विनिधाय०) आणि टीकेंत 'प्रलोभनार्थमिति भावः' असा त्याचा हेतु दर्शित केला. मराठीमध्यें 'हिंदूचे ध्वजिनीश शत्रु—लुटण्या कांहीं चमूं ठेविती । असा त्याचा अनुवाद करून प्रलोभनार्थ म्हणजे लुटण्याकरतां असें सांगितलें. हीहि अभिनव भर म्हणतां येईल

मूळांतल्याची वाढ, मुळांत थोडीशी स्वतंत्र भर, त्याप्रमाणें मुळांतल्याचा संक्षेप व लोपही कांहीं ठिकाणीं मराठी अनुवादांत झाला आहे. वाढ व भर ह्यासंबंधींचीं उदाहरणें वर दिलीं आहेत. संक्षेप व लोप केलेलीं स्थलें थोडींच आहेत, ती अशीं :—चम. ३–११ म्हणजे मूळ ११ व १२ चम. १७ मध्यें संस्कृतांतील ५४ ते ५६; तसेंच चम. ७ मध्यें ७२ ते ७४ ह्या दोन्ही ठिकाणच्या तीनतीन श्लोकांतील सार मराठींतील ५८ व ५७ ह्या एकेकाच पद्यांत आणिलें आहे आणि त्याच म्हणजे ७ व्या चमत्कारांतील ७० व ७१ हीं संस्कृत पद्यें सोडून दिलीं आहेत. वस्तुतः तीं तशीं नाहींत. बाळाजी विश्वनाथ हा शाहूचा पहिला मुख्य प्रधान. तो चंद्रसेन जाधवाला सोडून आणि नारायण रामचंद्र ह्या नांवाच्या एका कोकणस्थ ब्राह्मणाला घेऊन शाहूकडे आला (७१). ह्या पुरुषोत्तम कवीस अभिमत असलेल्या गोष्टी मराठींत अनुवाद करण्याजोग्या आहेत. हीं पद्यें अशीं–

विहाय भूपं स तु चंद्रसेनं । समागतः सद्‌गुणभूषणाढ्यः ।
संगम्य राजानमशोचदेतच्चिंता न कार्या किमपीऽह राजन् ॥
नारायणो महाबुद्धिर्लेखने कुशलः शुचिः ।
राममूनुः कोंकणस्थो वाडवप्रवरोऽस्त्ययम् ॥ ७१ ॥

कांहीं ठिकाणीं मूलाधिक रचना भावे कवीनीं केली आहे. ती दोनतीन प्रकारची आहे. कांहीं स्वतंत्र पद्यंच आहेत, कांहीं पद्यांतून स्वतंत्र चरण आले आहेत आणि कांहीं पद्यांतील चरणांत एकाददुसरें पदच स्वतंत्र दिलें आहे. चम. १ पद्य १५ मध्यें सहसा (अविचारानें) हें पद मूलाधिक व युक्त आहे. मूळ संस्कृत पद्याशीं (१४) ताडून पाहतां ह्या १५ तील पुढले दोन चरण स्वतंत्रहि म्हणतां येतील. ह्याच चमत्कारांतील मराठी १९ व्या पद्यामधील ३, ४ चरणांस मुळांत आधार नाहीं असें टीपेंत पृ. ७ वर पडलें आहे. पण कुभवबंधमोचना ह्यांतील 'कु'ला व 'हे गुरो, त्वरित तारि या जना।' ह्यांतील पुढल्या चार पदांना किंवा चम. ३ पद्य १० चरण ४ ला च तेवढा मूलाधार नाहीं. तसेंच चम. ४ पद्य १३ व १४ मध्येंहि मूलाधिक रचना आहे. टीप पहा. १४ व्या पद्याचें मूळ

' गृहाणि रमणीयानि यन्त्रस्थापनभूमिकाः ।
पश्चादकारयद्राजा जलयानसुसाधनः ॥ १९ ॥

हें आहे. व ह्याचा अनुवाद

अंतर्भागी नंतर देखा । सुंदर केली यंत्रभूमिका ।
शोभते जशी पूर्ण राका । ऐशी शोभा तियेची ॥ १४ ॥

ह्यांतील उपमा स्वतंत्र असून हें सर्वच पद्य मूलाहून सरस आहे. पानिपतयुद्धवर्णनांतीलहि चम. १४ पद्य ३२,३३ स्वतंत्र आहे व ४० हें मूळ ३९ चा विस्तार म्हणतां येईल. थोरल्या माधवरावांच्या अंतकालच्या वर्णनांत चम. १५ मूळ पद्य २६ चा मूलाधिक विस्तार वाचण्याजोगा आहे. तेथें सखारामबापू व थो. माधवराव ह्यांचा संवाद सांगितला आहे.

सखाराम इति ख्यातं मंत्रिवर्यधुरंधरं ।
आहूय वाक्यमवदन्माधवो माधवांशभाक् ॥२५॥

मंत्री सखारामबापू 'शहाणा' । बोलावुनी त्यास एकांति जाणा ।
हिंदुस्वराज्यार्थ चित्तीं भुकेला । गूढार्थ ऐसा नृप बोलिजेला ॥३०॥

हा सगळा संवाद पृ. १८९ वर वाचण्याजोगा आहे. ह्याच चमत्कारांतील पटवर्धनांच्या संबंधींचे उल्लेखहि मूळ व अनुवादित दोन्ही असेच अवश्य लक्षांत घेतले पाहिजेत. पैकीं अनुवादित पद्यें पृ.१८७-१८८ वर आलीं आहेतच. मूळ श्लोक येथें उद्धृत करतों.

**यवनो दक्षिणो वार्धिर्वेलामुल्लंघ्य यास्यति ।**

**इति मत्वा द्विजाधीशमगस्त्यं समकल्पयत् । . . .**

**यशःपटं वर्धयंतः पटवर्धनसंज्ञकाः । सर्वेऽपि ते वीरवराः सर्वे विप्रसुरद्रुमाः**
**ब्राह्मं क्षात्रं द्वयमपि रक्षंतः शीलसंयुताः । औरसं तनयं तात इव पांति प्रजा इमे**

चम. १८ मधील ४३ वा श्लोक हाहि खर्ड्याच्या युद्ध वर्णनाचा विस्तार आहे.

**मूळाहून सरस**—अफजलखानाच्या मृत्यूनंतर खानाच्या सैन्याचा पराभव शिवाजीच्या सेनानींनीं केला ह्या प्रसंगाला अनुलक्षून पुरुषोत्तम कवि व भावे कवि ह्यांनीं एक रूपक केलें आहे. त्याविषयींची स्पष्टता पृ. ३२ पद्य २५ वरील टीपेंत केली आहे. पद्य त्या पृष्ठावर आहेच. मूळ पद्य फक्त येथें उद्धृत करतों, म्हणजे वाचकांना निराळ्या विवेचनाची आवश्यकता नको.

**दात्यूहगृध्रनिचया उपरि भ्रमन्तो । नैवालभन्त वसतिं क्वचित् समेताः ।**
**मन्येऽपकीर्तिपटलं यवनाधिपस्य । शीर्षस्थितं भ्रमति तद्वसतेरभावात्**

अफजलयुद्धप्रसंगांत शिवाजी व खान ह्या दोघांच्या सैन्याचें रणधुमाळीचें वर्णन आहे. संस्कृत पद्य असें—

**उभयसैन्यसमुत्थितरेणुभिर्दश दिशो नितरां परिपूरिताः ।**

**दिनकरो जलदैरिव संवृतः समभवत् घटिकाद्वयमावृतः ॥ ५ ॥**

व ह्याच श्लोकाच्या अनुवादांत भावे कवि कसें वर्णन करतात तें पहा—

**धूलीनें नभ कोंडिलें द्विघटिका, व्यापून गेल्या दिशा**
**भासे दुर्दिनसा मरीचि असली आली जनातें दशा ।**
**झाले वज्रचि हिंदुवीर यवनाद्रीते तया संगरीं ।**
**योद्धा हिंदुनृपाल वज्रधर तो होता गिरीच्यावरी ॥ ५ ॥**

येथें संस्कृतपेक्षां एक रूपक मराठींत अधिक असून तें किती समुचित झालें आहे हें सांगणें नको. असेंच आणखी एक उदाहरण शाहूच्या दातृत्व प्रसंगाचें चम. ११ मधील देतां येण्याजोगें आहे. मूळामध्यें दान देणाऱ्याच्या स्तवनप्रसंगांत कर्ण हा उपमान झाला. पण कोठपर्यंत, तर शाहूचा उदय

होईपर्यंत. ही उपमा भावे यांनीं सहजांत सांगून शिवाय शाहूनें स्वतः नाहीं तरी स्वबाहुवत् असलेल्या बाजीरावादि प्रधानवीरांच्या करवीं 'श्रीमद्दाशरथीमे दुष्ट–वर्ग मर्दियले।' अशा प्रकारें कर्णाबरोबर रामाचीहि उपमा देऊन वर्णन वर्धमान केलें आहे.

कांहीं ठिकाणीं उपमाधिक्य आहे तसें कांहीं ठिकाणीं उपमांतर दिसून येतें व तें मूलाहून सरस वाटतें. चम. ९ मध्यें सदाशिवरावभाऊंचा प्रसंगानें उल्लेख आला आहे. संस्कृतमध्यें

कनीयसस्तु तनयः सदाशिव इति स्मृतः।
स तु वीरः कलावस्मिन् जामदग्न्य इवाभवत् ५७'

असें म्हणून परशुरामाची उपमा सदाशिवरावभाऊंस दिली आहे. पण मराटीमध्यें भावे कवींनी

' सदाशिव हा सुत असे चिमाजीचा।
कलीमध्यें अभिमन्यु दुजा साचा।' ४९

ह्या पद्यांत त्यास अभिमन्यु असें संबोधून मूलाधिक यथार्थता साधिली आहे. व ही गोष्ट धारातीर्थी लढतां लढतां पतन पावलेल्या वीरास सर्वस्वीं साजेशी आहे. ह्या काव्यांत दत्ताजी शिंदे, महादजी शिंदे, दौलतराव शिंदे, पटवर्धन सरदार, नारो शंकर राजेबहाद्दर, नाना फडणीस इत्यादिकांविषयीं उत्कृष्ट वर्णन आलें आहे. पैकीं महादजींच्या वर्णनांतील एके ठिकाणचे चम. १० मधील संस्कृत ७३ व ७५ ह्या दोन श्लोकांचा एकाच श्लोकांत भावे कवीकृत अनुवाद अनुवादचातुरीचें उत्तम उदाहरण म्हणून लक्षांत घेण्याजोगा आहे.

यदीयपाणिस्थितखड्गधारां मन्येऽतुलां कल्पलतां यतः सा।
मर्त्यानमर्त्यान्विदधाति शत्रून्कुप्येतरच्चापि धनं प्रसूते ॥ ७३ ॥
यदीयकरगा खड्गधारा भागीरथी ध्रुवम् *
पापा अपि परे यस्याः स्पर्शनाद्यान्ति दिव्यताम् ॥ ७५ ॥

---

* ह्यांतील 'यदीय करगा' हा श्लोक परिशिष्ट २ व ३ मध्यें बाराव्या आणि तेराव्या चमत्कारांत पुनःपुनः दोन वेळां (२२ व २७) आला आहे. ही परिशिष्टें छत्रपति प्रतापसिंह आणि करवीरस्थ शाहू छत्रपति ह्यांच्या वर्णनाची आहेत.

ह्याचें भाषांतर—

जयाची सुधेसारखी खड्गधारा
अमर्त्यापरी जी करी मर्त्यवीरां।
गमे खड्गधारा न भागीरथी ती
जिचा स्पर्श होतां दिवीं दुष्ट जाती ॥६३॥ चम. १०

असें केलें आहे. महादजींच्या वर्णनांत ह्याच चमत्कारांत आणखी बरींच पद्यें आलीं आहेत तीं सर्व मुळाशीं ताडून पाहतां कांहीं तुल्यगुण तर कांहीं गुणाआगळीं आहेत. सर्वांचेंच मूळ व भाषांतर येथें उद्धृत करणें अवश्य असलें तरी स्थलाभावीं अशक्य आहे.

तरी पण वीर दत्ताजी शिंदे ह्यांच्या वर्णनाचा एक श्लोक उद्धृत करून हा परिच्छेद पुरा करूं. चम. १४, श्लोक ९ असा आहे—

सिंदेनाम्ना प्रसिद्धो जगति जनहितो दत्त इत्याख्ययापि।
सेनानीर्नागकेतुश्चपलहयगतैर्लक्षसंख्यैः सुवीरैः।
युक्तः पूर्वं प्रतस्थे रणभुवि निहतद्वेषिणो दीनपालो
दाता विद्वत्सुरद्रुः स्मरहरचरणांभोरुहद्वंद्वभृंगः ॥९॥

ह्याचा अनुवाद—

नामें दत्ताजि शिंदे स्मरहरचरणा तो भजे सक्तचित्तें
ज्याचे जंघाल वाजी जितपवन असे लक्षसंख्याक होते।
पाता दीना जनांला, सुरतरु विदुषां, कालसा दुर्जनाला
सेनानी नागकेतु, प्रथितयशहि जो तो हि संगें निघाला ॥११॥

मल्हारराव होळकरांसंबंधानेंहि असेंच वर्णन पानिपतयुद्धार्थ निघण्याच्या वेळचें मोठें सुरसपणें आलें आहे. आतां काव्यांत थोडे प्रमाद घडले आहेत ते दर्शवून पुनः सरस स्थलें पाहूं.

कांहीं प्रमादहि ह्या एवढ्या काव्यकृतींत राहून गेले असल्यास नवल नाहीं. शिवराजवर्णनांत शिवाजीचे गुण प्रहर्षिणी वृत्तांत सांगतांना

वक्तृत्वें सुरगुरु, यक्षराट् धनानें
रूपानें रतिपति, काश्यपी क्षमेनें।
भूपें वायुसुतहि जिंकिला बलानें
केलें धन्य निजकुला, असे तयानें ॥१६॥ चमत्कार १ पृ. ६

ह्या पद्यांतील तिसऱ्या चरणांत यतिभंग घडला आहे. भूपें वा युगुतिहि असें वाचावें लागतें. असाच प्रकार—

**दानशूर–युद्धशूर–शास्त्रशूर–पुत्र–सू ।**
**तीच पुत्रिणी, वदा परस्त्रिया शिलाप्रसू ।**
**जो असेल वीर सुज्ञ तोच सैन्य घेउनी ।**
**मद्रिपूस बाहु बांधुनी अणील जिंकुनी ॥ ४ ॥** चम. २. पृ. १६

ह्या चामर वृत्तांतील चौथ्या चरणांत (बां–धुनी) आढळतो. ' चमत्कार १० मधील ४२ व्या पद्यांत—रथोद्धता वृत्तांतील तें पद्य आहे–दुसऱ्या चरणांत 'मार्ग शत्रुहनना मजला–गि दे ' असें म्हणावें लागतें व हेंहि प्रामादिक स्थल आहे.

एके ठिकाणी मूलभिन्न अशी दिलेली कचाची उपमा रसहानिकारक झाली आहे असें वाटतें. मूलांत—

**प्रीतिरत्र ववृधे तदा तयोः कन्यकायवनयोर्नृपात्मजे ।**
**सोऽपि कीर इव भाषितैर्यतस्तंच तां च नितरामतोषयत् ॥६॥** चम. ७

असें पद्य असून त्याच्या अनुवादांत—

**मिष्ट भाषणें शाहु तोषवी, म्लेंच्छजेस तो प्रीति आणवी ।**
**युक्ति आपली त्या दिली कचें । बुद्धि सौख्यदा संकटीं सुचे ॥८॥**पृ. ८४

शाहूला कचाची उपमा दिली आहे. मुळांत पोपटाची दिली आहे व तीच युक्त वाटते.

ह्या काव्यांत म्हणजे संस्कृत मूळ काव्यांत तोफ, दारु, बंदूका, बाण, त्याचप्रमाणें पानसे, निंबाळकर, पाटणकर, रास्ते इत्यादि शब्दांच्या निरुक्ति-पूर्वक शब्दसिद्धि दिल्या आहेत. संस्कृत भाषेंतील हा एक विशेष नेहमीं आढळतो. विशेषतः संस्कृतेतर भाषेंतील शब्दासंबंधानें आणि काव्यप्रसंगात तर अशी रचना ही कविप्रतिभादर्शक मानली जाते; अशा ह्या नैरुक्तिक शब्दांतील सर्वच शब्दसंज्ञा मराठींत आणणें अंमळ अवघड आहे. कारण हा प्रकार भाषाप्रमुख आहे. आणि तो संस्कृतांतच अधिक संभवतो. व एका अर्थी शोभतो. म्हणून भावे कवींनीं ह्या सर्व निरुक्ति अनुवादांत घेतल्या नाहींत. पानसे–शब्द–निरुक्ति मूळांत—

**पनसोपमलोहगोलकाः पनसास्तैः प्रहरन्ति यद्रिपून् ।**
**तव पानसिकाभिधा इमे किल जेष्यन्ति रिपोरनीकिनीम् ॥१६॥** चम. १८.

फणसा एवढाले लोखंडाचे गोळे टाकून जे शत्रूचा निःपात करतात ते पानसे, अशी दिली आहे. अनुवादांत ही निरुक्ति न देतां ' मोठीं विषारी रिपुरूपशेतें । विध्वंसिती सैन्यप पानसे ते (१७ पृ. २१५) असेंच वर्णन केलें आहे. त्यांतील रूपक तितकेंसें समर्थित वाटत नाहीं.

क्वचित् स्थळीं वृत्तदोष आढळतो तोहि दर्शित करतों. चमत्कार ११ मध्यें ४ थ्या श्लोकांत ' मत्संदेश अचरण करी लोक–संताप हर्ता । ' असा चतुर्थ चरण आहे. श्लोक मंदाक्रांता वृत्तांत आहे. ह्या चरणांतील 'आचरण' शब्द वृत्तार्थ 'अचरण' असा करावा लागला आहे. अगदीं अशीच गोष्ट पृ. ९४ वरील " आहे कोणी दुजा हा, अपण नृप म्हणे राज्य यातें न वाहूं " ह्या चरणांतील आ चा अ करावा लागल्यानें घडली आहे.

कांहीं ठिकाणीं भाषादोष झालेले दिसतात. अर्थात् अशीं स्थलें फारच थोडी आहेत; चम. १८ श्लोक ५ मध्यें सुनराम् चें सुनराम असें स्वरान्त रूप म्हणावें लागतें हें अशक्य वाटतें. 'पूर्वीं नरवर रामें नरभक्षक राक्षसाधिपा वधिलें । भगवत्सत्ता नसतां पडतें सुनराम जातिशौर्य ढिलें ।' 'साम्यता' हे दुहेरी भाववाचक नाम १।२६ आलें आहे.

भाषादोषाप्रमाणें क्वचित् अन्यहि प्रमाद वर्णनांत एखाद दुसरा आढळेल. चम. ३ श्लोक ४६ मध्यें मुळांत 'जयिनं तं आलिंग्य' असें आहे त्या जागीं 'निज सेनेला आलिंगन दिलें' हें आलें आहे. तसेंच दोन्ही हात तुटल्यामुळें एक वीर 'तो सर्पसाच डसला रिपुच्या शरीरा । अन्यः **करद्वयविहीनकलेवरोपि सं भुजंगम इव व्यदशत् स्वशत्रुम्** १८ असें मुळांतच अनुचित भावनावर्णन आलें आहे.

पण चम.१५श्लोक २२ मधील मूळांतील 'पश्चाच्च घोलपमुखान् तरियानमंस्यान्' हा चरण भावे कवीकडून गाळला गेला आहे. चम. ७ पृ.५४मधील विरुबाईचाही उल्लेख गाळला आहे हाहि प्रमाद वाटतो. तसेंच पानिपतयुद्धार्थ म्हणून निघालेल्या सेनावर्णनांत दत्ताजीचें वर्णन हा दोषच होय. असो.

**मुळाहून सरस** अशीं आणखीहि कित्येक स्थळें आहेत. तीं सर्वच येथें देण्यानें स्पष्टता पूर्ण होऊन भावे कवीचें काव्यचातुर्य सहज प्रतीत होणार

आहे. पण स्थलाभावीं हें अशक्य आहे. म्हणून कांहीं पद्यें मात्र दर्शित करतों. खर्ड्याच्या लढाईच्या वर्णनांत निजामाकडील सैन्याची दुर्दशा सांगत असतां मूळ संस्कृत पद्यें अशीं आहेत—

अल्लाह्य भल्ला बहुला इहापि प्रयांति 'सल्ला' इति तद्वरं हा ।
फुल्ला इवाभांति पलाशवृक्षा, मल्ला इति प्रोचुरमुष्य योधाः ॥४७॥
प्रकंपनो भूमिरजः प्रगृह्य प्रतिक्षणं धूमचयं तथा च ।
निजामसेनां सकलामनन्यामन्धां चकार प्रभया भृशार्ताम् ॥४८॥

आणि ह्या पद्यांचा अनुवाद पहा—

रक्तें न्हाले, पळस फुलले, म्लेंच्छ तैसे जहाले ।
चित्तीं भ्याले, परत फिरले, शेष कित्येक मेले ॥
अंधा झाली यवनपृतना, वांकडा काळ येतां ।
नानानर्थी पतन घडते, ही असें ईशसत्ता ॥४७॥

तेव्हां सल्ला* बहुत बरवा म्लेंच्छ लोकांस वाटे ।
'अल्ला अल्ला' वदत पळती प्राणदा आडवाटे ॥
हिंदू झाले वृकसम तदा म्लेंच्छ ते भ्याड एण ।
होते लोकीं असुखसुख वा चक्रनेमिक्रमेण ॥४८॥ चम. १८ पृ. २२१

मूळापेक्षां हा अनुवाद किती तरी प्रसादपूर्ण व सरस उतरला आहे. पुरुषोत्तम कवीनीं ह्या श्लोकांवरील आपल्या टीकेंत 'प्रतिकूलदैवस्य सर्वेऽपि प्रतिकूला भवन्ति' असें टीकारंभीं एक वाक्य घातलें आहे.

ह्या काव्यांतील आणखी एका विशेषाकडे वाचकांनीं लक्ष पुरविलें पाहिजे. तो विशेष म्हणजे 'कोंकणस्थ' शब्दाचा पुरुषोत्तमपंडितकृत अर्थ. प्रधान बाळाजी बाजीराव ह्यांच्या राजवटींत कोंकणांतून यष्टिहस्त असे ब्राह्मण महाराष्ट्राचा दुसरा भाग जो देश तेथें पूर्वीपेक्षां बहुसंख्येनें येते झाले. अडचणीच्या निमित्तानें किंवा अधिक उत्कर्षाच्या इच्छेनें अशी ये-जा फार पूर्वीपासून देश व कोंकण या प्रांतांत होत असे. तशी ह्या वेळीं झाली. व ती सांगतांना 'कोंकणांतून जे ब्राह्मण आले ते कोंकणस्थ

---

* सल्ला शब्दाची व्युत्पत्ति 'सतः साधून् लाति आदत्ते इति सल्ला' अशी दिली आहे.

ब्राम्हण' असा सरळ अर्थ ह्या कोंकणस्थ शब्दाचा पुरुषोत्तम कवींनीं सांगितला आहे. कोंकणस्थ ह्या शब्दानें अमुक एक विशिष्ट ज्ञाति असा अर्थ ते सांगत नाहींत.

**कोकणस्था द्विजाः सर्वे यष्टिहस्ताः सपादुकाः ।**
**गुह्याच्छादकवासांसि दधानास्तं समाययुः ॥** चम. ९ श्लो. ३
**द्विज कोकणस्थ आले बाळाजीपंत यांस भेटाया ।**
**आजानुवस्त्र नेसुनी हातीं घेऊनि वेत्र टेकाया ॥ ५ ॥** पृ. १०५

अनुवाद समुचित व सरस आहे. असो. चम. ९ मध्यें कोंकणस्थ असें मोघम म्हटलें व त्यावर टीप नाहीं. पण चमत्कार १० मध्यें 'ये कोंकणस्थास्त्रिविधा अनूपसंस्था महाराष्ट्रभवाश्च ये ते । विद्याविहीना अपि विद्ययाढ्याः समाययुः सर्वत एव सर्वे ॥ १७ ॥ ह्या मूळ पद्यांत कोंकणस्थ म्हणजे त्रिविध असें स्पष्ट सांगून टीकेंत —

**चित्तपावनाः कराष्ट्राः देवर्षयः इति त्रिविधाः । अनुपसंस्थाः समुद्रजलमध्यस्थनगरस्थाः सर्वतः सर्वदेशेभ्यः सर्वे समाययुः।**

ह्याप्रमाणें त्रिविध म्हणजे कोण त्याची स्पष्टता केली आहे. म्हणजे शेवटच्या बाजीरावाच्या काळीं (शक १७४० इ.स. १८१८) कोंकणस्थ ही संज्ञा कऱ्हाडे, देवरुखे, चित्तपावन ह्या सर्वांना लाविली जात असे, असें दिसून येतें. कोकणस्थ शब्दाप्रमाणें 'कोंकणज' हा शब्दहि कवींनीं योजिला आहे. गोविंद कवीन्द्र ह्यानें 'छत्रपति संभाजी चरित्र'संस्कृत काव्यांत लिहिलें आहे. त्यांत संभाजीपुत्र शाहूसंबंधानें गायिलेल्या भविष्यवाणीमध्यें 'आल्हादयिष्यति धनैः क्रूरकोंकणजान्नरान्'। ७८ असें म्हटलें आहे. गोविंद कवींद्राच्या ह्या काव्याचें स्वरूप प्रस्तुतच्या शिवकाव्याप्रमाणेंच आहे. देवादिकांचा वरप्रसाद व त्यावर राजवटीची मांडणी असा भाग त्यांतहि दिसतो. (कोंकणज व कोंकणस्थ हे जर समानार्थी शब्द मानले आणि पुरुषोत्तम पंडित बंदिष्टी यांचा कोंकणस्थ शब्दाचा अर्थ ध्यानांत घेतला तर, क्रूर कोंकणज म्हणजे कोणते कोंकणस्थ? विशेषण वर्णनात्मक मानलें तर सर्वच कोंकणज किंवा कोंकणस्थ क्रूर ठरतील पण विशेषण भेदक असतें. येथें तसेंच आहे. व त्या दृष्टीनें पाहतां क्रूर कोंकणस्थ म्हणजे चित्तपावन, कऱ्हाडे व देवरुखे ह्यांपैकीं क्रूर कोंकणस्थ कोण ? तर विशिष्ट चालीरीती कुलाचार

इत्यादिवरून ध्यानांत येण्याजोगें आहे. 'स्थिरबुद्धिराजाराम' रा. ब. गो. स. सरदेसाई कृत पृ. १६४ मध्ये निराळें व चुकीचेंच लिहिलें गेलें आहे असें वाटतें.

ह्याचप्रमाणें आणखी कांहीं संज्ञाविशेष ह्या काव्यांत आले आहेत व तेही विचारांत घेतले पाहिजेत. 'करतोया*' नदी असें मूळांत आहे. त्याचें 'अटक' नदी हें भाषांतर चम. ८ श्लो. २९ मध्यें आलें आहे. सरोनगर† म्हणजे तळेगांव. तसेंच तोफा, बंदुखा, बाण, दारु, ह्या शब्दांच्या निरुक्ति चम. १८ श्लो. ८, १४ येथें दिल्या आहेत. ह्या संज्ञाविशेषांत संज्ञादोष म्हणतां येईल अशी एक संज्ञा दिसते. चम. २ श्लो. ५१ मध्यें शिवाजीनें अफजलखानास मारल्यानंतर शिवाजी राजा आणि जिवा महाला 'सहर्ष दोघेही नृपगिरीवरी शीघ्र चढले' असें वर्णन आलें आहे. येथें × नृपगिरी असाच शब्द मूळ संस्कृतांतही आहे. नृपगिरी म्हणजे राजगड होईल. पण हा विशेषनाम समजून केलेला अर्थ होय. सामान्यनाम म्हणून अर्थ लावल्यास, राजाचा गड म्हणजे प्रतापगड असा अर्थ करतां येईल. पण पुरुषोत्तम कवींनीं टीकेंत 'राजगिरीं प्रययौ' असेंच दिलें आहे. म्हणजे हें विशेषनामच समजलें पाहिजे व तें मूळांतच प्रामादिक आहे. भावे कवींनीं चम. ३ श्लोक ३ मध्यें 'रसरू' म्हणजे शस्त्राची मूठ हा शब्द योजिला आहे; तो अवश्य लक्षांत घेण्याजोगा आहे. कारण, हा शब्द वेदवाङ्मयांत येतो. व तो कातकरी लोकांत 'थरु' ह्या अपरूपानें आजही बोलण्यांत आहे. हा सबंच श्लोक भावेकवीकृत जवळजवळ स्वतंत्र आहे; व त्यांत ह्या शब्दाची योजना असल्यामुळें भावेकवीविषयीं सकौतुक आदर वाटणें सहज आहे.

**सुभाषितें**—काव्य म्हटलें कीं त्यांत सुभाषितें, विशेषतः चवथ्या चरणांत, यावयाचींच. चांगल्या काव्यांत तर फारच; तशी ह्या काव्यांत पुष्कळच आलीं आहेत. नुसतें सुटें सुभाषित वाचण्यास वा म्हणण्यास बरें वाटावें, हा सुभाषिताचा धर्मच आहे. पण ज्या प्रसंगवर्ण-

---

* करतोया-नदीवारि पायंयित्वा तुरंगमान् ।
अग्रे गंतुमयुक्तत्वाद् ब्राह्मणः स न्यवर्तत ॥२४ चम. ८

† सरोनगरमागतान् पदचरानरीन् संगतान् ।
निशम्य शमिताद्विपद्द्विजपतिः स नानाभिधः (१३) चम. १७

× जीवाख्य वीरवरराट् त्वरया स तस्या च्छित्वाशिरो नृपगिरिं प्रययौ नृपश्च।

नांत तें आलेलें असतें तो लक्षांत घेऊन नंतर तें सुभाषित वाचलें म्हणजे त्याची गोडी सविशेष आहे. उदा. निजाम पुण्याकडील प्रांत उध्वस्त करण्यास आला असतां मराठ्यांनीं त्याच्या प्रांतांत जाऊन इतकी दुर्दशा करून सोडली कीं, "निजपट्टण रक्षाया यवनानें सांडिलें पुणें नगरा" आणि हें मराठ्यांनीं कोणच्या न्यायानें केलें, तर

'सर्पा पय पाजूं नये, वर्मी ताडूनि नाशिजेचि गरा' चम. ६. ५३

तर ह्या न्यायानें. आतां, हा निजाम–मराठ्यांच्या झुंजेचा समय ह्या काव्यांत चुकीचा समजला गेला; पण आपण ह्या काव्याकडे केवळ वर्णनदृष्ट्याच पाहात आहों. असो. चम. १८ मध्यें 'होतें लोकीं असुख सुख वा चक्रनेमिक्रमेण' किंवा 'हर्षामर्ष-प्रकर्षे सुयशकुयश वा होनसे योग्य काळीं।' चम. २० मध्यें 'कर्तव्या आचराया कधि न दचकणें, जाणणें, पुण्यपाप' अशा पंक्ति ठिकठिकाणीं ह्या काव्यांत आल्या आहेत. शिवाजीच्या कथेंत तर बऱ्याच आढळतील. 'सल्लोक स्वीय धर्मी निरत नच कदां सोडिती सत्पथाला' चम. ३ श्लो. ८. 'परां वश न होति जे कुलज, हें असें सत्य जी' ६५ चम. ७. इ. इ.

ह्याशिवाय पुत्र, पत्नी, मित्र ह्यांचीं कर्तव्यें काय; राजा वीर आणि पंडित ह्यांचा संग्रह करतो ह्यांत त्याची कोणती अपेक्षा असते; म्हणजे पदरच्या वीरांचें किंवा पंडितादिकांचें कर्तव्य काय ह्यासंबंधींचे उल्लेख पाहण्याजोगे आहेत. ते मुळांतूनच वाचकांनीं पाहावे. दिवसां नक्षत्रें कां दिसत नाहींत; नक्षत्रावर बत्ताशांचें रूपक, हीं चमत्कार ९ मधील ६५ ६६ पद्यें संस्कृतांशीं आदीं तुल्यगुण असून त्यांतील कल्पना अभिनव आहेत.

**आधार**—ह्या शिवकाव्यांत जें इतिहासवृत्त आलें आहे, त्यास ऐ. साधन ग्रंथांत कोठें कितपत आधार मिळतो हें येथें थोडक्यांत पहावयाचें आहे. संस्कृत मूळ शिवकाव्यकर्त्या पुरुषोत्तम कवींनीं आपल्या काव्यांत कांहीं प्रत्यक्ष दृष्ट असें इतिहासवृत्त दिलें आहे, तर कांहीं ऐकीव, कांहीं काल्पनिक व रूपक करून दिलेलें आहे. काल्पनिकांतही दोन प्रकार सांगतां येतील. पहिला प्रकार म्हणजे ऐ. घटनाच, पूर्वजन्मार्जित वार–उधार इत्यादि प्रकारें घडलेली सांगणें–उदा० नारायणराव पेशवे ह्यांचा झालेला वध. (चमत्कार १६ पहा) ह्यांत नारायणराव हा

पूर्वजन्मीचा एक सिद्ध पुरुष होता. पण त्याच्या हातून प्रसंगानें दूतहत्या घडली, व त्या दूतानें मरतांना जो त्या सिद्ध पुरुषास शाप दिला म्हणजे मीहि असाच तुझा वध करीन असें जें म्हटलें, त्या अनुसार त्या सिद्ध पुरुषाचा म्हणजे नारायणरावाचा मृत्यु घडला.

उवर्तवमीशो भगवान् गजास्यस्तिरोदधे सावपि तं प्रणम्य।
कालेन देहं विनीधाय भूमौ बल्लाळाख्यां पुनरेव जात: ॥१५॥
नारायणाख्यां प्रगत: स एव य: कालनामा स तु खड्गसिंह:।
यो बालनामा सुमरादिसिंहो गोपालनामा तु तुलाजिनामा ॥१६॥
य उद्धवोसौ निजदैवयोगान् म्लेंच्छत्वमागत्य पुनश्च भूय:।
बभूव तस्यैव सदा प्रमत्तो बिभ्रामनामा विशिखाधिराज.। ॥१७॥
गौरेव गौ: सा पुनरेव जज्ञे नारायणस्यैव गृहे सुरूपा

ह्याप्रमाणें पेशवे नारायणराव, खरगसिंह, बाळाराम सुमेरसिंग, तुळ्या पवार, अबदुल कादर, महमद इसफ इ. हे पूर्वजन्मीचे संबंधी होते व वधप्रसंग घडला. हें सर्व रूपक काल्पनिक आहे. काल्पनिकांतील दुसरा प्रकार शिवाजी, थोरले बाजीराव व शाहू छत्रपति यांचें तोंडीं गंगा, गोदा, कृष्णा, ह्या नद्यांच्या स्तुतिपर घातलेलीं अष्टकें (पृ.६४, १०९, १४०) आणि विठ्ठल दर्शनपर श्लोक (पृ.८७.) पहिल्याच्या मानानें दुसरा प्रकार क्षम्य म्हणतां येईल. काल्पनिकानंतर ऐकीव जे वृत्त कवीनें दिलें त्याचे आधार पाहण्यापेक्षां पाहिलेलें म्हणून जें वृत्त कथन केलें तद्विषयक आधार पाहणें हें अधिक इष्ट. असें वृत्त १७ ते २० ह्या चार चमत्कारांत आलें आहे. १७ व्या चमत्कारांत सवाई माधवरावांच्या जन्माचें वर्णन प्रथमच आलें आहे. पुरंदर गडावर अधिक वैशाख (श. १६९६) महिन्यांत 'धवल सप्तमि योग दिवा भला। अभिजितीं प्रभु माधव जन्मला' हें सांगून ह्या वेळीं 'मधुर कोमल दुंदुभि वाजती। गृहिंगृहीं गुढियाहि उभारती' इ. मोठा थाट व सर्वत्र आनंदी-आनंद झाला.चें सुरस वर्णन केलें आहे. आणि त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें —आतांही क्वचित् दिसून येते.—स्त्रियांनीं हेल घातले, तेहि सांगितलें आहे. 'शिरीं पूर्ण कुंभास घेऊनि नारी। मुदें ओतिती राजवाड्यांत वारी॥ शचिप्रेरिता त्या वधू अप्सरा हो। न का गांग तें तोय अद्यापि वाहो ४ (पृ. १९८) ह्याच अर्थाचें आणखी एक पद्य आलें आहे तें प्रसंगानें वरील

विवेचनांत पृ. ६ वर आलें आहे. हें सर्व वर्णन अतिशयोक्त वाटलें तरी काव्यांत युक्तच आहे. आणि वस्तुस्थिति लक्षांत घेतली तर त्यांत अतिशयोक्ति नाहीं असेच म्हणणें प्राप्त होईल. ऐ. ले. सं. भा. ५ ले. १६३० पृ. २१४६-४७ वर "हेल करणी बाइका मराठ्यांच्या ११ दिवस पाणी घालीत असतात. त्यांस बारामती, सुपें, फलटण, वाई, सासवड तालुक्याच्या व पुण्याच्या गांव खेड्याच्या म्हणतां ७।८ हजार झाल्या. त्यांस लुगडीं व चोळखण याप्रमाणें दिलें. पुण्यांतील वाड्यांतील बायका १० हजार झाल्या त्यांस चोळखण दिलें. मोठा संतोष झाला." हें पत्र स. माधवरावांच्या जन्मानंतर पुरंधरगडावरून व पत्ररवड्यांतच आलेलें आहे. ह्यावरून सहस्त्रावधी व सर्व ज्ञातीच्या सुवासिनींनीं हेल घातले व त्या पाण्याचें हें वर्णन आहे हें ध्यानीं घेतलें म्हणजे काव्यांतील वर्णनाची व त्याची यथार्थता पटेल.

ह्यापुढें तळेगांव येथें राघोबादादांना घेऊन पुणें राजधानीवर इंग्रज कंपनीनें जी अयशस्वी स्वारी केली तिचें वर्णन आलें आहे. मुंबईकर इंग्रजाचा अगदीं सोळा आणे पराभव ह्या वेळीं झाला. इंग्रज जसजसें घाट चढून वरवर म्हणजे पुण्याकडे येत, तसतसें त्यांचें अन्नपाणी तोडून त्यांस मुळांतच हैराण करण्याकरितां आसपासचीं गांवें अगदीं उध्वस्त व शुद्ध ओसाड करून धान्य, गवत इत्यादि कांहीं न मिळण्याची व्यवस्था मराठ्यांनीं केली. त्यांत न जाणो 'सुरा-मांस-भक्षी परद्वीपवासी। असे हूण आले लढाया पुण्याशीं ॥' तर पुणें येथेंही त्यांस कांहींसुद्धां हातीं लागू नये म्हणून 'पुणें गांव सारेंच उध्वस्त जालें। तदा लोक ते आडमार्गें पळाले ॥' असें वृत्त पृ. १९९-२०२ वर आलेलें आहे व तें ऐ. ले. सं. भा. ७ मधील ले. २४६०-६१ इ. पत्रांनीं समर्थित होत आहे. ह्या ठिकाणीं बाल पेशवा स. माधवराव यांची एक लीला सांगितली आहे. म्हणजे तळेगांव-लढाईंत आपणांस जय मिळतो न मिळतो अशी शंका जासूद शिपायाला आली, हें बाल माधवरावांना कळतांच त्यांनीं खेळांतील भाग म्हणूनच धनुष्य घेऊन एक बाण सोडला व म्हटलें 'रिपूस वधिलें कधीं मित्र-दलीं त्वरे जा मुदा ॥' हीच गोष्ट पेशवेबखरीमध्यें पृ.९९वर तरवारीचा हात केला, ह्या बदलानें दिली आहे. ह्यानंतर

'स्टुअर्ट अभिधा जया, वदति लोक ज्या फाकडा ।
पहा सुजन हो तया समय पातला वाकडा ।।
न धान्य तृणही मिळे बल समस्त झालें ढिलें ।
म्हणूनि रण सोडिलें स-बल इष्टुरें निष्ठुरें ।। २० ।।

असा श्लोक देऊन इंग्रज परत मुंबईस गेल्याचें सांगितलें आहे हा श्लोक मूळ संस्कृताचें अगदीं समवृत्त भाषांतर आहे. असो. यापुढें 'हर्षे पुण्यास विजयी नृप, सैन्य आलें' आणि 'केली अपार धन खर्चुनि राज-मौजी ।' ह्यानंतर पुणें वैभव वर्णन मोठें सुरस आलें आहे. व त्यापुढें ग्रीष्म व शरद ऋतूंचें वर्णन एकेका श्लोकांत आलें आहे. त्यांत उन्हाळ्यांत दिवस मोठे कां आणि हिवाळ्यांत दिवस लहान कां ह्याचें कारण दोन उत्प्रेक्षा करून सांगितलें आहे, तें पृ. २०६ वर अवश्य पाहावें. यापुढें फर्मानवाडी, दारुलंका, रंगपंचमी समारंभ हे थोडक्यांत म्हणजे दोनच श्लोकांत सांगून सेनापति हरिपंत फडके आणि महादजी शिंदे ह्यांचें निधनानें महाराष्ट्र राज्यास आतां ओहटी लागणार हें सूचित केलें आहे. आणि नंतर सबंध १८ व्या चमत्कारामध्यें खर्डें येथील पेशवेकृत निजामाचा पराभव सविस्तर वर्णिला आहे. ह्या दोन्ही म्हणजे १७ व १८ मध्यें हा जो खर्डें येथील रणसंग्राम कथन केला आहे तो सर्व प्रत्यक्ष दृष्ट असाच वर्णिलेला आहे, हें तें वर्णन वाचीत असतां वाटेल. इतकेंच नव्हे, तर संस्कृत कवि पंडित पुरुषोत्तम ह्याच्या प्रत्यक्ष पाहिलेल्या ह्या भागाच्या वर्णनांतील विशेष मराठींत भाषांतर करणाऱ्यांचे लक्षांत न येणें साहजिक असल्यामुळें तसें थोडें वैगुण्यहि बारीक पहाणाऱ्यांचें लक्षांत येईल. उदाहरणार्थ, निजामाकडे ह्या वेळीं रेमंड ह्या नांवाचा युरोपीय अधिकारी असून त्याच्या हाताखालीं पायदळ कपू असे. आणि हें सांगण्याकरितां मूळांत 'पदातयो गौरमुखाः' असा प्रयोग निजामाकडील सैन्यवर्णनांत आला आहे. पण 'गौरमुखाः' ह्या पदविशेषाचें स्वारस्य लक्षांत न आल्यानें 'पदाती' ह्या एका सुट्या पदानें त्याचें भाषांतर केलें आहे. बाकी, सीना व खरी ह्या नद्या, खर्डें हें गाव, निजाम सैन्यांतील वारांगनांचा समुदाय, पाण्याचें दुर्भिक्ष, निजामाकडील रघुनाथराव हैबतराव हा मीर आलमच्या बरोबरचा गृहस्थ तहाच्या वेळीं बोलण्यास येणें, पटवर्धनांची फौज किंचित् माघारी वळतांच शिंद्यांचे

सैन्यानें दाखविलेला पराक्रम इ. इ. आलेलें वर्णन सर्व प्रत्यक्ष पाहिलेल्यानेंच करावें असें उतरलें आहे. व त्यास प्रत्यक्ष खं ५, इ. सं. ऐ. टिपणें मधील पत्रांचा आधार मिळतो. कवी वर्णित वृत्ताशीं समकालीन असल्याचें ह्याच म्हणजे १८ व्या चमत्कारांत श्लोक २९ मध्यें 'विख्यातं खरडाभिधं भुवि पुरं क्षाराल्पपाथः पदं । यस्मिन् मे वसतिः स्ववर्गसहितस्यासीत् समा द्वादश ॥' बारा वर्षें मी विख्यात अशा खरडासंज्ञक गांवीं सपरिवार राहात आहे' तेथें 'खारें तसें स्वल्पचि नीर बाहे' असें स्पष्टच सांगत आहे. शिवाय कवीनें आत्मवृत्त २० व्या चमत्कारांत पृ.२३३ वर सांगितलें आहे. पुरुषोत्तम कवि हा वर्णित विषयाशीं पूर्णसमकालीन असल्याचें दुसरें प्रत्यंतर चम. १३ श्लोक २२ व २३ मध्यें स्पष्टपणें आलेलें आहे. इतिहासप्रसिद्ध नारो शंकर राजेबहाद्दर यांचा उल्लेख, ते ससैन्य युद्धार्थ निघाले तेव्हां आला आहे आणि तेथेंच कविकालापर्यंतचा राजेबहाद्दरचा वंश 'जनस्थानेऽत्र वर्तते ।' असें सांगून दर्शविला आहे. नारो शंकर नामकः शत्रुक्षतनूनपात् । . . . नारायणस्य तनयस्त्र्यंबकाख्य उदारधीः । भैया-नामास्य तनयो जनस्थानेऽत्र वर्तते २२. नारो शंकराचा त्र्यंबक व त्र्यंबकाचा माधवराव ऊर्फ भय्या हा पुत्र होय. हे भय्यासाहेब शके १७५० (अश्विन शु. १४) मध्यें मृत्यु पावले. आणि हें शिवकाव्य टीकेसह श. १७४८ मध्यें पूर्ण झाल्याचें वर आलेंच आहे. ह्यावरून राजेबहाद्दरांच्या नाशिक शाखेशी पुरुषोत्तम कवि हा अधिक आपलेपणानें संबद्ध असावा असेंही स्पष्टपणें दिसून येतें. असो; भावे कवींनीं हा २२ व २३ श्लोक गाळला आहे. कारण ह्यापुढील श्लोकावरील टीकेच्या प्रारंभीं 'प्रासंगिकं समाप्य' असें कवीनेच सांगितलें आहे. ह्या काव्यांत सदाशिव माणकेश्वर हा जो दुसऱ्या बाजीरावाचा कारभारी तो रामभक्त असून त्याच्या पत्नीचें नांव उमा होतें (उमाप्रियं राघवदत्तचित्तं । उमानाम्नी प्रिया यस्य तं सदाशिवं–टीका) ही बारीक पण नवीन गोष्ट येथें कळत आहे. तसेंच अल्फिन्स्टनशीं मराठ्याचें युद्ध आश्विन वद्य ११ स झालें. (श.१७३९) त्याचा निर्देश 'एकादश्यां उपोष्य . . . यान्त्येवं तेऽत्र सर्वे भटनिचयशिखे वेनुरल्फिन्स्टनोऽग्नौ' अशा प्रकारें दिला आहे (चम. २० श्लो. ३५). असो. मूळ संस्कृत शिवकाव्यकर्त्या कवीनें आपल्या काव्यांत प्रत्यक्ष

दृष्ट असा जो भाग वर्णिला त्याचें आधारसहित विवेचन येथवर थोडक्यांत केलें. ह्यापुढें अमृतराव पेशवे यांची थोडक्याच महिन्यांची राजवट चमत्कार १९ मध्यें ५।७ श्लोकांतच सांगून शेवटच्या म्हणजे २० व्या चमत्कारांत 'ज्याला क्षात्रगुणांश लेश नव्हता.' त्या शेवटच्या बाजीरावाविषयीं हकीकत दिली आहे. ह्या चमत्काराच्या प्रारंभीच टीकेंत कवीनें सांगितलें कीं आहे कीं, 'अथ बाजीराजस्य चरमस्यास्य चरितं साध्वसाधु* च तत्र साधु प्राय: श्लोकश्रवणमात्रेणावबुध्यते । असाधु गुप्तं तत् व्याख्यायते स इति। ह्याप्रमाणें ह्या काव्यांत जो कविदृष्ट असा भाग आला आहे त्यासंबंधानें थोडक्यांत स्पष्टता केली. याशिवाय जो भाग ऐकीव म्हणूनच आला आहे त्याविषयीं विशेष लिहिणें नको. कारण मूळ संस्कृत कवि हा पुराणीक वृत्तीचा व 'कलिविलास' म्हणून आणि 'मज नाहीं मनुज वर्णनी प्रेमा' सांगून काव्यास प्रवृत्त झालेला आहे. इतिहासाचें पुराण म्हणून कथन करणारा कवि असला तरी त्याच्या ऐकीव कथाभागांसहि आधार सांपडतो. शिवाजीनें जलदुर्गासाठीं समुद्रकांठीं उपोषण–पृ. ४०, ४१–ह्या गोष्टीचा शिवप्रताप बखरींतही उल्लेख आला आहे. पहा पृ. १२४. चार वर्षांत शिवाजीनें ३६० किल्ले बांधले; शहाजीचें शिवाजीस समर्थांशीं 'वैर करूं नये' इ. . त्याविषयीं प्रस्तावनेंत व येथें वर निरनिराळ्या प्रसंगानें स्पष्टता झाली आहे. जयराम जजांकित नामक एक कवि (त्रै. व. ३ पृ. ४६) दुसऱ्या बाजीरावाची स्तुति करणारा होऊन गेला. त्यापेक्षां हा पुरुषोत्तम कवि विशेषत: मराठीत भाषांतर करणारे भावे कवि यांनीं 'झाला अंतिम बाजी दुर्नृप जसा उंदीर पासोडिला' असें स्पष्ट व यथार्थपणें सांगितलें आहे. शिवाजी राजांनीं 'वाजसनेयास यौवराज्य दिलें' हा उल्लेख पंडित कवींच्या मतानें प्रतिनिधींना अनुलक्षून दिसतो. १५० वर्षांच्या सबंध शिवराज्यांत प्रत्यक्ष यौवराज्यत्व असें कधींच कोणाला दिल्याचें आढळत नाहीं. पण छत्रपतींच्या खालोखाल सर्वाधिकारी म्हणजे युवराज असें मानिल्यास आणि तोहि वाजसनेयीशाखेचा हें येथील उल्लेखानुसार लक्ष्यांत घेतल्यास पुरुषोत्तम पंडितांना परशराम त्र्यंबक पंडित प्रतिनिधि हे अभिप्रेत दिसतात. परशराम पंडित एकदां (श. १६१७ इ. १६९५) मुख्य प्रधान म्हणजे पेशवे होते. शिवाय, गोविंद दीक्षित दैवज्ञ ह्यांनीं आपल्या 'मुहूर्ततरंगिणी' ह्या

ग्रंथांत 'यः साक्षाच्छिवभूपतेः प्रतिनिधिस्तत्कार्यपूर्तिक्षमः। सर्वामात्य-धुरंधरः परशुरामाख्योऽभवत्त्र्यंबकात्' (इतिहास मंडळ १८३६ इतिवृत्त पृ. १६१-६२) असेंच म्हटलें आहे. पण हें कालदृष्टया जमत नाहीं असो.

आणखीही कांहीं स्थलें ह्या विवेचनांत घ्यावयाचीं राहिलीं. उदा. चम. ७ मध्यें कवीनें 'भ्रमण' नांवाचा खेळ उल्लिखित केला आहे पृ. ८८. जयपुराकडून थो. बाजीरावाकडे आलेला पंडित बाळकृष्ण इ. पण झाला हाच विस्तार अधिक झाला यामुळें येथेंच थांबणें भाग आहे. प्रारंभीं म्हटलें आहे कीं, ह्या काव्याची मूळ संस्कृत पोथी संग्रहांतून आढळत नाहीं. पण कळविण्यास आनंद वाटतो कीं, भां. रि. इन्स्टि., श्री. गो. रा. राजोपाध्ये सातारा, श्री. दि. ग. केळकर पुणें इ. च्या संग्रहीं ह्या काव्याच्या प्रती असल्याचें कळतें. असो. ह्या विवेचन प्रसंगीं आणि काव्यास अर्थबोधक टीपा देतांना गुरुवर्य गो. कृ. मोडक शास्त्री यांच्या झालेल्या प्रेमळ साह्याचा निर्देश करणें हें माझें कर्तव्य आहे. प्रकाशक श्री. भावे यांनीं झालेला विलंब मानून घेतला ह्याबद्दल व आचार्य लिमये व डॉ. लागू ह्यांनीं ह्या कामीं दिलेल्या प्रेरणेबद्दल आभार व्यक्त करून आणि मराठी शिकलेल्या बिनपदवीच्या अध्यापकादि मंडळींनीच ह्या महाराष्ट्रेतिहास-संशोधनव्यवसायांत उल्लेखनीय कामगिरी केली हें जें राजवाडे व न्या. रानडे ह्यांनीं म्हटलें तें ह्या प्रसंगीं आठवतें हें सांगून हें विवेचन पुरें करतों.

**शंकर नारायण वत्सजोशी**

भा. इ. सं. मं. पुणें.

# अनुक्रमणिका

नांवामागील अंक प्रकरणाचा व पुढील आंकडा पृष्ठाचा समजावा

---

# शिवकाव्यांतील वृत्तें

१ अनुष्टुप
२ आर्या
३ इंद्रवज्रा
४ उपजाति
५ उपेंद्रवज्रा
६ उमा
७ ओवी
८ कामदा
९ चामर
१० तोटक
११ दिंडी
१२ द्रुतविलंबित

पद
१३ पृथ्वी
१४ पंचचामर
१५ प्रहर्षिणी
१६ भुजंगप्रयात
१७ मदिरा
१८ मालिनी
१९ मंदाक्रान्ता
२० मंदारमाला
२१ यूथिका
२२ रथोद्धता
२३ ललित

२४ वसंततिलका
२५ वैश्वदेवी
२६ वंशस्थ
२७ शार्दूलविक्रीडित
२८ शालिनी
२९ शिखरिणी
३० शुद्धकामदा
३१ सवाई
३२ साकी
३३ स्रग्धरा
३४ स्रग्विणी
३५ हरिणी

---

मातृपितृ चरणीं



'गंगातर्पण गांगे०' ह्या न्यायानें
हा 'मराठी शिवकाव्य' ग्रंथ

अर्पण

—हरि वासुदेव भावे

—कवि भावे ह्यांनीं पूर्वार्धाच्या प्रथमावृत्तींत स्ववृत्त दिले ते श्लोक—

" आहे भिल्लवडी म्हणूनि बरवें कृष्णातटीं ग्राम जें
भावे-नामक कोकणस्थ-वसती तेथें स्वभूभक्त जे।
त्या वंशीं नव वासुदेवकवि हा झाला असे जन्मता
ज्याचा भास्कर तात आणि जननी गोदावरी सन्नुता. १

आधीं श्रीशिवकाव्य हें रचियलें पुरुषोत्तमें संस्कृतीं
त्याचें हें, विविधार्थ सोडुनि, पहा, केलें असें प्राकृतीं।
येतें कीं मुळच्या कृतीहुनि जरी भाषांतरीं न्यूनता
तैशी मत्कृतिमाजिही, अनय हा मातें न लागो वृथा. २

टाकोनी विविधा कथा हरिचिया कैवल्यदा रंजना
कैसा मी स्तविण्या नरास सजलों सांगेन आणा मना।
आहे हिंदुजनांत शौर्य बरवें, जें शत्रु-चित्तीं सलें
त्याचें हें नव काव्य सूचक मला होईलसें भासलें. ३

सुज्ञांनो! प्रथमा मदीय कृति ही आहे म्हणोनी हितें
द्यावा मानचि जे तुम्हास गमती त्यागोनिया दोष ते।
संरक्षो तुमची कृपा सुजननी, तारुण्य येवो वया
आहे मी लघु बाळ रांगत पुढें लागेन चालावया ४

साकी

संस्कृत-माताभाषेची ही प्राकृतभाषा कन्या।
बाळपणीं जरि हूड भासते यौवनींण होइल धन्या।
यास्तव रसिकानें। हीतें रक्षावें मानें ५

# श्रीशिवकाव्य

## चमत्कार १

### मंगलाचरण

**१. श्रीरामवंदन** ( शार्दूलविक्रीडित )

भस्मोद्धूलित[1] देह, नेत्र निटिलीं[2], शोभे शिरीं चंद्रमा,
दक्षाची[3] दुहिता[4] रमे प्रतिरमा[5] ती वामभागीं उमा ।
ज्याचे सन्मुख अष्ट भैरव[6] उभे, तो शंभु ज्यातें नमी,
श्रीमद्राघव* तो नमून मग हें आरंभिलें काव्य मीं ॥१॥

---

सूचना—(१) ह्यापुढें ह्या मराठी शिवकाव्याच्या मूळाचा म्हणजे पुरुषोत्तम-कविकृत संस्कृत शिवकाव्याचा निर्देश पु. सं. ह्या संक्षेपानें केला आहे.
(२) पद्याच्या वर पद्यांतील विषय दर्शविला आहे व त्यापुढें कंसांत पद्याचें वृत्त दिलें आहे आणि (३) पद्याच्या अंत्यचरणापुढें कंसांत दिलेला आंकडा, हें पद्य मूळांतील ज्या पद्याचा अनुवाद आहे त्या संस्कृत पद्याचा क्रमांक होय असें समजावें.

१ भस्मानें भरलेला. २ कपाळावर. ३ स्वायंभुव मन्वंतरांतील राजा दक्ष त्याची. ४ मुलगी. ५ दुसरी लक्ष्मीच जणु. ६ असितांग, रुरु, चंड, क्रोध, उन्मत्त, कापाल, भीषण व संहार हे आठ भैरव. मूर्तिविज्ञान, पृ. १२३. *हा श्लोक पुरुषोत्तम-कविकृत मूळ संस्कृत शिवकाव्यांतील श्लोकाचें भाषांतर

(पुढें चालू)

## श्रीविष्णुवंदन ( उमा )

पाद सुरेख[१] सुकोमल नीर[२]-ज-पत्रपरी, कटिं पीतपटी[३],
नीरदवर्ण[४] तनू, तुलसीदलमालहि कौस्तुभ वक्षपुटीं[५] ।
शंखगदादि करीं रुचिरायुधसंघ[६], सुपंकजलोचन[७], तो
मस्तकिं चारु[८] किरीट विराजत, **मापति**[९] मी प्रथमीं नमितों२ (१)

## श्रीशंकरनमन

श्रीगणनायक पीत असे स्तन, त्या शिव चुंबित लोभभरें[१०],
अन्य सुवस्तुहि पुत्रमुखासम चारु[८] न वाटति, हेंचि खरें ।
अस्तु, शिवाननिं दुग्धतुषार सुवर्षति सूनुमुखांतुन[११] हो[१२]!
यास्तव लज्जित जो **गिरिजापति**[१३] तोहि अम्हांस शिवप्रद हो[१४]
॥३॥ (२)

---

नाहीं; भावे-कविकृत स्वतंत्र आहे. ह्यावरून व पुढें आलेल्या नवव्या श्लोकावरून मराठींत शिवकाव्य करणाऱ्या ह्या भावे-कवींचें 'राम' हें उपास्य दैवत आहे असें दिसतें.

१ उत्तम भाग्य दर्शविणाऱ्या सामुद्रिक रेषाचिन्हांनीं युक्त. २ कमळ. ३ पिवळें वस्त्र. ४ मेघाप्रमाणें कांति असलेली. ५ छातीवर. ६ 'दक्षिणाधः-करक्रमात्' म्हणजे उजव्या खालच्या हातापासून उजवा वरचा, डावा वरचा, डावा खालचा ह्या क्रमानें गदा, पद्म, शंख, चक्र हीं उत्कृष्ट आयुधें हातांत घेतलेला विष्णु. छंदाकरितां 'शंखगदादि' असें उक्तक्रमाविरुद्ध आलें आहे. ७ सुंदर कमळाप्रमाणें नेत्र असलेला. ८ सुंदर. ९ लक्ष्मीपति = विष्णु. १० प्रेमातिशयानें. ११ पुत्रमुखांतून. १२ संबोधनार्थी किंवा आश्चर्यार्थी. १३ पार्वतीपति = शंकर. १४ होवो. देवतामूर्तीचें वर्णन पायापासून मस्तकापर्यंत असा चढत्या क्रमानें करावयाचें ह्या नियमाप्रमाणें हें वर्णन आहे.

### श्रीगणपतिवंदन (भुजंगप्रयात)

उरवरीं[1] बसवूनि उमेप्रति शंकर खेळत देवन-केली[2],
दुग्ध पिण्यास्तव हस्तिमुखें[3] नयिं लोळण घेउनि घाइच केली।
[2]देवन-सक्त असे मन, यास्तव त्यां सुतरोदन[4] नायकवेची[5]
यास्तव कौतुकसे **गणनायक**; तो मज देउ सुबुद्धि कवीची ! ॥४॥(३)

### श्रीसूर्यवंदन

संनमिती[6] द्विजदेव जयाप्रति, जो स्वजनां भवसागरनौका,[7]
कर्मपथाप्रति[8] दर्शवुनी, तम नाशुनि दे, सुख सर्वहि लोका ।
व्यर्थ जयाविण भासतसे जग, तेंच[9] जयाप्रति नित्यहि गातें,
तच्चरणाप्रति[10] वंदुनि मी, मग मागतसें वरदान तयातें ५ (४)

### श्रीदेवीवंदन

भासतसे मुखपंकज देखुनि चंद्रचि हा उदयाप्रति आला,
अष्टभुजा[11] बहुशक्ति-मता,* मनिं शुंभनिशुंभ[12]-हि भीति जियेला।
अंत[13] जिचा न सहस्रमुखासहि[14], मी तर अज्ञ,-अशी हरिमाया[15],
आधिं नमून तिला, सजलों मग दुर्धट हें **शिवकाव्य** कराया ६ (५)

### २. शिवकाव्यप्रशंसा (वसंततिलका)

श्रीवामनप्रमुख[16]-सुज्ञजनोक्त दिव्यें,
आहेत यद्यपि जगीं विविधेंहि काव्यें ।

---

१ (डाव्या) मांडीवर. २ अक्षक्रीडा, फांशांनीं खेळावयाचें द्यूत. ३ गजमुख = गणपती. ४ पुत्र गणपती, त्याचें रडणें. ५ ऐकू गेलें नाहीं. ६ वंदन करतात. ७ संसारसमुद्रातील नाव. ८ कर्ममार्गास. ९ 'च' पादपूरणार्थ. १० चरण = किरण. ११ दुर्गा, महिषासुरमर्दिनी. १२ दोन दैत्य. १३ देवीच्या गुणशक्तीच्या आकलनाचा व वर्णनाचा पार. १४ शेषासमुद्धां. १५ माया—दुर्गा; कृपा; अघटित घटना करण्याची शक्ति. १६ पु. मं. मध्यें 'श्रीकालिदासमुख-सुरिकृतानि' असें आहे. येथें हा भावेश्वविहृत बदल मराठी काव्याच्या दृष्टीनें इष्टच होय. *मानलेली.

संपूर्ण काव्यरस ते रसिकांस घेतां
यावे, म्हणून करितों[१] **शिवकाव्य** आतां ॥७॥ (६)

### ३. वाचकांस विनंति ( आर्या )

नीर-क्षीर-न्यायें[२] अवलोकावें मदीय काव्यातें,
ऐशी माझी आहे, ऐको[३] भावें, विनंति रसिकातें* ॥८॥ (७)

### ४. श्रीरामप्रार्थना ( वसंततिलका )

श्रीमत्पराशर[४] पुरा नृप-मानवांचें,
जें धर्मतत्त्व[५] वदले विमले स्ववाचें ।
मी तत्कृती गुरु करूनि वदेन उक्ती,
ती पूर्ण **राघव**[६] करो ! मज तों न शक्ती ॥९॥ (८)

### ५. श्रीशिवाजीचा जन्म ( आर्या )

दिल्लीपति-यवनांनीं आक्रमिली भू, गुणां न मान यदा,
झालें शिव-प्रभूचें[७] **शिवाजि**-रूपें सुभद्र[८] जनन[९] तदा ॥१०॥ (९)

### ६. शिवाजीचरित्ररहस्य ( शा. वि. )

लोकांचा भवताप दूर करुनी वागे स्वधर्मे सदा,
रक्षी दीन जनां, तमेंच शरणां[१०], नाशूनियां आपदा ।

---

१ अनुवादितों. * या पद्यांतील विधान पु. सं. हून स्वतंत्र व विनयपूर्ण आहे. २ जलमिश्रित दुधांतून दूधच तेवढें हंस घेतो त्याप्रमाणें. ३ प्रेमानें ऐको. ४ हें विधान पु. सं. ला किंचित् सोडून आहे. पराशरादि स्मृतिकार. ५ राजा आणि प्रजा ह्यांच्या व्यवहाराचे नियम. ६ पद्य १ वरील ह्या शब्दावरील टीप पहा. ७ भगवान् शंकराचें. ८ अत्यंत कल्याणकारक असें. ९ जन्म. १० शरण आलेल्यांना.

होणारें कलिमाजि दुःख शमवी सर्वां जनांचें स्वयें,
ध्यायी विष्णुपदा, जगीं मनु-नयें[१] वागे सदा निश्चयें ११ (१०,११)

( आर्या )

झाला जगीं महत्तम जिंकुनि **शिव** तो निजेंद्रियें सारीं,
मनुमुख्यमार्गगामी[१] मिळवी भू, पूजितांच दैत्यारी[२] ॥१२॥ (११)

नवयौवना[३] सुरूपा परदारा मायसी सदा समजे,
गिरिजा जशी शिवाच्या, अर्धांगीं निज वधू तशी साजे ॥१३॥ (१२)

### ७. शिवाजीस धनलाभ ( उपजाति )

**शिवाजि** पृथ्वी खणवीत जेथें,
इच्छानुसारें धनलाभ तेथें ।

हिरण्मयी होय रसा[४] तयातें,
कीं भाग्यवानांस असेंच होतें ॥१४॥ (१३)

---

१ मनुस्मृत्युक्तधर्मानें, मन्वादि राजांनीं आचरिलेल्या नियमानें वागणारा. २ पु. सं. मध्यें 'द्विजराजपदाब्जपूजन' हें पद आहे, व त्यांतील द्विजराजपदाचे अर्थ टीकेंत विष्णु, ब्रह्मा, कार्तिकेय, चंद्र, शिव, लक्ष्मी, परशुराम हे दर्शविले आहेत. पैकीं येथें अनुवादकानें, विष्णु, कार्तिकेय हेच अभिप्रेत केलेले दिसतात; व तें, ह्यांच्या चरित्राकडे पाहतां इष्टच होय. येथें श्लेषालंकार साधला आहे. ३ ह्या पद्यांत (पु. सं. व भा.) कवीनीं शिवाजी राजाच्या एकपत्नीत्वाची कल्पना सूचित केली आहे; पण तसें नाहीं. तर मातेसमान परस्त्री आणि अर्धांगच स्वस्त्री अशी उभयतांविषयींची शिवाजी राजाची भावना होती, एवढेंच येथें घ्यावयाचें आहे. ४ पृथ्वी. येथें अर्थान्तरन्यास हा अलंकार साधला आहे. शिवाजीस द्रव्याचा हंडा सांपडला ह्या १४ व्या पद्यांतील कल्पनेस आधार (चिटणीस बखर पृ. ६३ शि. दि. पृ. ३५) आहे.

## ८. शिवाजीची न्यायप्रवृत्ति (व. ति.)

पुत्रासमा समजुनी सुख दे प्रजेला,
दंडी जरी अनय[१] आप्तजनेंहि केला ।
अन्यायरीति[२] सहसा[३], न करीच लोभें,
न्यायास योग्य करितां न धरी मनीं भें[४] ॥१५॥ (१४)

## ९. शिवाजीचे गुण (प्रहर्षिणी)

वक्तृत्वें सुरगुरु[५], यक्षराड्[६] धनानें
रूपानें रतिपति[७], काश्यपी[८] क्षमेनें ।
भूपें वायुसुतहि[९] जिंकिला बलानें,
केलें धन्य निजकुला, असें तयानें ॥१६॥ (१५)

(आर्या)

दाता कृता युगीं नल,* होता त्रेतायुगांत रघुराय,
द्वापारीं धर्म, तसा या कलिमध्यें वदान्य[१०] **शिवराय** ॥१७॥ (१६)

( मालिनी )

सुरतरु[११] मनुजानें चिंतिलें तेंच देतो,
**शिवनृपति** जनाची सर्व चिंता हरी तो ।

---

१ अपराध. २ अन्यायाची वागणूक. ३ अविचारानें. ४ भीति, शंका. ५ बृहस्पति. ६ कुबेर. ७ मदन. ८ भूमि. ९ मारुति, भीम. शेवटच्या दोन चरणांत तिसऱ्या अक्षरावर यतिभंग होतो. १० दानशूर. ११ कल्पवृक्ष. *नलराजा कृतयुगांत सांगितला आहे. हा कालविपर्यास वाटतो.

कु-जन-चय-नगाचा[1] वज्र[2], तो स्वास्थ्य चिंतीं
गुरुसम[3], जन ज्यातें मानिती स्वीय चित्तीं ॥१८॥ (१७)

## १०. शिवाजीची रामदासांस प्रार्थना ( रथोद्धता )

मारुतिप्रिय[4] जग प्रसिद्ध जे,
**रामदास** गुरु त्यांस भूभुजें[5] ।
प्रार्थिलें कु-भव-बंधमोचना[6],
'हे गुरो, त्वरित तारिं या जना' ॥१९॥ (१८)

## ११. समर्थांची मागणीरूपानें शिकवण ( भुजंगप्रयात )

'नृपा, दक्षिणा काय देशी अम्हांला ?'
'गुरो, देतसें आवडे जी तुम्हांला'।
'प्रजा पुत्रशी पाळिं, दे दक्षिणा ही,'
'वरें, बोल हा व्यर्थ होणार नाहीं' ॥२०॥ (१९)

## १२. भगवा झेंडा (चामर)

आत्मतत्त्व सांगुनी, नृपास शत्रुनाशिनी,
शक्ति **रामदास** दे, दयेस योग्य जाणुनी।

---

१ दुष्ट लोकांचा समुदाय हाच पर्वत, त्या पर्वताचें (भेदक). २ इंद्राचें शस्त्र, (म्हणून सुजनांचें 'स्वास्थ्य' करणारा. 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्।' भगवद्गीता). १८ तील शेवटच्या दोन चरणांस मुळांत आधार नाहीं. पूर्वार्धांत व्यतिरेकालंकार साधला आहे. ३ गुरु = पिता. ४ मारुति ज्यांना प्रिय ते श्रीसमर्थ. ५ राजा शिवाजीनें. ६ पीडा करणाऱ्या संसारबंधनापासून मुक्त होण्यासाठीं; म्हणजे रामदासांना येथें शिवाजीनें मोक्षगुरु म्हणून ओळखिलें आहे. पण रामदासांनीं मागितलेली दक्षिणा, रामदासांचें राजकीय गुरुत्वच स्पष्ट करीत आहे. हें विशेष आहे.

गैरिकाक्त[१] दे निशाण, हिंदुनाथ शीघ्र घे,
देश जिंकण्यास तो ससैन्य तेथवां निघे ॥२१॥ (२०, २१)

### १३. शहाजीचा शिवाजीस बोध (वसंततिलका)

त्या पुत्रका[२] सदय तात[३] वदे सुवाचें,
मी सत्य तें कथिन, तूं हित ऐक साचें।
जंबूक[४] घे जरि मृगाशन[५]-भक्ष्य-भाग,
होईल काय सुख त्यास? खरेंच सांग ॥ २२ ॥ (२२)

वाजी[६] प्रभंजन[७]-जवा-सम वेग घेती,
आहेत इंद्रकरि[८]से स्वगृहांत दंती[९]।
आम्हां असे सुलभ, या जगिं सर्व कांहीं,
तूं मूर्ख सत्य, जरि दुस्तर कामना ही ॥२३॥ (२३)

(यूथिका)

दुष्ट हा यवन भूपति, मी करीं
दास होउनि धनास्तव चाकरी।
द्रव्य हें मिळविलें बहु साधनीं,
नाश तो करिल दुःख दिल्या धनी ॥२४॥ (२४)

(माकी)

पित्राज्ञापर सुपुत्र, नैशी पतिव्रता दारा हीं,

---

१ (पर्वतोत्पन्न) कावेनें रंगविलेलें, भगवें. २ पुत्र शिवाजी. ३ शहाजी. ४ कोल्हा. ५ सिंह. ६ घोडे. ७ क्षुब्ध वाऱ्याच्या वेगाप्रमाणें. ८ ऐरावत. ९ हत्ती.

स्नेही निःस्पृह, सुखदुःखीं मम ममत्व ज्याचें नाहीं।
मिळतीं भाग्यानें, पुत्रा, सत्यचि हें जाणें. ॥२५॥ (२५)

( आर्या )

जमदग्नि कृतयुगीं तो पुत्री[1], त्रेतायुगांत दशरथ रे,
द्वापारीं शंतनु हा,-यांची केली न साम्यता[2] इतरें. ॥२६॥ (२६)

( स्रग्धरा )

आज्ञा होतांच, माता अनुजहि[3] वधिले तातनृत्यर्थ रामें[4],
तात[5]-घ्नातें हि नेलें सकुल यमपुरा रेणुकापूर्णकामें[6] ।
इंद्रस्थाना[7]-समाना रघुकुलतिलकें[8] ती अयोध्या त्यजूनी,
पित्राज्ञा पाळियेली, अनुजसह पुरा[9], दुःख सोसूनि रानीं ॥२७॥
(२७, २८)

( वसंततिलका )

*दे भीष्म दाशदुहिता[10] गुरु[11] शंतनूतें,
स्त्रीभोग-वर्ज-नियमें[12] झिजवी तनूतें ।
मद्भाषणें अहित काय तुझें करीती ! ।
हा मार्गणा[13] त्यजुनि घे,हित-[14]दा सुरीती ॥२८॥ (२९,३०)

---

१ सत्पुत्रवान्. २ साम्य,—ता. दुहेरी भाववाचक. ३ धाकटे भाऊ. हें विधान ग्रंथें म्हणजे पु. मं. मध्येही अपूर्व आहे. (ह्यास आधार ?) ४ जमदग्निपुत्र परशुरामानें. ५ पित्या जमदग्नीचे शत्रु त्यांना. ६ माता रेणुका, तिची इच्छा पूर्ण करणारा पुत्र परशुराम, तो मातेचा आज्ञाधारक असूनही त्यानें. ७ अमरपुरी. ८ रामचंद्र, ९ पूर्वी. १० धीवर, कोळी, त्याची कन्या. ११ बाप. १२ नैष्ठिक ब्रह्मचर्यव्रतानें. १३ ही कल्पना मूलभिन्न आहे. १४ हितकारक. * देवव्रिती.

## १४. शिवाजीचें शहाजीस उत्तर (द्रुतविलंबित)

श्रवण ही करुनी गुरुभारती[१] । रहसि[२] तो वदला नत[३] भूपती[४] ।
मृदु रवें[५] मज बोधसुधा दिली । परिसतां सदया, मति तुष्टली ॥२९॥
(३१)

## १५. शिवाजीस भवानीचा वर (उपजाति)

तथापि कांहीं कळवीन आतां । स्वप्नांत येऊन जगद्धितार्था ।
देवी भवानी सुगिरा वदे ती । 'हें राज्य तूं घे नृपते, स्वहस्तीं ॥३०॥
(३२)

(वसंततिलका)

हें राज्य मीं तुज दिलें' वदली स्वबाचें ।
कीं 'म्लेच्छ हाल करिती बहु मज्जनांचे ॥
जातील ते यवन ह्या अनयें[६] लयातें ।
तूं मत्कृपें मिळविशील रणीं जयातें ॥ ३१ ॥ (३३)
जिंकूनि दुष्ट यवनां विजया वरावें ।
गोब्राह्मणावन[७] तुवां नृपते, करावें ॥
लाभेल वा, मम वरें तुजला धनाली[८]' ।
देऊनियां वर असा मग गुप्त झाली. ॥ ३२ ॥ (३४)

## १६. भवानीवराची प्रचीति (उपजाति)

मी भूमि जेथें खणवीन तेथें । वरानुसारें धन दृष्ट होतें ॥
हे म्लेच्छ तैसे यमधामवासी[९] । होतील, चिंता मग कां वहासी ? ॥३३॥
(३५)

---

१ पित्याची (उपदेशपर) वाणी. २ एकान्तांत. ३ विनयसंपन्न. ४ राजा शिवाजी. ५ शब्दानें. ६ अन्याय्य वागणुकीनें. ७ गाई-ब्राह्मणांदींचें संरक्षण. ८ द्रव्यादिकांचा सांठा. ९ यमपुरीचे रहिवासी, मृत.

## १७. शहाजी विजापुरास जातो

तातें[1] सुताचें[2] वच ऐकुनी तें । प्रहृष्ट[3] चित्तेंच विजापुरातें ॥
जाऊन, तेव्हां नमिलें तयानें । शूराऽवृता[4] म्लेच्छ नृपास त्यानें
॥३४॥ (३६)

## १८. आदिलशहाचा संताप (वसंततिलका)

देखूनि सन्मुख तदा गुरुतें[5] शिवाच्या
कोपें महाप्रळयसा[6] रिपु सज्जनांचा ।
भ्रू[7] वक्र तो करुनियां वदला सभेतें ।
'ऐका ममोक्ति, मग द्या मत, आवडे तें. ॥३५॥ (३७)
जे पांच तात[8] सुजनीं कथिले जगांत।
दोघेच मुख्य गमती मजला तयांत ॥
जन्मप्रद प्रथम तो, दुसरा सु-पाता[9] ।
मुख्य द्वितीय गमतो सुनयें पहातां ॥३६॥ (३८, ३९)
पृथ्वीवरील अवघे नर मत्त कामें ।
होऊनि, नित्य रमती बहुधा रिकामे ॥
त्यांना सुतादि नसते दृढ वासना ही ।
नैसर्गरीति घडतां सुखदुःख नाहीं ॥३७॥ (४०, ४१)
द्रव्यार्जनीं श्रम घडे, धन देउनी तें ।
संरक्षिनी निज जनां बहु थोर होते ॥

---

[1] शहाजीनें. २ शिवाजीचें. ३ आनंदित. ४ शूर सरदारांनीं वेष्टिलेल्या. ५ पिता शहाजी यास. ६ महाप्रलय करणाऱ्या कृतांतासारखा. ७ भिवया. ८ जनिता चोपनेता च यस्च विद्यां प्रयच्छति । अन्नदाता भयत्राता पञ्चैते पितरः स्मृताः ॥ जन्मदाता, उपनयनकर्ता, विद्यादाता, अन्नदाता आणि भयत्राता ह्यांना पिता अशी संज्ञा आहे. ९ उत्तम संरक्षण करणारा.

तें पोषक स्वजनकाधिक सत्य माना ।
तत्कार्यसिद्धि करण्या झणिं घाच माना[1] ॥३८॥ (४२)
शाहाजितें निज धनें बहु पाळिलें मीं,
तें आज तो विसरला निजपुत्र[2]-गामी ।
" तूं जिंक राजमहितें[3] " कथुनी सुताला,
येथें कशास मग हा खल[4] आज आला !' ॥३९॥ (४३)

( भुजंगप्रयात )

सभाधिष्ठितांतें[5] वदे बादशाहा,
'शाहाजी खरा दंडय[6] भासे मला हा ।
करावा असा घात कां पोषकाचा?
मनीं जी वसे, तीच बोला स्ववाचा' ॥४०॥ (४४)

## १९. आदिलशाहास मंत्र्याचें उत्तर

तदा त्या नृपा बोलला एक वीर,
'जया लक्षुनी हा सुकोप-प्रकार ।
तयानेंच याचा करावा विचार;
अम्हां मौन सोपें गमे आज फार' ॥ ४१ ॥ (४५)

## २०. शाहाजीचें आदिलशाहास उत्तर (द्रुतविलंबित)

शिवपिता[7] स्वकरद्वय जोडुनी,
वच असे वदला भय सोडुनी ।

---

१ (क) ह्याचें ए. व. मान, अर्थ गळा, येथें मस्तक (ख) सामान्यरूप, मू. रू. मान, आदर. २ पुत्र शिवाजीच्या कृत्यास अनुसरणारा, संमति देणारा. ३ आदिलशाही प्रदेशास. ४ दुष्ट, कृतघ्न. ५ सभेंतील मंत्र्यांना. ६ शासनयोग्य. ७ मुळांतील अर्थ बरोबर व नीट समजूनांत ह्या व पुढील पद्यांत सांगितला आहे. ह्यावरून कविकुशलता प्रतीत होते.

'यवनपालक, टाकुनि कोप हा,
कथिन सत्यचि वृत्त, नया पहा ॥ ४२ ॥ (४६)

(अनुष्टुप्)

पोष्य-पोषक-भावाचा । तरु जो लाविला तुम्हीं,
सभाल्यालांत[1] तो मी । वाक्कुठारेंच छेदितों ॥ ४३ ॥ (४७)

( मालिनी )

शिरकमल* करीं हें घेउनी सिद्ध आहें,
शिरुनि कु-रिपु-दावीं[2] नाशितां त्यास, पाहें ।
शिव मम सुत नोहे, मूढ तो स्वेच्छगामी[3],
मम वच नच मानी, पुत्र मानीं न त्या मी ॥४४॥ (४९, ५०)

( आर्या )

तुमचा* रिपुसंघ यदा युद्धा येईल धरून खड्ग करीं,
त्यातें नाशायाला जाइन निःशंक मीच वा समरीं ॥४५॥ (४८)

---

१ सभारूपी आळ्यामध्यें पोष्यपोषक संबंधरूपी जो वृक्ष (विषय) तुम्हीं लाविला ( प्रतिपादन केला ) तो मी माझ्या भाषणरूपी कुऱ्हाडीनें छेडूनच टाकतो ( त्यास यथायोग्य उत्तर देऊन खंडित करतों. ). २ दुष्ट शत्रुरूपी वणव्यांत. *भावे यांच्या शिलाछापी प्रतींत हे दोनतीन श्लोक मुद्रांशी पाहतां पुढेंमागें झालेले दिसतात. पुढेंही असेंच कांहीं ठिकाणी झालेलें आहे. ह्यावरून, कवि भावे यांना मिळालेली शिवकाव्याची हस्तप्रत मुद्रित प्रतीहून वेगळी असावी असें वाटतें. अशा वेगवेगळ्या प्रती झाल्या असाव्या हे पुरुषोत्तम कवीच्याच टीकेवरून म्हणणें प्राप्त होतें. ह्याची विशेष स्पष्टता प्रस्तावनेंत पहा. ३ स्वतःच्या मताने चालणारा.

( दिंडी )

नृपा, विजयी वीरास पाठवूनी,
अल्प शत्रू तो जिंकुनियां आणी ।
तरी ऐसें करिशील तरी राया,
दुःख नाहीं मज, सिद्ध मीहि जाया ॥४६॥ (५१)

( आर्या )

त्यानें आणाल तरी अभिषेकिन मी अहर्निशीं देवा,
लक्ष ब्राह्मणभोजन करविन निश्चय तुम्ही मनीं ठेवा' ॥४७॥ (५२)

## २१. शहाजीस निरोप ( भुजंगप्रयात )

असें बोलतां तोषला म्लेच्छ भूप ।
शहाजीस वस्त्रें धनें दे अमूप ॥
शिवीरा तयां पाठवी, आणि चित्तीं* ।
शिवाजीस जिंकावया युक्ति चिंती[1] ॥४८॥ (५३)

---

* ह्यापुढें ५४ वा एक श्लोक छापील पु. मं. प्रतींत आहे. पण तो मिळालेल्या हस्तलिखित प्रतींत आढळला, इतरत्र नाहीं, असें पु. मं. मध्येंच म्हटलें आहे. विशेषतः त्यावर टीका नाहीं. म्हणून तो प्रक्षिप्त आहे. व असें समजून त्याचें भाषांतरही भावे-कवीनें आपल्या मराठी शिवकाव्यांत केलेलें नाहीं. असेंच पुढेंही घडलें आहे. (प्रस्तावना पहा.) १ योजी.

# चमत्कार २

## १ आदिलशहाचें भाषण (चामर)

अग्नि, शत्रु, कर्ज आणि रोग, चार अल्पसे
मानितां, मनास आधि,[1] सौख्यनाश होतसे।
भूभुजें[2] कसेंहि अल्पका[3] रिपूस मारणें,।
यक्ष्मसाच,[4] पुष्ट होय दुश्चिकित्स्य[5] जाणणें ॥१॥ (१–२)

म्लेच्छ भूप हा विचार मानसीं सदा करी,।
वीर मेळवूनि बोलला[6] सभेंत वैखरी।
'कार्य हो, म्हणूनि मीं धनें तुम्हांस पाळिलें,।
शत्रुनाश कार्य तें समीप आज पातलें ॥२॥ (३–४)

## २. वीर-पंडितादींचा परिपालनहेतु

वीर पंडितादि[7] लोक कीर्तिलागि जोडिती,
संगरीं सभेंत त्यां म्हणून भूप पाळिती।
प्राप्त वेळ जाहल्या पराङ्मुखत्व ज्यांस ये,
त्यां धिगस्तु[8]! पाळिताहि भूप मूर्ख निश्चयें ॥३॥ (५–७)

---

१ मानसिक दुःख. २ राजानें. ३ लहानग्या. ४ यक्ष्मन् = क्षयरोग. ५ नष्ट करण्यास कठिण. ६ यतिभंग. ७ पु. सं. मधील तीन श्लोकांतील सार ह्या एका श्लोकांत उत्तमपणें कवीनें संगृहीत केलें आहे. ह्यावरून अनुवादनांतील संक्षेपचातुर्य दिसून येतें. वीर, पंडित व संगरीं-सभेंत ही जोडीही लक्षणीय आहे. ८ धिक्कार असो!

दानशूर-युद्धशूर-शास्त्रशूर-पुत्र-सू[1],
तीच पुत्रिणी, वदा परा स्त्रिया शिलाप्रसू[2] ।
जो असेल वीर सुज्ञ तोच सैन्य घेउनी,
मद्रिपूस बाहु *बांधुनी अणील जिंकुनी' ॥४॥ (८-१०)

(कामदा)

बोलतां असे म्लेच्छ भूपती,
आपआपणां सभ्य बोलती ।
'शूर तो, अम्हां जिंकवे कसा?
कार्यभाग हा पातला असा' ॥५॥ (११)

**३. धर्मधुरंधराची शिवाजीवर चाल** (उपजाति)

भटाग्रणी[3] **धर्मधुरंधराख्य**[4] । ज्याचें असें भूपतिशींहि सख्य ।
उठे तदा आणि नृपास बोले । 'हें कार्य माझें, इतरां न तोले[5] ॥६॥ (११)

(इंद्रवज्रा)

आतां प्रतिज्ञा परिसा तुम्ही ही । मिथ्या कधीं जी घडणार नाहीं,
युद्धीं **शिवाजीस** वधीन मी, कीं । नाहीं तरी जाइन' ऊर्ध्व लोकीं[6]
॥७॥ (१२).

---

१ हा सर्व चरण एक समास आहे. याचा अर्थ 'दान करण्यांत अत्यंत उदार मनाचा, युद्धप्रसंगीं धैर्यानें आणि वेगानें शस्त्रें चालविणारा, एका अथवा अनेक शास्त्रांत निपुण, अशा पुत्रास जन्म देणारी असा आहे. २ शिला = दगड. प्रसू = प्रसवणारी. *हा चरण वाचतांना 'धुनी' हा भाग बां-पासून तोडावा लागतो. एकाच शब्दांतील अवयवांच्या या तोडीमुळें येथें यतिभंग झाला आहे. हा दोष या काव्यांत वारंवार आढळतो. ३ वीरश्रेष्ठ. ४ धर्मधुरंधर हें येथें विशेषनाम दिसतें. धर्मधुरंधर = धर्माची धुरा वाहणारा, अत्यंत धर्मनिष्ठ. ही व्यक्ति कोण? ५ न तोले = हातून पार पडणार नाहीं. ६ स्वर्गलोक (मुळांत 'श्वेतानां काकानां वर्षानि यास्यामि' = पांढरे कावळे असलेल्या ठिकाणीं जाईन, असें आहे. याचा अर्थ 'मी मृत्यु पत्करीन' असा आहे).

(भुजंगप्रयात)

असें शूर बोलूनि धैर्यें निघाला,
शिवाजीवरी घालण्या घोर घाला।
सवें घे हयारूढ,[1] पादाति[2] सेना
तशा भव्य तोफा, सुयंत्रेंहि नाना ॥ ८ ॥ (१३)

(दिंडी)

महा वेगें तें म्लेंच्छ सैन्य चालें,
राजदुर्गाच्या सन्निवास[3] आलें।
दिला वेढा शत्रूस दोन वर्षें,
सतत दुर्गावर बाणवृष्टि वर्षें ॥ ९ ॥ (१४)

(उपजाति)

दुर्गी[4] शिवाजी सुखरूप नांदे,
रिपूस जो पृष्ठि कधींच नां दे।
त्याच्या सुवीरीं बहुतां परांतें,
गतासु केलें निजशास्त्रपातें ॥ १० ॥ (१५)

### ४. शिवाजी–कृत आदि० सरदाराचा पराभव (इंद्रवज्रा)

'संरोधुनी मार्गहि, धान्य दारू*
येऊं न दे हा खल, यास मारूं'।
चिंतूनिया हा सुविचार सारा,
गेला निशीथीं[5] शिव तच्छिबीरा ॥ ११ ॥ (१६–१७)

---

१ मुळांत अयुत = १० सहस्र संख्या दिली आहे. २ पायदळ. ३ मुळांत 'राजदुर्गोपत्यकायां' असें आहे. उपत्यका = माची. 'उपत्यका तु माची स्यात्' (रा. व्य.). ४ राजदुर्गाच्या (अधित्यका) ऊर्ध्वभूमि = बालेकिल्ला = राजव्यवहारकोश. कर्वीनें टीकेंत आसन्न-भूमि हाच अर्थ दर्शविला आहे. ५ मध्यरात्री. * सरंण.

(वसंततिलका)

निद्रा-निमग्न असतां खल शत्रु सारे,
संशोधिलें[1] चमुपतीस शिवें सुवीरें ॥
छेदूनियां रिपुशिरा निज-शस्त्र-घायें,
केलें सुखी निज जनां तयिं हिंदुरायें ॥ १२ ॥ (१७)

## ५. आदिलशाहींत शिवाजी-वार्ता (इंद्रवज्रा)

जे वीर तेथें नृपतीस भ्याले । म्लेच्छाधिपासन्निध शीघ्र गेले,
त्यांनीं शिवाजी-कृत विक्रमातें । सांगीतलें स्वीय पराभवातें १३ (१८)

## ६ अदिलशाहाचा अफजलखानास निरोप (उपजाति)

तदा वदे तो यवनेश चित्तीं । 'यशें न होतीं[2] धनवृद्धि-पत्तीं[3],
दैवें यशोलाभ तमाचि होतो । चिंता आम्ही व्यर्थ मनीं वहातों १४(१९)
सत्यार्थ हा यद्यपि सिद्ध आहे । यत्नाविना सुज्ञ कदां न राहे,
असा मनीं जो सुविचार वागे । अब्दुल्लखीनास सभेंत सांगे१५ (२०)
'सर्वां सुवीरांमधि तूं बलानें । सुश्रेष्ठ हें मी मनिं नित्य जाणें,
म्हणून सैन्यासह तूं निघावें । शत्रूस जिंकून यशास घ्यावें' १६ (२१)
'बरें' असें बोलुनि तो निघाला । प्रकंप देत स्वपदें महीला,
यंत्रें समें वे पदचार[4] नाना । तुरंगमारूढ सहस्र, सेना ॥१७॥ (२२)

(शालिनी)

ज्या ज्या स्थानीं जाय तो म्लेच्छ दुष्ट,
तेथें लोका देतसे फार कष्ट ।

---

१ शोधून काढिलें. २ न होतीं = मिळत नाहींत. ३ पुष्कळ धन किंवा पायदळ-सेना यांनीं. हें रूप तृतीया बहुवचन आहे. ४ पायदळ.

सक्तीनें तो द्रव्य-धान्यास घेई,
वेठीनें[1] तें वाहवी, दुःख देई ॥ १८ ॥ (२३)

### ७. अफजल—वकील ‘दयालु’ (वसंततिलका)

“सामेंच वश्य करिजे रिपुलागि आधीं.’
ऐसा विचार करुनी मग युक्ति शोधी ।
होता सखा द्विज दयालु[2]-च नाम त्यातें,
बोले तदा वचन गुप्त मनीं वसे तें ॥ १९ ॥ (२४)

(शार्दूलविक्रीडित)

“नाना वृक्ष सुसांद्र[3] रम्य असती, अश्वा न पंथा जिथें,
ऐसा हा द्विजवर्य, राजगिरि[4] हो; मच्छत्रु आहे तिथें ।
तो सैन्यासह राहतो गिरिवरी संदेश माझा तया,
त्यां जाऊनि सुमित्रमें[5] कळविणें मत्कार्य साधावया ॥ २० ॥ (२५)

(कामदा)

“सद्गुणें तुझ्या म्लेच्छ भूपती । तोषला, सदा शत्रु ज्या भिती ॥
तो वदे, वदे, साम तूजशीं । व्यर्थ मानसीं भीति ठेविशी २१ (२६)

(शार्दूलविक्रीडित)

त्या भूपें तुजशीं सुसाम करण्या म्लेच्छास ज्या धाडिलें,
सांगावा तुजला निरोप म्हणुनी त्यानें मला प्रेषिलें ।

---

१ विष्टि = वेठ, अमूल्य कर्म करणें. ‘मुकुटकोश’. २ ग्रंथकाराच्या मतें हें अफझलखानाच्या वकिलाचें नाव दिसतें. ३ सु = फार; सांद्र = दाट. ४ राजन् = राजा; राजगिरि = राजगड. ५ चांगला मित्र या नात्यानें.

'म्लेच्छेशें तुज अर्ध राज्य दिधलें रामेश्वरा*-पासुनी,
त्याची उत्तर¹ नर्मदा समज तूं शंका न आणीं मनीं २२ (२७, २८)

(दिंडी)

भेटी द्यावी एकांतिं मला राया। भीति नाहीं मग साम आचराया,'
असें सांगूनी त्यासि आण येथें। कार्य केल्या चढवीन योग्यतेतें २३
(३०, ३१)

(साकी)

संगम-वेळीं त्या दुष्टातें बाहूनें दडपून,
त्याच्या प्राणा हरीन विप्रा, कार्य असें साधीन।
गुह्य न फोडावें। विप्रा, त्वरित तुवां जावें" ॥२४॥(३२)

(उपेंद्रवज्रा)

'वरें' असें बोलुनि तो निघाला। शिवाजिच्या सन्निध शीघ्र आला,
वृत्तांत सांगे द्विज त्यास सारा। परी न सांगे कपटी विचारा २५ (३३)

## ८. शिवाजीचें अफजल–वकिलाशीं संभाषण (वसंततिलका)

'सांगेन उत्तर' असें कथुनी द्विजाला,
अंतर्गृहीं शिवजि शांत मनेंच गेला।
हें वर्तमान सकलां सचिवांस सांगे,
घेऊनि संमति फिरे मग शीघ्र मागें ॥२६॥ (३४)

---

* रामेश्वरा-पासुनी इत्यादि सीमान्त देऊं केलेला विस्तृत देशभाग ह्या वेळीं कविकल्पनेंतील आहे. १ उत्तरेकडील सीमा. †येथें पद्यें २० ते २४ अफझलखानानें ब्राह्मणाशीं केलेलें भाषण आहे. त्यात २१ ते २३ ब्राह्मणानें शिवाजीशीं करावयाचें भाषण आहे. त्यांतील २२ उत्तरार्ध व २३ पूर्वार्ध मिळून अफझलखानाचा शिवाजीस साक्षात् निरोप आहे.

'विप्रास साम करण्या जरि पाठवीलें,
माझें सुदैव तरि सत्य फळास आलें ।
म्लेच्छें असेल धरिली जरि दुष्ट बुद्धी,
ती सांगिजे द्विजवरा, मज लागि आधीं.' ॥२७॥ (३५–३७)

जेव्हां असें वचन भूपमुखें निघालें,
प्रेमाश्रु[1]-पूरित तदा द्विज-नेत्र झाले ।
सांगूनियां कपट सर्व खरें तयाला,
तो तोषवी. शिवनृपें द्विज गौरवीला ॥२८॥ (३८)

( शिखरिणी )

'अहो ब्रह्मन्, ऐका मम वचन हें आजि वहिलें[2],
जरी त्या दुष्टानें मनिं मजसि कापटय धरिलें ।
तरी चिंता नाहीं, उलटचि करूं यत्न बरवा ।
तया 'मी येतों' हें त्वरितगति[3] जाऊन कळवा' ॥२९॥ (३९)

अशा त्या विप्रातें नमुनि वदला भूप सुगिरा[4],
तदा जाता झाला द्विजवर भला म्लेच्छ-शिबिरा ।
तयानें जाऊनी यवन अफझलखान नमिला ।
'शिवाजी येतो' या हितकर वचें तोष दिधला ३०(४०–४१)

---

१ ब्राह्मण-वकिलास अफझलखानाचा संकल्प ऐकून शिवाजीचा घात होणार हें पाहून त्याविषयीं मनांत दया आली असली पाहिजे. अर्थात् तो घातक संकल्प शिवाजीस सांगतांना त्याला दयेमुळेंच गहिंवर येणार; म्हणून येथील प्रेम हा शब्द संदर्भास जुळत नाहीं. तत्स्थानीं दया, करुणा, इत्यादि शब्द इष्ट आहे. २ मनापासून. ३ हा बहुव्रीहि समास आहे; त्याचा अर्थ वेगानें. ४ गिर्-गिरा = शब्द.

## ९. शिवाजीची योजना (द्रुतविलंबित)

शिवनृपें मग पूजिलि अंबिका,
निज जना नच जी बसवी[१] धका।
मग विचार करी निज मानसीं,
धृतिच[२] योग्य, अशा समयीं मशीं ॥३१॥ (४२)

(दिंडी)

'धूर्त[३] शत्रूशीं बुधें धूर्ततेनें। सदा वागावें नीति[४] जाणत्यानें,
ज्वरें होते जेधवां कडू जिव्हा। योग्य कुटकी, शर्करा नको, तेव्हां' ॥३२॥
(४३)

(इंद्रवज्रा)

भूपें मनीं यापरि चिंतियेलें,
दुर्गा[५]–पुढारा[५] पट-वेश्म[६] केलें।
म्लेच्छा न कापटय कळो म्हणोनी,
शोभा प्रयत्नें नृप त्यास आणी ३३ (४४)

(उपजाति)

वस्त्रें शिवाजी स्वचमूस अर्पी। हेमादिकीं सैन्यपतीस तर्पी,
अशा प्रकारें जन तुष्ट केले। सैन्याधिपाशीं मग गुह्य बोले ३४ (४५)

(आर्या)

'मित्रा, ह्या पटवेश्मीं कपटी शत्रूस ठार मारीन,
समजावें हें तुजला यास्तव कथितों तुला बरी खूण ३५ (४६)

---

१ 'धका न बसवी' हें वर्णन कोतें आहे; कारण देवीचें कार्य संकट 'न आणणें' हें नसून 'संकट टाळणें' हें आहे. २ साहसी कृति. ३ लबाड. ४ राजनीति, राजकारण. ५ प्रतापदुर्ग–प्रतापगडच्या पुढें, अग्रभागीं. ६ पट = वस्त्र. वेश्मन् = घर. समासाचा अर्थ तंबू.

रिपुच्या वधीन जेव्हां, तेव्हां किल्ल्यांत तोफ डागीन,
शब्दासवेंच जावें[1] शत्रुचमूवरि सुवीर घेऊन ॥३६॥ (४६)
जैसा करी तृणाचा नाश शिखी[2], तेवि तूं तया यवना,
नाशावें समरीं, ही आज्ञा तूं हिंदुवीर आण मना ३७ (४७,४९)
आम्हीं तुम्हांस दिधलीं आजवरी जीं धनें तयांचें हो[3] ।
कारण 'संकट-समयीं व्हावा उपयोग,' हें मनीं राहो ३८ (४७)

( द्रुतविलंबित )

निज धनासह मी तुमचा असे । कुटिल काल अम्हां, वरवा नसे,
रिपु महा बलवान् बहु मत्सरी । परि शिवा[4] यश देइल संगरीं ॥३९॥
(४८)

( उपजाति )

तिच्या प्रसादें रिपुला वधीन । नकोच चिंता, यश गाजवीन,
तुम्ही करा तच्चमुचाहि[5] नाश । देवो तुम्हां धैर्य रणीं रमेश ! ४० (४९)

( शिखरिणी )

असें सेनाधीशा गुज कथुनि, अंबेस विनवी,
'प्रतिज्ञा माझी ही तुजविण शिवे, कोण पुरवी ? ।
करें माझ्या आतां श्रित-हितकरे,[6] दुष्ट वधवी,
तुझ्या ह्या भक्ताचें यश जनमुखें नित्य वदवी' ॥४१॥ (५१)

( भुजंगप्रयात )

अशी प्रार्थना ऐकुनी अंबिकेनें,
शिवाजीस तैं तृप्त केलें वरानें ।

---

१ हल्ला करावा. २ अग्नि; शिखा = ज्वाळा. ३ कारण हो = कारण आहे. ४ पार्वती. ५ तत् + चमू = त्याची सेना. ६ आश्रिताचें कल्याण करणारी (संबोधन).

नयानेंहि भावें नमस्कार केला,
वर-प्राप्त[१] तो शत्रुघाता निघाला ॥ ४२ ॥

## १०. शिवाजीचें वर्णन—शरीर, पोषाख (उमा)

उंच नसे, शिवभूप नसे लघु[२], विस्तृत लोचन, गौर शरीर,
स्कंध सुपीन, सुगूढचि जत्रुहि[३], ज्या वपु मानिति सांगचि[४] मार[५] ।
सिंहसमा गति, भीति मनीं नच, पायिं उपानह[६] आणि इजार,
बाघनखें करिं,घालि झगा मग,मस्तकिं मंदिल, त्यावर हीर ४३ (५०,५२)

## ११. अफजलखानाचें वर्णन (दिंडी)

शिरीं केसांचा संच दिसे काळा । रक्तवस्त्रें वेष्टिलीं मस्तकाला,
मुखीं श्मश्रूला[७] वाढ फार आली।मुखाचीही स्पष्टता नष्ट झाली४४(५४)

(आर्या)

उंच स्थूल यवन तो आंगीं कवचावरीं[८] झगा घाली,
गेला त्या पटवेश्मीं, शत्रुवधाची जया त्वरा झाली ॥ ४५ ॥ (५४)
श्मश्रूनें[९] स्पर्शी कीं 'दुर्जय हा भूप आज सांपडला,
जाळांत पारध्याच्या एकाकी[१०] केसरी जसा पडला' ॥४६॥
ठेवून सैन्य मागें, तो अफझल्खान त्या रिवे गेहीं,
भासे शशि-राहूंचा संगम लोकां, असत्य हें नाहीं ॥४७॥ (५५)

---

१ ज्यास देवीकडून वर मिळाला आहे असा. २ ठेंगणा. ३ जत्रु = गळ्यापासून खांद्यांपर्यंत गेलेलीं दोन हाडें, हसळी. ४ अंग = देह; सांग = मूर्तिमंत. ५ मदन. ६ जोडा, वहाण इत्यादि. ७ श्मश्रु = दाढीचे केस. एकंदर अर्थ, तोंडावरील जंगल फार वाढल्यानें तोंडही नीट दिसत नव्हतें. ८ खानाच्या अंगांत कवच नसल्यानें हें वर्णन सदोष वाटतें. ९ सावज सहज सांपडणार या आनंदानें खानसाहेब आपली दाढी कुरवाळीत होते. १० एकटा.

## १२. शिवाजीविषयीं जनप्रार्थना ( शार्दूलविक्रीडित )

" आम्हीं आचरलों प्रभो, सुकृत जें तेणें नृपा रक्षणें,
तूंतें ' तूं निज भक्तपालक ' असें या, वर्णिती शाहणे ' ॥ (५६)
' पातिव्रत्य जरी असेल अमुचें, रक्षी प्रभो, भूप हा ',
ऐसें तैं नर-योषिता विनविती देवास भावें पहा ॥४८॥ (५८)

## १३. अफजल-शिवाजी-भेट ( आर्या )

संगमवेळीं धरिला म्लेच्छानें तो शिवाजि बाहूंत,
दाबून मारण्याला इच्छी ही दुष्टता न राहूंत* ॥४९॥ (५९)

( भुजंगप्रयात )

शिखाहीन त्यानें जरी अल्प मानी,
तरी तो तया हार जाई न मानी ।
नखानें नृपें फोडितां म्लेच्छ[1] कुक्षी,
पडे तो, तदा शम्र होऊन अक्षी ॥५०॥ (५९)

( शिखरिणी )

जिवाजीनें[2] शस्त्रें यवन-शिर तेव्हां उडविलें,
सहर्षे[3] दोघेही नृपगिरिवरी शीघ्र चढले ।
तिथें संकेताचा ध्वनि करविला हिंदुपृतना,
तिचे तो ऐकोनी पवन-गतिनें शत्रुहनना ॥५१॥ (६०)

—२—

* येथें राहू ह्या दुष्टपणाविषयीं प्रसिद्ध असलेल्या उपमानाहून खानाची दुष्टता घोर सांगितली आहे. यामुळें येथें व्यतिरेक अलंकार साधला आहे. १ नृपें कुक्षी फोडितां म्लेच्छ पडे इ. अन्वय. २ जिऊ महाला, शिवाजी सैनिक, त्यानें. ३ सहर्ष = हर्षानें. हाच अर्थ व्यक्त करण्यास येथील तृतीयेची गरज नाहीं; अर्थात् ही चूक होय.

# चमत्कार ३

## १. शिवाजी–सैन्य–वर्णन (शिखरिणी)

शिवाजीचे योद्धे सकल तुरगारूढ असती,
करींचीं शस्त्रें तीं दिनकर[१]-करांहीं चमकतीं ।
गजेंद्रांच्या माथां, कितिक सुरथीं, वीर बसले,
रणातें जातांना पथिक[२]-नयना भव्य[३] दिसले ॥१॥ (१)

(आर्या)

पदचर पुढें निघाले नाना शस्त्रां धरूनियां *स्वकरीं,
आंगीं घालुनि कवचें निज शत्रुचयास[४] जिंकिते समरीं ॥२॥ (२)

## २. अफजल–सैन्य–स्थिति (शिखरिणी)

'मराठ्यांच्या भूपें स्वपति अफझलखान वधिला,'
असा जेव्हां कर्णीं असुखकर वृत्तांत पडला ।
तदां त्या म्लेच्छांची मुखकमलशोभा उतरली,
करींचीं शस्त्रें ही त्सरुसहित[५] भूमीस गळलीं ॥३॥ (३)

## ३. खानसैन्य नि शिवसैन्य यांमधील युद्ध (स्रग्धरा)

'युद्धावांचूनि आतां हितकर दुसरा यत्न कांहीं असेना,'
ऐसें आणूनि चित्तीं तदितर[६] यवनीं सिद्ध केली स्वसेना ।

---

१ सूर्यकिरणांमुळें. २ वाटसरू. ३ संस्कृत अर्थ 'सुखकारक'; मराठी अर्थ 'डौलदार.' ४ चय = समुदाय. *हें स्व—पद येथें अधिक पडलें आहे. ५ त्सरु = शस्त्राची मूठ. याचें रूपांतर थरू. हा शब्द कोंकणांत कातकरी लोकांच्या तोंडीं ऐकूं येतो. हा वैदिक शब्दाचा रानटी लोकांतील प्रचार मननीय आहे ६ वर पद्यांत ज्या यवनांचीं शस्त्रें गळाल्याचा उल्लेख आहे त्यांहून दुसरे.

हस्त्यश्वारूढ कांहीं, कितिक यवन ते स्यंदना[1]-रूढ झाले,
हातीं घेऊन शस्त्रें शिव-नृप-चमुशीं युद्ध-दानास[2] आले ४ (४)

(शार्दूलविक्रीडित)

धूळीनें नभ कोंदलें द्वि-घटिका, व्यापून गेल्या दिशा,
भासे दुर्दिनसा[3], मरी—चि[4] असली आली जनांतें दशा।
झाले वज्रचि हिंदु-वीर यवनाद्रीतें तया संगरीं,
योद्धा हिंदु—नृपाळ वज्रधर[5] तो होता गिरीच्या वरी ॥५॥ (५)

(द्रुतविलंबित)

अ-सितर्चा[6] द्विप, शुभ्र तुरंगम,
चमकती बहु खड्ग विजेसम।
सुचपला[7]-जलदाऽवृत पुष्कर,
समरभू दिसली तशि[8] सुंदर ॥६॥ (६)
समरभूमि तदां गजवाजिनीं,
गगनतुल्य गमे जनलोचनीं।
पदरजें नभ भासत धूलिसें*,
स्थिति परस्पर[9] ही क्षण होतसे ॥७॥ (७)

---

१ स्यंदन = रथ, गाडे. २ युद्ध देण्यास. कवीची मराठींतील 'दान' ही शब्द-योजना लक्षणीय आहे. ३ दुर्दिन = असा दिवस कीं, ज्यांत आकाश अभ्राच्छादित असून थोडथोडा पाऊस पडतो. ४ मरी = जरिमरी, पटकी. ५ इंद्र. ६ सित = पांढरा. ७ चपला = वीज; जलद = मेघ. ८ समरभूमीवर काळे हत्ती, पांढरे घोडे, व चमकणाऱ्या तलवारी असल्याचें वर्णिलें आहे; व म्हणून तीस मेघ व विजा यांनीं युक्त अशा आकाशाची उपमा दिली आहे. ही नीटशी जमत नाहीं. कारण हत्ती मेघांच्या तोडीचे आणि तलवारी विजांच्या तोडीच्या मानल्या तरी, पांढरे घोडे यांस आकाशांतील कोणत्या पदार्थाची उपमा देणार? *धूलिसें या ठिकाणीं भूमि-सें असा मूळ पाठ असेल काय? विद्यमान पाठानें अर्थ नीटसा लागत नाहीं. ९ हा शब्द येथे 'परस्परासारखी' अशा अर्थी योजिलेला दिसतो.

( स्रग्धरा )

पाहे जेव्हां अरीची पति-रहित अशी निर्बला दीन सेना,
तेव्हां श्रीमच्छिवाच्या निजसह लढणें योग्य चित्तीं गमेना ।
गेला नाहीं स्वतां तो यवनचमुवरी शास्त्रवेत्ता[1] रणाला,
सल्लोक स्वीय धर्मीं निरत नच कदां सोडिती सत्पथाला ॥८॥ (८)

( शार्दूलविक्रीडित )

वाद्यें वाजविती अनेक परिचीं तैं म्लेच्छ नाना रितीं,
जे ल्याले कवचें, रथांत बसले होते विचित्राकृती[2] ।
आरंभीं शरपंक्ति सोडिति, न कीं माहीत मूर्खांप्रति,
येतो दुर्जय त्यां रणीं प्रथम जे युद्धास आरंभिती ॥९॥ (९)

होती मेघरवासमान रव तद्यंत्रव्रजीं[3] संगरीं,
भासे आयस[4]-गोल-पंक्ति सकलां ‘ ही प्राणहर्त्री खरी ’ ।
वायूनें जशि कर्दळी-तति, तशी झाली शिवाजी-चमू,
ते योद्धे वदती शिवा[5] ‘ तुजविणें कोणास आतां नमूं ?’ १० (१०)

हिंदूंचे ध्वजिनीश शत्रु लुटण्या कांहीं चमू ठेविती,
अश्वारूढ तदां जवें[6] अरि-दळीं सर्वां दिशीं शीरती ।
व्योमीं अश्वखुरोद्भवा रणधुळी धूम्रासवें[7] ऊठली,
योद्ध्यांना न दिसे रणीं स्व परही, क्षोणी[8] नभें दाटली ११ (११,१२)

---

१ हा शब्द चमूवर न जाण्याचें कारण सांगत असल्यानें येथें काव्यलिंग अलंकार साधला आहे. २ हें विशेषण योद्ध्यांचें किंवा रथांचेंही घेतां येईल. ३ तत्–नें येथें म्लेच्छ घ्यावे. व्रज = समुदाय. ४ अयस् = लोखंड. आयस = लोखंडाचा. ५ शंकरास. ६ जव = वेग. ७ धूम = धूर. येथें धूर विवक्षित असल्यानें धूमा असेंच रूप इष्ट होतें. धूर शब्दही धूम्र या विशेषणावरूनच प्रमादानें साधण्यांत आला आहे. ८ पृथ्वी.

(वसंततिलका)

सिंहें जसें रगडिजे गजराज-गंडा,
तेसेंच हिंदु करिती यवनांस दंडा ।
कोणाहि मुक्ति-करसा यवनां दिसेना,
दुःखार्णवीं तयिं पडे यवनेश-सेना ॥१२॥ (१३)
हत्तीवरी यवन सैन्यप बैसुनीयां,
आला सबाण धनुतें करिं घेउनीयां ।
सोडावया सकल यंत्र-समूह देई
योधां निदेश[1], तयिं युद्ध सुघोर होई ॥१३॥ (१४)

(स्रग्धरा)

बंदूका खड्ग भाले असि[2] परशु, तशीं तीक्ष्ण निस्त्रिंश[3]—शस्त्रें,
भानूच्या रश्मिनीं तैं चमकति समरीं दीप्तिमंतें सदस्त्रें ।
हिंदूंचे सर्व योद्धे सबल निज करीं घेउनी आयुधें ते,
त्यां म्लेच्छां बर्बरांतें यमसम समरीं जाहले दुःख देते ॥१४॥ (१५)

(वसंततिलका)

ते म्लेच्छ बर्बर तसे शक-पारसीक,
कित्येक हूण असती सशिखी[4] विशीख[5] ।
भ्रांतिष्ट[6] दृष्टि मधुपान[6]—वशें जयांच्या,
ते युद्ध घोर करिती चमुशीं शिवाच्या ॥१५॥ (१६)

---

१ आज्ञा, हुकूम. २ तरवार. ३ दीड हात लांबीची तरवार. ४ शिखा (शेंडी) + इन् = शिखिन्–ची प्रथमा, शिखी = शेंडीवाला. हाच अर्थ येथें विवक्षित असल्याने मागील स निरर्थक पडला आहे. ५ वि = नाहीं + शिखा = शेंडी. एकदर अर्थ शिखानष्ट, यवन. ६ (मधु म्हणजे मद्य; ते प्याल्यानें ज्यांचे डोळे) तारवटलेले (होते).

ख-स्वस्तिका[१] प्रखर भानु नभांत आला,
युद्धप्रसंग रणिं तोंवरि घोर झाला।
रक्तें सुयोध तयिं फुल्ल पलाश झाले,
भीरूस भीति, सुख वीर-जनीं उदेलें[२] ॥१६॥ (१७)

विच्छेदितां स्वरिपुनें उजव्या करातें,
वामें करें असि-युता रिपुच्या करातें।
छेदीत एक, न करद्वय अन्य वीरा,
तो सर्पसाच डसला रिपुच्या शरीरा ॥१७॥ (१८)

ज्याचे उरीं रुतविला शर शत्रुनें तो,
पाहूनियां अधर[३] चावुनि घे रणीं तो।
छेदून शीघ्र असिनें निज शत्रु-शीर्षा,
रंगीं तयासह मरे पुरलीच ईर्षा[४] ॥१८॥ (१९)

( शार्दूलविक्रीडित )

होतां मस्तक भिन्न* खड्ग—पतनें[५] एका भटाचे रणीं,
मानी[६] तो 'रवि-लोक[७] साध्य मजला झाला जयापासुनी।

---

१ ख = आकाश. स्वस्तिक = उच्चतम बिंदु (सूर्य डोक्यावर आला हा अर्थ). २ भित्र्यास भय आणि वीरास सुख उत्पन्न झालें. ३ खालचा ओंठ चावणें हें त्वेषाचें चिन्ह आहे. ४ ज्यानें आपल्या छातींत बाण घुसविला त्यासही मरतांमरतां मारून प्रस्तुत वीरांनीं आपली तीव्र सुडाची इच्छा सफल करून घेतली. ५ पतन = प्रहार. ६ मानी = उदारात्मा असल्यानें परोपकार फेडण्यास सिद्ध होता. ७ युद्धामध्यें समोरून प्रहार झाल्यानें मेलेला वीर सूर्यमंडळ भेदून पलीकडे जातो अशी कल्पना आहे. या अर्थाचें पद्य—

द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमण्डलभेदिनौ।
परिव्राड्योगयुक्तश्च रणे चाभिमुखो हतः॥

अर्थ—हे दोन पुरुष सूर्यमण्डलांतून पलीकडे वर जातात,—समाधिस्थ संन्यासी आणि समोरून झालेल्या प्रहारानें मेलेला वीर. * चिरलेलें, तुटलेलें नव्हे. म्हणजेच प्रत्युपकाराचा विचार संभवेल.

जातां मोडुनि त्याम, दोघ घडतो' येतां असें अंतरीं,
तें तोडूनि शरें त्वरें अरिशिरा देह त्यजी संगरीं ॥१९॥ (२०)

( वसंततिलका )

छेदूनि हस्तिकर त्यावरल्या महाता,
भूमीवरी त्वरित पाडित एक जेता ।
माहात तो मग गजासह जीव सोडी,
'अल्ला' असें वदुनियां यमलोक जोडी ॥२०॥ (२१)

दोघे रणीं कृत परस्परशस्त्रघातें,
होऊन मूर्छित यदां त्यजिती असूतें ।
पावून दिव्य तनुतें बसुनी विमानीं,
स्वर्गास जाति तयिं होउनि मित्र मानी ॥२१॥ (२२)

पाहून खड्गधर एक उरीं, रिपूनें,
जो मारिला कठिण, सायक[1] दुर्मतीनें ।
रोषें तयास झणि आपण खड्ग मारी,
केला निहीं उभयतीं हि सखा तमारी[2] ॥२२॥ (२३)

श्वेताश्वरूढहि[3] परस्पर कुंतधारी[4],
लागून कुंत पडले समरीं शरीरीं[5] ।
टाकून ते निज तनूसह रोष सारा,
स्वर्लोक साध्य करिती त्यजुनी पसारा[6] ॥२३॥ (२४)

---

१ लोखंडी बाण. २ तमस् = अंधार, + अरि = शत्रु, = तमोरि, सूर्य. तमारी हें रूप अपभ्रष्ट आहे. हे दोन्ही वीर सूर्यमण्डलांत कां शिरले एतदर्थ मागील पद्य १९ वरील ७ टीप पहा. ३ श्वेत = पांढरा. रंग (मूलाधिक) पांढरा वा ? श्वेताश्व—चे स्थानीं 'जे अश्व' असा पाठ बरा. ४ कुंत = भाला. शब्दाचा अर्थ भालेकरी. ५ ते शरीरीं कुंत लागून पडले इ० अन्वय. ६ स्वर्लोकांतील स्त्री, वित्त इ० प्रिय वस्तु.

(शार्दूलविक्रीडित)

रक्तें सिंचिलि जैं तिथें समरभू तेव्हां कशी वाटली?
सायंकाळि जणूं तमारि-किरणीं[1] मेघ-प्रभा दाटली।
झाली धूलिहि शांत तेथिल; तिला पंचत्व ये तत्क्षणीं,
त्यामध्यें हयवीर लोळति अहा! जे व्यंग[2] झाले रणीं २४ (२५, २६)
गृध्रांचे समुदाय आणि फिरती मांसाशना कावळे,
वाहे रक्तनदी रणीं म्हणुनियां थारा न त्यांना मिळे।
म्लेच्छाचें अपकीर्ति-मंडल गमे, मेले यदां म्लेच्छ ते,
तैं हिंदूजवळी अशाच दुसऱ्या स्थानास तें याचितें[3] ॥ २५ ॥ (२७)

(वसंततिलका)

ते हिंदु नग्न[4]-करवाल धरून हातीं,
तद्भीत तें यवन-सैन्य रणीं चिरीतीं।
द्रोणात्मभू[5] स्वसख[6]-चित्त सुखी कराया,
कीं शेप फाल्गुन[7]-चमू सजला चिराया ॥२६॥ (२८)

(स्रग्धरा)

प्रेतांचा संघ वाटे अचलचि[8] नयना, त्यांतुनी जी निघाली,
शुंडा हया मान जीचे, रुधिरहि जलसें, केश जंवाल[9], झालीं।

---

१ युद्धभूमि रक्तानें शिपल्यामुळें सायंकाळच्या आरक्त सूर्यकिरणांनीं व्यापिलेल्या काळ्या ढगाप्रमाणें दिसत होती. पृ. ३१ टीप २ पहा. २ विगत अंग येथें ते, ज्यांचा एखादा अवयव तुटला आहे असे. ३ अपकीर्तीचा रंग कवि काळा कल्पितात; तेव्हां प्रस्तुत पद्यांत युद्धांत जमलेल्या गिधाड, कावळे इ० काळ्या पक्ष्यांवर अपेशाचें रूपक केलें आहे. अपेशाचा आधार असलेले यवन मृत होऊन रक्ताच्या नदींत वाहून गेल्यामुळें निराधार बनलेलें तें अपयश कावळ्यांच्या रूपानें जणूं हिंदुवीरांजवळ एखादें दुसरें आधारस्थान (एखादें यवन सैन्यच) जणूं मागत होतें. ४ कोशविरहित खड्ग; म्यान-रहित तरवार. ५ अश्वत्थामा. ६ दुर्योधन. ७ अर्जुनसैन्य. ८ अचल = पर्वत. ९ शेवाळ.

वीरांच्या मस्तकींचीं सुविमल वसनें भासतीं फेंस लोकां।
हस्तींचा मेघ ह्याची गमति तयिं शिला, लागती एकमेकां[1]॥२७॥(३०)

वक्त्रांच्या भोंवतीं जे कुरळचि असती केश शूरां जनांचे,
त्यांनीं जीं युक्त वक्त्रें कमल-ततिच[2] ती वीचि[3] संघांत नाचे।
ढालींच्या पृष्ठि[4] तेथें कमठचि[5] गमती, हस्त ते सर्प जीत,
वाहूं लागे अशी तैं अतितर-भयदा निम्नगा[6] संगरांत॥२८॥ (३०)

(साकी)

पळतां निजचमु जमाल—नामा[7] यवनानें आवेशें,
हयारूढ तैं सहस्र योद्धे सर्वे घेतले खासे॥ २९.॥ (३१)

(भुजंगप्रयात)

अशा शेष वीरांस घेऊनि संगीं,
त्वरें म्लेच्छ तो येउनी युद्धरंगीं[8]।
जशा वर्षती पर्वतीं मेघ धारा,
तसे तो तदा बाण सोडी सरारा॥३०॥ (३२, ३३)

कच[9]-व्याप्त तीं रक्त वक्त्रें जयांचीं,
करीं नग्न शस्त्रेंहि खड्गादि साचीं[10]।
तुरंगी[11] सुरापी[12] अशा म्लेच्छ-योधीं,
शिवाच्या चमूतें दिली भीति युद्धीं॥३१॥ (३४)

---

१ या युद्धांत वाहणाऱ्या रक्ताचा पाट, प्रेतांचा ढीग, हत्तींच्या तोडलेल्या सोंडा, रक्त, केस, डोक्यावरील पागोटीं, आणि मेलेले हत्ती यांवर क्रमानें पुढील वस्तूंचें रूपक केलें आहे,—नदी, पर्वत, मासे, पाणी, शेवाळ, फेंस, खडक. २ तति = समुदाय. ३ वीचि = लाट. ४ पृष्ठ = पाठ. येथें मराठींतील पाठ—च्या लिंगानुसार पृष्ठि असें रूप कवीनें कल्पिलें आहे. ५ कमठ = कासव. ६ नदी. ७ जमाल या नांवाचा. ८ रणभूमीवर. ९ कच = केस. १० साचें = खरोखर, येथें अर्थ पाजळलेली. ११ घोडेस्वार. १२ सुरा = मद्य. शब्दाचा अर्थ दारू पिणारा.

( साकी )

नथुनामा[१] जो शिवसेनापति हयारूढ तो झाला,
दिनावसानीं निजयोधांसह यवन-चमूवरि गेला ॥३२॥ (३५)

( दिंडी )

दोन घटिका जाहलें युद्ध घोर,
स्वर्ग लोका पावले बहुत वीर ।
तीक्ष्ण शस्त्रें ताडुनी एकमेकां,
प्राण घेती त्यां नसे भीति शंका ॥३३॥ (३६)

( उपजाति )

रणीं क्रमेला,[२] गज आणि वाजी,
तैं पावले मृत्यु, तसेच गाजी ।
आच्छादिली रंग—रसा[३] शिरांहीं,
आरक्त ऐसा रुधिरौघ वाही ॥३४॥ (३७)

( शार्दूलविक्रीडित )

हिंदूंनीं स्वकरीं स्वशत्रु निकरीं जैं मर्दिले संगरीं,
तैं हिंदूंस वरी सुकीर्ति नवरी, सन्नम्र झाले अरी ।

---

१ नथू हें शिवाजीच्या सेनापतीचें नांव आहे. मुळांत हें नांव नाहीं. नथू हें नेताजी ह्या नांवाचें रूपांतर दिसतें. मुळांत ४५ व्या श्लोकावरील टीपेंत कवि पुरुषोत्तम यानें ह्याचा निर्देश केला आहे. २ क्रमेलक = उंट. येथील आ-कारान्त रूप चमत्कारिक दिसतें. याचा प्रयोग मराठींत आढळत नाहीं. ३ रंग = रंगभूमि, रसा = जागा. युद्धास एक प्रकारचें नाटक कल्पिलें आहे. सहजच रणभूमि ही रंगभूमि ठरते.

कोणी भीति धरी, पलायन करी कोणी गिरी[1]-कंदरीं,
कोणी दीन-परी नमस्कृति करी दांतीं तृणातें[2] धरी ॥ ३५ (३८)

(वसंततिलका)

छेदूनियां करि–करास[3] रणीं, गजाला
पाडून, हिंदु करिती जखमी **जमाला**[4] ।
त्यागूनि देह समरांत **जमाल**[4] मेला,
अंतीं तयास सुरलोक तदां मिळाला ॥३६॥ (३९)

(इंद्रवज्रा)

रात्रीं पळाले हत-शेष वीर,
त्यागून शस्त्रें समरीं अधीर ।
देखून धांवे मृग केसरीसीं[5],
चित्तीं गमे ही उपमा बरीशी ॥३७॥ (४०)

**वल्ली**[6] पळे अब्दुल-पुत्र रानीं,
बांधूनि वस्त्रें स्वपदां करांनीं[7] ।
जाऊनि राहे घन वृक्ष जेथें,
गाढांधकारांत सुभीत-चित्तें ॥३८॥ (४१)

---

१ गिरि = डोंगर. कंदर = गुहा. या समासांतील गिरि-चें दीर्घान्तत्व सदोष आहे. २ तृण = गवत. पाळीव पशु धन्याचा सर्वस्वीं बंदा असतो. हा पशु गवत (तृण) खातो. यामुळें 'दांती तृण धरणें' म्हणजे आपली अत्यंत लाचारी, परावलंबित्व व्यक्त करणें असा अर्थ होतो. ३ कर = सोंड. ४ जमालखान; अफजलसैन्यपति. ५ सिंहास (पाहून). ६ हें अफजलखाना-च्या मुलाचें टोपण नांव आहे. ७ आपल्या हातांनीं पायांस वस्त्रें बांधून (अर्थात् पादत्राणाचें काम भागविण्यासाठीं).

### ४. युद्धांत अवध्य कोण ? ( वसंततिलका )

युद्धांत त्या भिषज[1] भिक्षुक[2] आणि मूढ[3],
स्त्रीसंघ याचक तसे असिहीन[4] योध ।
नापीत[5] दीन जलवाहक[6] चर्मकार,
यांतें रणीं न वधिती बुध हिंदुवीर ॥३९॥ (४२)

### ५. युद्धपरिणाम ( शार्दूलविक्रीडित )

योद्धे जे पडले कितीक समरीं लागूनि मर्मीं शर,
ते वाचे वदती ' शिवा, पुर-हरा, तारीं अम्हां सत्वर ' ।
' हे ताता, तनया, प्रिये, कवण हो रक्षी तुम्हांतें अतां ' ?
ऐसें अज्ञ वदे. स्मशान-समता पावे धरा तत्वतां ॥४०॥ (४३)

( पंचचामर )

खलीन-[7] हीन वाजि आणि हस्ति हस्तिपाविना,
यथेच्छ धांवती तयां करीति हिंदु बंधना । (४४)
सुदुंदुभीस[8] वाजवीत तो नथू चमूपती,
चढे सु-राजपर्वतीं[9], जयास वंदि[10] वर्णिती ॥४१॥ (४५)

---

१ भिषज् = वैद्य. २ हे भिक्षुक आणि चरण २–मधील याचक हे यवनांकडील असल्यामुळें त्यांचा अर्थ क्रमानें मुल्ला व फकीर असा करावा. ३ बवर्जी. ४ असि = तरवार. या शब्दानें येथें निःशस्त्र असा अर्थ घ्यावा. ५ स्नापयितृ (अंगास तैलादि लावून स्नान घालणारा)–ची प्रथमा स्नापयिता. या रूपावरून मराठीनें स्नापिता, स्नापित, व नंतर नापित (नंतर न्हावी) असें रूप केलेलें दिसतें. ६ पखाली. ७ खलीन = लगाम. ८ दुंदुभि (अनुकरणवाचक शब्द) = नगारा. येथील सु हें विशेषण केवळ अक्षरपूर्तीसाठीं घेतलेलें दिसतें. ९ राजपर्वत = राजगड. १० बंदिन् = भाट.

### ६. सैन्यास शिवाजीकृत देकार (साकी)

रिपु-जयिनी[1] त्या निज सेनेला आलिंगन दे राया,
भूषणभारें मधुर भाषणें सजल्या सुखी कराया ॥४२॥ (४६)
विप्रांनाही विपुल दक्षिणा दिधली **शिवरायानें**,
**नथु**नामा जो निज सेनापति तोषविला तो मानें ॥४३॥
गज, क्रमेला, तसेंच वाजी सांपडले यवनांचे,
रत्न-भूषणें बहुत लाभलीं, अगणित धनही साचें ॥४४॥
शिवरायाला समर्पिलें तें सर्वहि सैन्य-पतीनें,
उभा राहिला करां जोडुनी सन्मुख[2] तो सन्मानें[2] ॥४५॥ (४८)
**शिवें** तेधवां स्वीकारुनि तें दिधलें पुनरपि त्यातें,
'वाटावें हें सर्वहि योधां' केलें हया आज्ञेतें ॥४६॥ (४९)

### ७. भवानीची आज्ञा व तिचें पालन (उपजाति)

'प्रजेस पाडा करितील त्यांचा,
मी आजपासूनचि नाश साचा ।
आरंभ केला करण्या[3], **शिवे**ची[4],
आज्ञाहि आहे मजला अशीची ॥४७॥ (५०)

(इंद्रवज्रा)

या[5] पाहिजे सत्यचि वीरतोष,
द्यावें तुवां यास्तव सर्व त्यांस'
ऐकून आज्ञा **नथु** सैन्यपानें,
योधां दिलें वांटुनि रत्न-सोनें ॥४८॥ (५१)

---

१ जयिनी = जिंकणारी. २ यांतील सन् हा अवयव सम् याचें प्रामादिक रूपांतर आहे. मूळ रूपें संमुख आणि संमान हींच खरीं होत. ३ करण्या = करावयास. ४ भवानी देवीची. ५ प्रजापीडक यांचा उच्छेद करणें या कृत्यास.

## ८. प्रतापगडावर देवीची स्थापना (वसंततिलका)

तो श्रेष्ठ भक्त गिरिजाप्रतिमा[१] करूनी,
स्थापी प्रताप-शिखरीं[२] सुखदा **'भवानी'** ।
पूजीतसे प्रतिदिनीं **शिव** तो तियेतें,
तीही करी सफल भूप-मनोरथातें ॥ ४९ ॥ (५२)

## ९. अल्ली अदिलशहाचा शोक

चाराननें[३] परिशिलें रण-वृत्त कानें,
सेनेश-मृत्युहि तसा यवनाधिपानें ।
वज्रें जसें शिखर होय महीधराचें[४],
झालें तसें हृदय, भिन्न तदा तयाचें ॥५०॥ (५३)

'**वल्ली** पळूनि समरांतुनि येथ आला,
त्याचा पिताहि समरीं रिपुनीं वधीला' ।
हें सांगतां यवनभूप वधूस रातीं,
पर्यंकही त्यजुनि घे कच तोडुनी तीं[४] ॥५१॥ (५४)

दुःखार्णवीं पति पडे, वदली तदा ते,
'कैसा करील जन रक्षण? शत्रु येथें ।
येतां, घडे न बरवें. **शिव** जो जगातें,
झाला खरा अशिव तो यवनां अम्हांतें' ॥५२॥ (५५)

—३—

१ पार्वतीची मूर्ति, भवानी नांवाची. २ शिखरिन् = पर्वत. शब्दार्थ–प्रतापगडावर असा आहे. ३ चार = हेर. आनन = तोंड. शब्दार्थ–हेरांच्या तोंडून. ४ पर्वताचें. ४ अल्ली अदिलशाहाची बायको.

# चमत्कार ४

## १. शिवाजी-राज्यरक्षणयोजना (इंद्रवज्रा)

केव्हांहि राजा जरि तुष्ट झाला,
जाते त्यजूनी कमला[१] तयाला।
जिंकावया यास्तव देश जातां,
राज्यावनाची[२] मग थोर चिंता ॥१॥ (१)

हें सत्यसें[३] तत्त्व यदा मनीं ये,
केला तदा निश्चय हिंदुरायें।
'सह्याद्रिसानूवरि[४] दुर्ग बांधूं,'
बोले असें तो **शिवराज-साधू**[५] ॥२॥ (२)

बोलून ऐसें सुगुणैकराशी,
तो भूप ये दुर्गतलप्रदेशीं।
खाणून पाषाण, धनादि तेथें,
सामग्रि दे शिल्पि-जना तदा ते[६] ॥३॥ (३)

जैं चार संवत्सर[७] पूर्ण झाले,
तैं तीनशें साठ सु दुर्ग केले।
पाषाण-चूर्णादि[८] सामग्रि लागे,
ती दुर्गमूलीं खणितांच लागे[९] ॥४॥ (४)

---

१ लक्ष्मी. २ राज्याच्या अवनाची = रक्षणाची. ३ हें तत्त्व सत्य असलेलें. ४ सानु = शिखर. ५ राज्यस्थापना हे कार्य साधूं पाहणारा. ६ ती, म्हणजे बांधकामास इष्ट असलेली. ७ वर्ष. ८ चूर्ण = चुना. ९ सांपडली.

तोफा, तसे आयसगोल त्यांचे,
धान्यें, धनें, संघ तसे तृणाचे ।
काष्ठादि साहित्य समस्त ऐसें,
तैं ठेविलें अब्द[१] दहा पुरेसें ॥५॥ (५)

युद्धांगणीं ख्यात कुलीन योध,
जे सर्वदां शत्रुवधास सिद्ध ।
देऊनियां द्रव्य शिवें तयांतें,
त्या सर्व दुर्गांवरि ठेविले ते ॥६॥ (६)

## २. शिवाजीमनोगत (चामर)

दुर्ग, कोश, धान्य-राशि, शूर वाजि-सादि ही,
कार्यदक्ष मंत्रि आणि मीहि जिंकिता मही ।
'हें स्वराज्य जिंकिलें म्हणून सत्य[२] आज मीं',
होय मानिता असें, शिवाजि भूप तो शमी[३] ॥७॥ (७)

## ३. जलदुर्गांची बांधणी व व्यवस्था

'जे जलाशयांत आज शत्रुदुर्ग वर्तती,
मत्प्रजेस तेथचे[४] सुभीति शत्रु दाविती ।
होय दंड त्यां कसा? प्रजेस रक्षुं मी कसा?
नीर[५]-दुर्ग बांधितां प्रसंग हा न ये असा' ८ (८,९)

एकदां शिवाजि तो विचार हा करूनियां,
सागरासमीप जाय, होय पूजिता तया ।

---

१ वर्षे. २ सत्य जिंकिलें = वस्तुतः जिंकिलें असेंच म्हणावयाचें. ३ शांत मनाचा, थोड्याशा लाभानें हुरळून न जाणारा. ४ पाणकिल्ल्यांत असलेले हबशी इत्यादि. ५ नीर = पाणी. दुर्ग = गड, किल्ला.

तत्तटीं निशीं निजे उशेगणा करूनियां,
स्वप्निं तैं पुरूरवेष[1] सिंधु भेटला तया ॥९॥ (१०,११)

## ४. शिवाजी-समुद्रपुरुष-संवाद (शार्दूलविक्रीडित)

"लोकाऽनंदकरा नृपा, मम गिरा तूं ऐक, हो स्वस्थसा,
आहे शैल जलाशयीं,-न इथुनी जो दूर नाहीं असा ।
बांधीं दुर्ग तयावरीच लघुसा, तोयास[2] मी वारितो,
साधीं[3] एक दिनांत" हें कथुनियां झाला तदा गुप्त तो ॥ १० ॥
(११, १२, १३)

## ५. सिंधुदुर्गरचना (मंदाक्रांता)

त्या दुर्गाची प्रथम रचना एक संवत्सरांत,
शिल्प्यां-हातीं रुचिर[4] करवी भूवरी हिंदुनाथ ।
बोले वाचा मग जलधितें "दाखवीं शैल आतां",
तेव्हां झाला जलनिधि तया पर्वता दाखवीता ॥११॥
(१४, १५)

(दिंडी)

एक दिवसांतचि दुर्ग पूर्ण केला,
सागरानें मग जलें वेष्टियेला ।
जनां वाटे तो अब्धि, सरा[5] ऐसा,
दुर्ग शोभे त्यामधें कमल तैसा ॥१२॥ (१७,१८)

---

१ संस्कृतांत यांतील पू दीर्घही चालतो. पण येथील दीर्घ रू हा केवळ वृत्तार्थच कवीनें योजिला आहे. २ तोय = पाणी. ३ संपव. ४ सुंदर, उत्तम. ५ सरस् = तळें.

(ओंवी)

'सरोवरांत[१] मी सागर'। भगवदुक्ति ही साचार,
भगवन्नाभी कमलाधार। उपमा शोभे ती,[२] येथें ॥१३॥
अंतर्भागीं नंतर देखा। सुंदर केली यंत्र[३]-भूमिका,
शोभते जशी *पूर्ण राका[४]। ऐशी प्रभा तियेची ॥१४॥ (१९)
तैसेंच केलें जल-यान[५]। दुर्गीं ठेविलें स्वीय सैन्य,
वदती ज्यास **मालवण**। प्रसिद्ध दुर्ग तोच हा ॥१५॥ (२०)
समुद्राचें क्षार जीवन[६]। यास्तव अन्ना न लागे लवण,
यथार्थ नाम मा-लवण[७]। त्या दुर्गाचें शोभतें ॥१६॥
अन्न शिजविनां नको लवण। म्हणून नाम **मा-लवण**,
मा अव्ययाचा अर्थ हीन। असाच आहे सर्वत्र ॥१७॥ (२०)
तेथें स्थापून अधिकारी। आला **सप्तार**[८] किल्ल्यावरी,
**श्रीकृष्णे**च्या दक्षिण तीरीं। आहे प्रसिद्ध दुर्ग हा ॥१८॥ (२१)
राजधानी स्थापून तेथें,। सुखी केले प्रजाजनांतें,
कांहीं न्यून नसे कोणातें। श्री-जगंदबा-प्रसादें ॥१९॥ (२२)

## ६. **कलीला अपकीर्तीविषयीं चिंता** (शिखरिणी)

'कृतीं, द्वापारीं, मी नलमुख[९] नृपां दुर्गति[१०] दिली,
युगीं माझ्या नाहीं कुमति **शिवभूपास** जडली।

---

१ सरोवर = जलाशय. २ या मालवण किल्ल्यास पद्य १२ मध्यें कमलाची उपमा दिली आहे. 'सरसामस्मि सागरः' या गीतेंतील भगवदुक्तीप्रमाणें सागर विष्णु ठरतो. अर्थात् सागराच्या मध्यभागीं असलेला किल्ला विष्णूच्या नाभिस्थानीं अथवा नाभिकमलाचे स्थानीं प्राप्त होतो. अशा रीतीनें किल्ल्यास दिलेली कमलाची उपमा उपपन्न होते. ३ तोफा इत्यादि मारकयंत्रें ठेवण्याचें स्थान. *सवैया. ४ 'राका पूर्णे निशाकरे' राका = पूर्णचंद्रानें युक्त पौर्णिमा. ५ 'जातौ एकवचनं' या वचनानुसार गलबतें असें अनेकवचन येथें ग्राह्य आहे. ६ पाणी. ७ मा (नको) लवण (मीठ) ज्या किल्ल्यांत तो. ८ सातारा. ९ नल इत्यादि; मुख = मुख्य. १० कष्ट, हाल.

न झाली भूपाची सु-मति[1] जरि दुर्मार्ग-गमनी,
तरी माझी होई उघड अपकीर्ति त्रिभुवनीं ' ॥२०॥ (२३)

**७. कलि-प्रेरित गागाभट्ट व शिवाजी** (वसंततिलका)

ऐसा तदा कलियुगें करितां विचार,
**गागा**[2]-द्विजें कथियलें **शिवजीस** सार।
आशीर्वचें शिव तुझें नृपते, कराया,
मी सर्वदा झटतसें तुज सौख्य द्याया ॥२१॥ (२४)

(दिंडी)

जरी[3] आचरसी क्षात्रधर्म नित्य,
तरी क्षत्रिय झालासि नृपा सत्य।
मौंजि तैसें वेदोक्त[4] लग्न तूंतें,
योग्य आतां[5] तूझिया अन्वयातें[6] ॥२२॥ (२५)

भट्ट[7]-वाक्यें संतुष्ट भूप झाला,
तदा त्यानें नर-यान[8] दिलें त्याला।
गृहा नेला, कलिकार्य पूर्ण झालें,
स्वीय चित्तीं कलिराज तदा धाले[9] ॥२३॥ (२६)

**८. शिवाजीचें मौंजीबंधन व लग्न** (मंदाक्रांता)

भट्टें केलें उपनयन[10], तैं बांधिली मेखला[11] जे,
शोभूं लागे अजिन-[12]धर तो, दंड हस्तांत साजे।

---

१ विचारी मन. २ गागाभट्ट नांवाचा काशीकर विद्वान् ब्राह्मण त्यानें. ३ जरी-तरी = ज्या अर्थी त्या अर्थी. तूं क्षत्रियाप्रमाणें वागत असल्यानें क्षत्रियच झाला आहेस. ४ वेदांत सांगितलेले मंत्र उच्चारून. ५ आतां म्हणजे तुझ्यापासून पुढें. ६ वंशांतील पुरुषांना. ७ गागाभट्ट. ८ मनुष्यांनीं वाहिली जाणारी पालखी. ९ तृप्त झाले. १० मुंज, मौंजीबंधन. ११ जो कटदोरा—करगोटा. १२ अजिन = (हरिणाचें चामडें).

मौंजी[१] त्यागी, मग[२] वधु वरी स्वीयवंशानुसारी,
बोलूं लागे त्रिपदि[३]-जप तो, ज्या प्रजा मान्य[४] सारी ॥२४॥ (२७)

(उपजाति)

स्वजाति[५]-धर्मी रत जो नृपाळ,
तद्बुद्धि केली कलिनें गढूळ।
द्विजास योग्या त्रिपदी जपाया,
तो सिद्ध झाला,-सुचवी[६] अपाया ॥२५॥ (२८)

## ९. शिवाजीचा दिल्ली जिकण्याचा विचार व गमन (स्रग्धरा)

गायत्रीच्या जपानें क्षितिगत धन तैं गुप्त कांहीं दिसांनीं,
झालें, हर्षे तयानें कुमति कलि, मनीं आपणा धन्य मानी-।
ज्याची[७] श्री शक्रतुल्या, सुनय[८]-विदित जो, शत्रुजिच्छूर,[९] मानी,
जिकाया दिल्लि-पातें शिव नृपति मनीं सद्विचारास[७] आणी २६
(२९, ३०)

---

१ मुंज-उपनयनांत गवताची कमरेला बांधावयाची दोरी. २ राज्याभिषेक-समयीं पट्टराणी म्हणजे महिषी तिचा अधिकार, पुतळाबाई मुख्य राणी होस, प्राप्त व्हावा म्हणून तिच्याशीं फिरून विवाह समंत्रक शिवाजीनें केला. असें अन्यत्र आहे. ३ तीन चरणांनीं युक्त असलेला गायत्रीमंत्र. ४ मान देणारी. ५ शिवाजीनें स्वीकारिलेल्या क्षत्रिय जातीचीं कर्तव्यें. ६ स्वतःस अयोग्य असा गायत्रीचा जप करणें यानें 'पुढें नाश होणार' असें सुचविलें. कवीच्या मतें शिवाजीनें गायत्री जपण्यांत अधर्म आचरिला. अर्थात् शिवाजी-विषयीं त्याचें मन प्रतिकूलच दिसतें. ७ पण २६ व्या पद्याच्या उत्तरार्धांत हें मत बाजूस ठेवून, दिल्लीवर स्वारी करणें हा शिवाजीचा संकल्प तो योग्य मानीत आहे. ८ चांगल्या न्यायदानामुळें प्रसिद्ध. ९ शत्रुजित् = शत्रूस जिंकणारा.

(साकी)

निघूनियां तो सेनेसह मग रेवा-[१]तीरीं पावे,
वांछित-दा ती देखुनि वीरा वाटे स्नान करावें ॥२७॥
तेव्हां तेथें स्नान करूनी पितरां तर्पण केलें,
भूपें सैन्या शत नौकांनीं परतीरातें नेलें ॥२८॥ (३१)

## १०. दिल्ली पातशहाचा दैववाद (वसंततिलका)

'लंघूनि[२] सैन्यसह ये रिपु नर्मदेतें',
हें वृत्त होय बहु दुःखद दिल्लिपातें।
बोले 'विरोध न हितावह, साम[३] कीजे,
प्रारब्ध-साह्य नसतां लढणें न साजे' ॥२९॥ (३२)

## ११. शिवाजी व दिल्लीश्वर ह्यांचें युद्ध (कामदा)

म्लेच्छ भूप तो मूर्खता वरी,
सत्य ना करी स्वीय वैखरी[४]।
प्रेषिला रणा वाहिनी-पती[५],
त्यासवें दिली वीर-संहती ॥ ३० ॥ (३३)

(वसंततिलका)

संलक्ष्य[६] जें सुरवरांसहि युद्ध साचें,
सप्ताह होय रणिं[७] घोर परस्परांचें।
गेली कृतांत[८]-भुवना यवनेश-सेना,
सत्कीर्ति हिंदु वरिती, वधुनी रिपूंना ॥ ३१ ॥ (३४)

---

१ रेवा = नर्मदा. २ अन्वय – रिपु सैन्यासह नर्मदेतें लंघूनि ये. ३ संधि. ४ वाणी, वचन. ५ सैन्याचा नायक. ६ बघण्यासारखें. ७ रणीं युद्ध होय. येथें युद्ध-शब्द योजिला असल्यामुळें तत्तुल्यार्थक रण-चा अर्थ युद्धभूमि असा प्राप्त होतो. ८ यमलोकाला.

## १२. दिल्लीकर पराभूत

मेळी चमू सकलही यवन-प्रिया जी,
तैं तीन-चार उरले हत-शेष वाजी।
ते घेउनी यवन-सैन्यप तो निघाला,
दुष्कीर्तितें वरुनियां स्वपुरास आला ॥३२॥ (३५)

पौरां, समस्त यवनां, बहु दुःख होय,
अन्न त्यजूनि वदती जन 'हाय हाय!'।
दुःखामुळें त्यजिति ते रुचिरा पटास,
वस्त्रें जुनीं कवळिती नच झोंप त्यांस ॥३३॥ (३६)

(मालिनी)

पुनरपि यवनेशें साधुनी सद्विचार[1],
निज सचिव रणातें प्रेषिला शूर-धीर।
हय-सहित दिले तैं त्यासवें पारसीक[2],
अमित यवन[3], तैसे हूण[4] योद्धे अनेक ॥३४॥ (३७)

—४—

१ चांगला सल्ला (मंत्र्यांपासून) घेऊन. २ इराणांतील लोक. ३-४ मुसलमानांतील मूलस्थानदृष्ट्या भेद.

# चमत्कार ५

## १. शास्ताखानाची शिवाजीवर पाठवणी (शालिनी)

शास्ता[१] ऐसें ज्या असें नाम सार्थ,
दिल्लीशानें प्रेषिलें त्या रणार्थ।
सर्वांतें जो वाटला कार्यसाधू[२],
योद्धा युद्धा तो निघे धैर्यसिंधू ॥१॥ (१)
होते मोठे ज्यामध्ये हस्ति कच्छ,*
तैसे होते वीर हे ज्यांत मत्स्य[३]।
अश्वांचा जो संघ हे नीर ज्यांत,
संगें ऐशा सागरा[४] म्लेंच्छ[५] घेत ॥२॥ (१)
अश्वारूढा कुंजरारूढ वीरा[६],
उष्ट्रारूढा खड्गयुक्ता गभीरा।
संगें घेई दक्ष जे[६] युद्धशास्त्रीं,
धन्वी त्यानें घेतले तीक्ष्णशस्त्री ॥३॥ (३)

(आर्या)

मानवजीवघ्नी ज्या तोफा कित्येक भव्य[७] शब्दकरा,
सकुंत[८]-खड्ग तेव्हां शोभविती सर्वथैव वीरकरां ॥४॥ (२

---

१ अंमल करणारा, हुकमत चालवणारा. २ कार्य साधणारा. ३ मासे. * कासव. ४ या ठिकाणीं सेना असें पद सागरापूर्वी अध्याहृत घ्यावें. ५ हा शब्द येथें व पुढेंही सानुस्वार लिहिला आहे; पण संस्कृतदृष्ट्या त्यात अनुस्वार नाही. ६ 'जे' हा शब्द सांगतो वीर अनेक होते. अर्थात् त्यामुळें 'वीरां' असें अनुस्वारान्त पद येथें पाहिजे. ७ मोठ्या, अजस्र. येथें लक्षणीय हे की, भव्य—ला संस्कृतांत हा अर्थ नाही. ८ भाले, तरवारी.

(उपजाति)

अपार घेऊनि सुवीर जेठी[1]। सुवर्ण[2]-मुद्रा तयिं तीन कोटी,
दिशा तसा भानुहि लोपवूनी। शास्ता निघाला स्वचमूरजांनीं[3]॥५॥(४)

(इंद्रवज्रा)

'येई न हो शत्रुवधाविना मी'
ऐशा प्रतिज्ञेस करून नामी[4]।
सेनेश तो राहुचि साच मानूं,
ग्रासावया जाय **शिवाजी** भानू ॥६॥ (५)

## २. शिवाजीचे विचार व भवानीचा संचार (शालिनी)

**विंध्याद्रीतें** लंघुनी म्लेंच्छ आले,
ह्या वृत्तांता ऐकुनी भूप बोले।
कैसा आला अब्धि हा शत्रुरूप?
आतां माझा[5] कैं[6] टिके अल्पकूप?' ॥७॥ (६)

कोणी सांगे सामची आचरावा[7],
युक्तीनें वा भेद यांशीं करावा।
वीरा वाटे युद्ध द्यावें रणांत,
अन्या झाला हेतु[8] हा नापसंत ॥८॥ (७)

चिंता-डोहीं पोहतां तो **शिवाजी**,
त्याच्या देहीं संचरे **श्रीशिवा** जी।

---

१ मल्ल, योद्धे. २ होन. ३ आपल्या सैन्याच्या चालीमुळें उडालेल्या धुराळ्यानें. ४ फार उत्तम. या शब्दानें प्रतिज्ञेचें पुढील वैफल्य सूचित होतें. ५ माझा अल्पकूप = लहान विहिरीसारखा मी. माझा ही अभेद-षष्ठी आहे. ६ कसा? ७ साम शब्द नपुसकलिंगी असल्यानें हें पुल्लिंगरूप सदोष आहे. यांतून मार्ग 'आचरा वा' असा पदच्छेदानें निघेल. ८ बेत.

'सर्व चिंता त्यागुनी युद्ध द्यावें,'
ह्या वाणीतें बोलली ती स्वभावें[1] ॥९॥ (८)
सन्मंत्र्यांनीं, अंबिका-भारतीतें[2],
देवी जातां, शंसिलें[3] भूभुजातें[4]।
तें ऐकूनी हृष्ट तो भूप झाला,
तेव्हां त्यानें युद्ध-संकेत केला ॥१०॥ (९)
**पुण्यग्रामीं**[5] म्लेंच्छ सेनेश राहे,
त्या भूपालें वृत्त ऐकूनियां हें।
सेनेसुद्धां **राजदुर्गा-**[6]वरूनी,
तेथें आला तो रणेच्छा धरूनी ॥११॥ (१०)
अश्वारूढां[8] स्वीय वीरांस तेथें[7],
संरक्षाया ठेविलें हिंदुनाथें।
बाकी कांहीं राहिले जे तुरंगी[8],
त्यांतें तेव्हां घेतलें आत्मसंगीं ॥१२॥ (११)

(३) **शास्ताखानास शिक्षा** (भुजंगप्रयात)

स्थिरावूनि मागें हयारूढ[8] वीरां,
सवें घेतले थोडक्या पाद*चारां।
स्वयें जाउनी तैं शिबीरा रिपूच्या,
नृपें फोडिल्या सात भिंती पटाच्या[9] ॥१३॥ (१२)
वधा ज्या अयोग्या अशा म्लेंच्छनारी,
जरा दूर[10] सारी[10] नदां दुर्जनारी[11]।

---

१ आपल्या मनापासून २ भारती = वाणी, शब्द. ३ शंस = सांगणें. ४ राजाला. ५ पुणें या गावांत. ६ राजगड. ७ शाहिस्तेखानाच्या छावणीपासून मागें कांहीं अंतरावर. ८ घोडेस्वार. ९ (तंबूच्या) कापडाच्या. १० (भिववून) दूर पालविल्या. *पायदळापैकीं सैनिक. ११ दुर्जनांचा शत्रु, शिवाजी.

४ शिव.

तिथें नग्न तो म्लेंच्छसेनेश होता,
तयानें शिवा[1] देखिलें शस्त्रवंता[2] ॥१४॥ (१२)

(साकी)

म्लेंच्छाला त्या तदा भासला **शिवाजि** कालसमान, (१२)
लज्जाकुल तो वधूसमाजीं गेला, लवली मान ॥१५॥ (१३)
भ्यालेल्या त्या शस्त्रविहीना[3] ठार न मारी दीना[3], (१४)
सव्य[4] कराच्या तीन अंगुली छेदी हिंदूराणा ॥१६॥
तेज दाउनी **शिवाजि**नृप तो निज स्थलातें गेला,
कां न म्हणावें 'समय[5]-दक्षता नाहीं म्लेंच्छ-जनाला'? ॥१७॥ (१४)

(इंद्रवज्रा)

'तो यक्ष कीं राक्षस सिंह, काल,
ज्यानें दिली भीति अम्हांस काल!'।
भीतीमुळें ती यवनेशसेना,
ऐसे करी नूतन तर्क नाना ॥१८॥ (१५)

(वैश्वदेवी)

तेव्हां ऐशा शासनातें करूनी,
गेला स्वीया **राज**दुर्गा चढूनी।
तेथें राहे स्वस्थ तो हिंदुनाथ,
**शाहिस्तेखां** फार भ्याला मनांत ॥१९॥ (१६)
प्रात:कालीं सर्व योध्दे मिळूनी,
'रात्रीमाजीं काय झालें'? म्हणूनी।

---

१ शिवाजीस. २ शस्त्र घेतलेल्या. ३ शस्त्ररहित आणि लाचार (अशांस मारणें वीरास योग्य नाहीं). ४ सव्य = डावा. ५ वेळीं जागरूक असणें, दूरदर्शीपणा

उत्कंठेनें पूसती सैन्ययातें।
हस्ता दावी तो, कथी वृत्त त्यांतें ॥२०॥ (१७)

### ४. शास्ताखानाची भीतिग्रस्त स्थिति (वसंततिलका)

'हा शत्रु आज अथवा उदईक माझें,
छेदील मस्तक शरें, मग काय कीजे!।
हा देह सत्यचि पुन्हां मिळणार नाहीं,
आतां इथें क्षणहि यास्तव मी न राही' २१ (१८)

(इंद्रवज्रा)

ऐकून हा सैन्यप-भाषणातें। कित्येक योध्दे वदतां तयातें।
'बोटूं नये शूरवरें असें हो[1]'। 'मारा-मरायास्तव संगरीं[2] हो[2]
॥२२॥ (१९)

(आर्या)

रिपु-हननें इहलोकीं भूमि-सुखातें यथेच्छ भोगाल,
शत्रु-करें मृत झाल्या, स्वर्गीं देवासमान वागाल' ॥२३॥ (१९)

(शार्दूलविक्रीडित)

ऐशा स्वीय-जनोक्त सत्य वचना त्या सैन्यपें ऐकिलें,
'केलें वश्य मदीय वीरहि नरें' ऐसें तया वाटलें।
तेव्हां तो अवर्काळिनें वरुनियां प्राणावनें[3] तोषला,
गेला स्वीय पुरा तदा यवनपें[4] वृत्तांत हा ऐकिला ॥२४॥ (२०)

---

१ संबोधनार्थक अव्यय. २ युद्धांत अस, युद्धांत शीर, लढ. ३ प्राणाच्या रक्षणानेंच, आपला जीव बचावला एवढ्यानेंच, संतुष्ट झाला. ४ बादशहानें.

(स्रग्धरा)

'**शास्ता** हें नाम तूतें कृति न समजतां ठेविलें कां पित्यानें!
शत्रूनें शासिलें कीं[1] उलट तुजसि कीं, व्यर्थ हा जन्म त्यानें।
त्यागी हें नाम आतां, मम बलहि[2] तसें, तोंड काळें करीं जा'।
ऐशी त्या क्लीब[3]-नाथा असि[4]-सम वचनें बोलला म्लेंच्छ राजा २५
(२१–२३)

**५. जयसिंहाची शिवाजीवर पाठवणी** (वसंततिलका)

जो धीर, वीर, समरीं निज-शत्रु-हंता,
कामादि शत्रु दमुनी करिं नाक घेता[5]।
सच्छौर्य[6] हेंच गमलें व्रत ज्यास नामी,
होता चमूपति असा **जयसिंह**-नामी[7] ॥२६॥ (२३)

(आर्या)

'**शाहिस्तेखाना**नें मत्पूर्वार्जित सुकीर्ति हारविली,'
ऐशी त्या **जयसिंहा** म्लेच्छ नृपानें निजोक्ति जाणविली[8] २७ (२४)
'दिधलीं मीं मद्वीरां ग्राम[9], तशीं द्रव्य भूषणें रत्नें।
तोषित केलें सकलां आजवरी तनयसे महा-यत्नें ॥२८॥

---

१ यांतील एक 'कीं' निरर्थक आहे. चरणाचा अर्थ–कारण, उलट तुलाच शत्रूनें चीत केलें; यामुळें तुझा जन्म फुकट. २ सैन्य. ३ क्लीब = बेवकूफ, मेषपात्र. ४ असि = तलवार. ५ या चरणाचा अर्थ—कामादि विकार जिंकून स्वर्ग हस्तगत करी असा, अत्यंत पुण्यशील. ६ कपटानें रहित असा पराक्रम. ७ नांव धारण करणारा (मूळ शब्द–नामिन्). ८ ऐकविली, सांगितली. ९ हा शब्द पुल्लिंगी घेतल्यास 'दिधले' असें रूप पाहिजे. नपुं. लिं. घेतल्यास 'ग्रामें' असें रूप पाहिजे; अर्थात् असलेली रचना कोणत्याच प्रकारें शुद्ध ठरत नाहीं.

आला त्या दानाचा समय[1], करीं शत्रुनाश **जयसिंहा,**
रिपुच्या उत्कर्षानें होतें स्वीया जनांस दुःख महा ॥२९॥ (२५)

(दिंडी)

दक्षिणेचा जिंकिला देश सारा,
**शिवाजी** हा घेतसे तेथ सारा[2] ।
जरी आला **विंध्याद्रि** लंघुनीया,
काय कीजे मग! सांग, वीरवर्या' ॥३०॥ (२६)

वचन ऐकुनि हें म्लेंच्छ भूपतीचें,
वदे त्यातें **जयसिंह** वीर साचें ।
'**शिवाजी**तें बांधून आणितों मी,
त्यजा चिंतेतें स्वस्थ असा धामी[3]' ॥ ३१ ॥ (२७)

( वसंततिलका )

म्लेंच्छाधिपा नमुनि सैन्यप तो निघाला,
होतां सर्वे यवन, नाम जया **दलेला** ।
सच्छूर[4]-संघहि सर्वे जलधीसमान,
तैसेच ते यवन आणिक शूर हूण ॥ ३२ ॥ (२८)

( ललित )

भानु लोपला पदरजें, तशा
व्याप्त जाहल्या सकलही दिशा ।
भेरिच्या[5] रवें गगन कोंदलें,
शस्त्र[6]-पाणि ते यवन चालले ॥ ३३ ॥ (२९)

---

१ चीज करून दाखविण्याची वेळ. २ जमिनीचा कर. ३ घरीं. ४ सत्-शूर-संघ = जातिवंत वीरांचा जमाव. ५. भेरी = नगारा. ६ हातांत शस्त्र धारण करणारे.

## ६. जयसिंहाची देवीउपासना (उपजाति)

**रेवा**-तटाकीं **जयसिंह** आला,
तैं सूचला हा सुविचार त्याला।
'प्रसन्न आहे **शिवजीस** देवी,
ती वश्य यत्नें यवनीं करावी' ॥ ३४ ॥ (३०)

पंचा[१]युतें ब्राह्मण वेदवेत्ते,
पाचारिले यज्ञ करावयातें।
मास-[२]त्रयें यज्ञ सुपूर्ण होतां,
वदे[३] "वरं[४] ब्रूहि[४]" जगैकमाता ॥ ३५ ॥ (३१)

(दिंडी)

'तुझ्या यज्ञानें तुष्ट मनीं झालें,
ब्राह्मणांच्या भक्तिनें चित्त धालें।
पूर्ण इच्छा होईल तुझी आतां',
वदे ऐसें म्लेंच्छास जगन्माता ॥ ३६ ॥ (३३)

(साकी)

उठूनियां तो प्रातःकाळीं द्विजसंघातें पूजी,
तीन कोटि दे रौप्य-मुद्रिका प्रयाण नंतर योजी ॥३७॥(३४)

---

१ पंच = पांच. अयुत = दशसहस्र. पंचायुतें = पन्नास हजार. २ तीन महिन्यांनीं. ३ बोलली—जगन्माता देवी जयसिंगास त्याच्या धार्मिक अनुष्ठानानें प्रसन्न होऊन इष्ट वर देण्यास तयार झाली. इकडे शिवाजीवर तिची कृपा होतीच. असें देवपणास न शोभणारें दुटप्पी वर्तन तिच्या गळीं बांधण्याची परंपराच बखरी इ. पुराण्या भावड्या लिखाणांत दिसून येते. ४ वर बोल, माग.

### ७. शिवाजीचा विचार व देवीचा आदेश (वसंततिलका)

हें वृत्त जैं परिशिलें **शिवराज**[१] यानें,
पाचारिलें सचिववर्य तदा तयानें ।
बोले तयास 'हरिसा* रिपु येत आहे,
सांगा सुयुक्त मजला करणें कसें, हें' ॥३८॥(३५)

(इंद्रवज्रा)

ते बोलले, सामचि योग्य आतां,
कोणी वदे, भेद सुखास दाता ।
युद्धाविना[२] हा रिपु वश्य नोहे,
गाजी[३] **शिवाजी** सकला वदे हें ॥ ३९ ॥ (३६)

(उपजाति)

'दिल्लीपति-प्रेषित जो **दलेला**,
क्रूराग्रणी म्लेंच्छज माजलेला,
जशी जशी तो खल बुद्धि सांगे ।
तसें तसें हा **जयसिंह** वागे ॥ ४० ॥ (३७)

(वसंततिलका)

हे सभ्य हो, वश नव्हे रिपु याच-साटीं
युद्धार्थ बुद्धि उपजे मजलाहि मोटी ।
येतां रणीं जय, करीन जनावनातें,
स्वर्गांगना-सुरत[४] ना तरि, योग्य मातें' ॥ ४१ ॥ (३८)

---

१ 'शिवराज यानें' अशीं दोन पदें घ्यावीं किंवा 'शिवराजा' याची तृतीया म्हणून एक पद घ्यावें. २ या चरणांत शिवाजीचा विचार सांगितला आहे. ३ धर्मसंरक्षक जेता. ४ सुरत = उपभोग. *सिंहाप्रमाणें.

जैं सिद्ध होय नृप युद्ध करावयाला,
देवी तदां नभगिरा[१] वदली तयाला।
"बा युद्ध तूं करुं नये चमुशीं रिपूच्या,
जावें तियेसह पुरा यवनेश याच्या ॥ ४२ ॥ (३९)

वत्सा, असे समय हा विपरीत तूंतें,
कारागृहांत पडसी, मग मीच तेथें।
रक्षीन" हें परिसुनी वच अंबिकेचें,
केली नमस्कृति शिवें चरणीं तियेचे ॥४३॥ (४०)

## ८. जयसिंह शिवाजीस भेटीस बोलावतो

होता पुरंदर-गिरी निकटीं* विशीख,
तों[२] पाठवी नृपति-सन्निध दूत एक।
'भूप-प्रिया द्विजवरा झणि[३] आण ऐशी',
आज्ञा दिली यवन-सैन्य-वरें[४] तयासी ॥४४॥ (४१)

जाऊन तो चर तदां जवळी शिवाच्या,
सांगे तयास सकला जयसिंह-वाचा।
'राहून आज, उदयीक[१] तुवां निघावें',
बोले असें नृप चराप्रति शुद्ध भावें ॥४५॥ (४२)

'आज्ञा करी नृप तदां रघुनाथ याशी,
तूं आज जा निज चमूसह शत्रुपाशीं'।
आज्ञेनुसार मग तो द्विज-वर्य जातां,
झाला तया यवन-सैन्यप मान देता ॥४६॥ (४३-४४)

---

१ नभस् = आकाश; गिरा = वाणी. *निकटी = जवळ. २ इकडे (जयसिंह पाठवी). ३ लवकर. ४ यवनसेनापति जयसिंह.

एकांत पाहुनि वदे **जयसिंह** त्यातें,
कापटय[1]-युक्त परि या मधु*-शा वचातें।
'थोरासवें लघुजनें करितां विरोध,
तें नाश सत्य घडतो लघुचा, प्रसिद्ध[2] ॥४७॥ (४४-४५)
जंबूक[3] घेइल जरी मृगराज[4]-भागा,
कैसें मिळेल सुख त्या द्विजवर्य, सांगा।
कां जिंकिलें **शिवजिनें** यवनेश-देशा?
आतां तयास मिळतो सुखलाभ कैसा?॥ ४८ ॥ (४५)
त्वद्भूप इच्छित असे जरि अल्प राज्या,
घेऊन त्यास मम सन्निध शीघ्र ये, जा।
आम्ही तुम्ही सकलही जगदीशदास,
आम्हांस[5] सौख्यचि असे, हित जें तुम्हांस ॥ ४९ ॥ (४६)
ही सत्यता न बिघडे मम[6] भारतीची[7],
मी वाहतों शपथ ही तुमच्या[8] पदाची'।
ऐकून हें द्विज तदा **शिवसन्निधानीं**,
आला, कथी चरित हें **शिवजीस** कानीं ॥ ५० ॥ (४७)
दुर्गा-वचा[9] रिपु-वचा मनिं आणुनीयां,
कर्तव्यकर्म नृप तो सजला कराया।
घेऊनियां मग सवें निज धीर वीरा,
गेला सुनिर्भयपणें रिपुच्या शिबीरा ॥५१॥ (४८)

---

१ पद्य २३ मध्यें जयसिंह सत्यनिष्ठ म्हणून वर्णिला आहे. त्याशीं या चरणांतील वर्णन जमत नाहीं. * मधासारखें गोड. २ ही गोष्ट प्रसिद्ध आहे. ३, ४ जंबक शब्दानें शिवाजी व मृगराज शब्दानें पातशहा सूचित आहेत. ५ या चरणाचा अर्थ—तुमच्या कल्याणांतच आम्ही आपलें सुख मानतों. ६ माझी. ७ वचनाची ८ शिवाजीचा वकील ब्राह्मण असल्यानें जयसिंहानें त्याच्या पायाची शपथ वाहिली आहे. ९ देवीचें सांगणें.

## ९. पुरंदर-युद्ध : मुरारबाजीचा पराक्रम ( शार्दूलविक्रीडित )

सामोरा यवनेशसैन्यपति तैं हिंदूनृपालांस ये,
त्यातें बैसवुनी गजावरि निजा स्थानास[१] नेई स्वयें। (४९)
तेव्हां दुर्ग पुरंदराख्य लुटण्या हर्षे दलेला निघे,
सांगातीं निज सैन्यही बहुतसें युद्धा करायास घे ॥५२॥ (५०)
दुर्गा वेढुनि लागले यवन ते तोफाहि सोडावया,
क्षुब्धा हिंदुजनां तदां पथ नसे अन्य स्थळा जावया।
म्लेंच्छांनीं शरवृष्टि, मेघ जलशी, दुर्गावरी सोडितां,
स्वीयां शूर जनां मुरारि परभू घेऊन ये खालता ॥५३॥ (५१,५२)
केलें संगर घोर त्या परभुनें सैन्यासवें शत्रुच्या,
शस्त्रा[२]शस्त्रचि घासुनी[२] प्रगटल्या ज्वाला तदा वन्हिच्या।
पादें धूलि तदां नभीं उडुनियां भानूसही लोपवी,
येऊनी अवनीवरी परत ती रक्तें सुपंकाव वी ॥ ५४ ॥ (५२,५३)
संछिन्ना[३]वयवी रणांत पडले उष्ट्रादि वाजी करी,
हर्षे वायस-गृध्र-संघ मिळुनी शोणीत[४]-पाना करी।
भ्यालें हिंदु-भटांस शत्रुबळ तें रानीं पळालें भयें,
तेव्हां देखुनि त्यां पलायन-[५]परां बोले दलेला स्वयें ॥५५॥ (५४,५५)

( दिंडी )

'शूर आहे सर्वांत यवन जाती,
कीर्ति ऐशी ही सर्व लोक गाती।
तुम्हीं भेणें[६], त्यागून युद्ध, जातां,
त्याग तुमचा करितील गृहीं कांता ॥ ५६ ॥ (५६)

---

१ आपल्या छावणींत. २ परस्परांच्या शस्त्रांचें एकमेकांवर घर्षण होऊन. ३ संछिन्न = कापलेले. ४ शोणित = रक्त. ५ धम पळत सुटलेले. ६ भयानें.

वृत्तलेखन[1] ही वृत्ति मुरारीची,
तुम्हां वीरां कां भीति त्या अरीची?
हस्तिसंघा सिंहसा मर्दिताहे,
तुम्हांतें तो. धिक् जिणें तूमचें हें!' ॥५७॥ (५७)

( मंदाक्रांता )

ऐसें सैन्या कथित असतां, त्यापुढें ये **मुरारी**,
हस्तामाजीं धरुनि असितें ढाल ही त्या[2]-पुढारी ।
त्याच्यासंगें बहुत विजयी हिंदुयोद्धेहि आले
म्लेंच्छांशीं जे समर करण्या फार उत्सूक झाले ॥ ५८ ॥ (५८)
मारुनी तैं पदचर भटां, वाजिसादींहि[3] कांहीं,
स्वीय स्थाना परत परते[4] तो **मुरारी** स्वतांही ।
तें पाहूनी चकित मनसीं[5] फार झाला **दलेला**,
तेव्हां त्यानें निज रिपुसवें घोर संग्राम केला ॥ ५९ ॥ (५९)

( शार्दूलविक्रीडित )

झालें संगर घोर तैं, चमकतीं शस्त्रें रवीच्या करें,
मध्याह्नाप्रति ये दिवाकर तरी ईर्ष्या भटां नावरे ।
रक्तें रक्तचि जाहल्या भट-तनू, युद्धांत ते भागले,
तेव्हां फुलऊ पलाशसे महिवरा[6] शोभावया लागले ॥ ६० ॥ (६०)
कोणी विह्वळ, हस्तपाद तुटुनी, पृथ्वीवरी लोळती,
कोणी चावित ओष्ठ, शत्रु-हनना सर्वांपुढें धांवती ।
कोणी भूमिवरी पडून रडती, कोणी झुरे अंतरीं,
कोणी क्रोधभरें तदा निज करीं नग्ना असीतें धरी ६१ (६१)

---

१ दैनदिन राजकीय घडामोड लिहिणें. २ तरवारीच्या पुढें. ३ वाजि-सादी=घोडेस्वार. ४ फिरला. ५ मनात. ६ पृथ्वीवर (उगवलेल्या).

(वसंततिलका)

जैं त्यागिल्या स्वतनु सर्व मुरारि-योधीं,
तैशी दलेल-पृतना मरतां नियुद्धीं[१] ।
हस्तीं धरून करवाल रणीं दलेला
मारावया मुरारितें मग सिद्ध झाला ॥ ६२ ॥ (६२)

तेव्हां दलेल वदला वच मुररीतें,
'खड्गा त्यजीं, शरण ये मज जीवदातें।'
'श्रीशंभुयोग्य शरणागत व्हावयातें[२],'
ऐसें वदून मुररी सजला रणातें ॥ ६३ ॥ (६३)

झालें भिन्न मुरारिचें हृदय जैं युद्धीं दलेला-शरें,
गेला भेदुनि[३] भानु-मंडळ तदा स्वर्गीं मुरारी त्वरें।
तेथें मान तया सुराधिपति-ही देऊनियां तोषवी,
'होता तो निजराजभक्त' म्हणुनी[४] सत्कीर्ति झाली भुवीं[५] ६४ (६४)

(मंदाक्रांता)

'स्वर्गीं गेला मुररि तुमचा रक्षिता, शत्रुहंता,
आतां यावें शरण मजला व्यर्थ कां प्राण देता ?।'
ऐसें बोले मग जयमदें द्वारपालां दलेला,
हिंदूंनीं तैं प्रखर वचनीं म्लेंच्छ तो खिन्न केला ६५ (६५)

'हिंदूंमध्यें मुररि-सम वा फार आहेत योध,
युद्धा-माजी यवन-हनना ज्या न लागे क्षणार्ध।'

---

१ बाहुयुद्धांत, पण येथें लक्षणेनें याचा अर्थ शस्त्रयुद्धांत असाच करणें प्राप्त आहे. २ ज्यास शरण जावें असा एक शंकरच होय. ३ फोडून. पृ. ३० टीप ७ पहा. ४ अशी. ५ भू-चें सप्तमी ए. व. वृत्तभुखार्थ दीर्घान्त केलें आहे.

ऐकूनी तैं मुरारि-निधना म्लेंच्छ-सेनेश यातें
तो हिंदूंचा नृपति वदला सत्यशा भारतीतें[१] ॥६६॥ (६६)

## १०. जयसिंह-शिवाजी-समेट व शिवाजींचे दिल्लीस गमन

( वसंततिलका )

'माझेच दुर्ग अवघे, जरि तोंच झालों
स्वाधीन मी तुमचिया, शिबिरास आलों।
दुर्गार्थ त्या करितसा रण हें कशाला ?
जाईन मी, जरि न तो परते **दलेला**' ॥ ६७ ॥ (६७)

हें ऐकिलें वच यदा **जयसिंह** यानें,
तैं आणिलें परत त्या यवनास त्यानें।
संगें निजानुजहि[२] आणि दिला **दलेला**,
**दिल्लीस** हिंदुनृप तो मग पाठवीला ॥ ६८ ॥ (६८)

चिंतूनियां हृदि पदांबुज **अंबिकेचें**,
गेला तनूज-[३]सह भूप पुरीं रिपूचे।
देखूनियां पथि तयास विशीखनाथें[४],
सन्मानपूर्वक दिलें परिरंभणातें[५] ॥ ६९ ॥ (६९)

देवून तैं विविध भूषणवस्त्रभारा,
संतोषवी यवनभूप तया उदारा।

---

१ भारती = वाणी. २ आपला धाकटा भाऊ. पण हें इतिहासास धरून नाहीं. तेव्हां येथील मूळ पाठ निजानुग असा असेल काय? ३ मुलगा संभाजी यासह. ४ शिखा = शेंडी, वि = नाहीं. विशिख = मुसलमान, नाथ = राजा, म्ह. औरंगजेब. पण अशी भेट औरंगजेबानें दिल्याचें इतिहास सांगत नाहीं. ५ परिरंभण = आलिंगन.

राजोपभोगसह ठेवित दिव्य[1] गेहीं,
दुर्गापदा स्मरत तो नृप तेथ राही ॥ ७० ॥

## ११. दिल्ली येथें शिवाजीस अटक

कश्चित्[2] वदे यवन त्या यवनाधिपातें,
'हा भूप मानुष नव्हे, गमतें अम्हांतें।
हा यक्ष वाटत, निशाचर वा असावा,
संरक्षणारहित वास्तव हा नसावा' ॥ ७१ ॥ (७०)

ऐकून तद्वचन हें तुरगाधिरूढा
वीरांकडून दिधला शिबिरास वेढा।
म्लेंच्छाधिपें बहुत ठेवियले पदाती,
आज्ञेविना पवन[3] जे शिरकूं न देती ॥७२॥ (७१)

देखून पुत्रसह आपण रुद्ध ऐसें,
कष्टी **शिवाजि** नृप तो बहु जाहलासे।
चिंतापयोनिधिमधें मन मग्न झालें,
देवीपदांबुज तदा मनिं आठवीलें ॥ ७३ ॥ (७२)

## १२. शिवाजी कैदेंतून निसटतो

चिंता सदा दिवस भूप करीत होता,
स्वप्नीं वदे मग तया जगदेकमाता।
'तूं काळजी करुं नको, इथुनी तुला मी,
नेईन मुक्त करुनी तुझिया सु-धामीं[4]' ॥ ७४ ॥ (७३)

---

१ सुंदर अशा मंदिरांत. २ कोणीएक. ३ वारा. ४ सु = चांगलें, धामन् = घर.

दुर्गा-वचा परिसतां नृप तुष्ट झाला,
तो आणवी उषसि[1] वंशकरंडकाला[2] ।
आम्रादि उत्तम फळें भरुनी तयांत,
तीं म्लेंच्छ-भूप[3]-सचिवांप्रति पाठवीत ॥७५॥ (७४)

तो पाठवी नृपति नित्य करंडकांतें,
पाहाति रक्षक कधीं, न कधीं तयांतें ।
ही पाडिली सुचिर रीति नृपोत्तमानें,
झाला विमुक्त नृप तोहि अशा तऱ्हेनें ॥७६॥ (७५)

एके दिनीं **शिवनृपें** सुहृदा पुरुषा,
संस्थापुनीं स्वशयनीं दिधलें स्ववेषा ।
पुत्रासहीतहि बसून करंडकांत,[2]
केलें प्रयाण यवना[3] ठकवून सत्य ॥ ७७ ॥ (७६)

जाऊन दूर मग भूप निशावसानीं[4],
**वाराणशी**[5]-प्रति विलोकुनि तोष मानी ।
झाला तिथें चतुर तो यवनी फकीर,
तें भेटले यवनचारहि[6] त्यास फार ॥ ७८ ॥ (७७)

हें वृत्त जैं समजलें यवनेश याला,
स्वप्राण जातिल असें गमलें तयाला ।
टेंवितसे वहुत वीर निजावना[7] तो,
बोले सदाहि '**शिवजी, शिवजी !**' असें तो ॥७९॥ (७८)

तें दोन लक्ष विजयी तुरगी सु-योध,
यत्नें वहुत करिती **शिवराय**-शोध ।

---

१ पहाटे २ वंश = बांबू. करंडक = पेटारा. ३ वजीर इत्यादि यवन अधिकाऱ्यास. ४ रात्रीच्या शेवटी, पहाटे. ५ वाराणसी = काशी (वारा आणि असी या दोन नद्यांच्या संगमावर वसलेली). ६ चार = हेर. ७ अवन = रक्षण.

ज्यांनीं तया **शिवनृपास** विलोकिलें ते[१],
'आहे फकीर बरवा' गमलें तयांतें ॥८०॥ (७९)

**काशी**मध्यें दिन कितीक नृपाळ राहे,
**गंगा**ह्य[१] देवि तटिनी[२] प्रमुदेंच[३] पाहे ।
पूजून वस्त्रमणिभूषणकंकणांनीं,
लागे करूं स्तुति तिची पटु[४] भाषणांनीं ॥८१॥ (८०)

## १३. गंगाष्टक (शार्दूलविक्रीडित)

'श्रीविष्णुप्रभवे, गिरीश तुजला प्रेमें धरी मस्तकीं,
गंगे श्रीमति, पापराशि नर हा, मातें धरी हस्तकीं ।
हे पापघ्नि शिवे, तुझ्यावर खरा विश्वास माझा असे,
केलें यास्तव[५] घोर पाप बहु मीं, कोणी न केलें तसें ॥८२॥(८१)

येई मृत्यु जया नरा तव तटीं, देशी तया ईशता[६],
स्वर्लोकीं बसण्यास योग्य करिशी नाशून पापा शता ।
तूंतें आणियलें **भगीरथ**नृपें यत्नें इथें जान्हवी,
तत्पूर्वी नव्हतीं नृ-पाप-शमना स्वल्पौषधी[७] या भुवीं ८३ (८२)

ऐशी उत्तम जी **भगीरथ**कृती[८] लोकत्रयीं विश्रुत,
तीचा हा ध्वज देवलोकवरुनी आला इथें विस्तृत ।
चित्तीं सत्य विराटरूप[९] हरिची वक्षस्थ[१०] माला गमे,
किंवा शेष नभीहुनी[११] उतरला पृथ्वीवरी संभ्रमें ॥ ८४ ॥ (८३)

---

१ हें पद येथें व्यर्थ पडलें आहे. २ दिव्य नदी गंगा. ३ प्रमुद् = आनंद. ४ पटु = चतुर, विद्वत्तापूर्ण. ५ यामुळें. ६ ईश्वररूपता शंकरपणा. ७ (तुजसारखें) छोटें सोपें औषध, (वनस्पति). ८ भगीरथाचें कार्य, कर्तबगारी. ९ विश्वाचा आकार हेंच रूप ज्याचें असा (हरि). १० छातीवरील. ११ आकाशांतून (?). शेष आकाशांत राहिला असणें कसें संभवतें ?

जे होतात सदा स्वकर्मरत, जे न्यायें जगीं वर्तती,
जे यज्ञादि सुकर्म सांग करुनी पुण्यांश संपादिती ।
ते जातात सुरालयीं परि न ये त्वत्साम्य कोणा दुजा[1],
होती देवचि पापराशि नरही स्पर्शें जलाच्या तुझ्या ॥८५॥ (८४)

जेव्हां तूं नव्हतीस या क्षितितलीं तेव्हां यमाचे घरीं,
पाप्यांना नव्हतें[2] रितें स्थल असें, पापी बहू भूवरी ।
होते; सांप्रत ते तुझ्या जललवें निष्पापता[3] पावले[3],
त्यांनीं तत्सुकृतें[4] स्वपूर्व-जननां[5] दुःखांतुनी तारिलें ॥८६॥ (८५)

( वसंततिलका )

हे देवि, देव नमिती तव पादपद्म,
होशी विधीस सुभगे, सुखहेतु[6] सद्म ।
देहास यास्तव जलीं करि लीन, माते,
जेणें जगीं सुतर[7] हा भव होय मातें ॥ ८७ ॥ (८६)

( शार्दूलविक्रीडित )

गंगे, यज्ञ यदा करी सगर, तैं अश्वाचिया रक्षणा,
प्रेषी साठ सहस्र पुत्र अपुले तो भूवरी शाहणा ।
तेव्हां ते मुनि[8]-दृष्टिनें सकलही नाशाप्रती पावतां,
तूं आलीस तयां स्वयें उठविण्या भूमीवरी त्वरवतां ॥ ८८ ॥ (८७)

---

१ यज्ञकर्माचें फल देणारा देव किंवा अन्य कोणी याला. २ यमलोकांत पाप्यांची इतकी गर्दी होती की नवीन मृत प्राण्याला तेथें स्थान मिळणें कठिण होतें. ३ पापांतून मुक्त झाले. ४. त्यांच्या (आपल्या) पुण्यानें, ५ आपल्या पूर्वी ज्यांचा जन्म झाला ते; अर्थात् पूर्वज, त्यांना. ६ सुखास कारण असे, अर्थात् सुखावह. सद्मन् = घर. ७ तरून जाण्यास सोपा. ८ मुनि कपिल, याने पाहिले असता.

भास्वद्वंशज[1] त्या **भगीरथ**नृपें येथें तुला आणिलें,
किंवा वामनपाद[2] लागुनि नभा सच्छिद्र जें जाहलें।
त्यामार्गें पृथिवीवरी गमन हें झालें तुझें, जान्हवी,
भासे सत्य न तें नृ-पाप-शमना आलीस तूं या भुवीं ८९ (८७)

(मंदाक्रांता)

मुक्तीसाठीं करिति नर जे यत्न जन्मानुजन्मीं,
त्या सर्वांना फल न, विरळा[3] जातसे मुक्तिधामीं।
त्वत्तीरीं जे त्यजिति तनुतें पावती विष्णुता[4] ते,
दीजे त्यांना अनुपम असा मानही जिष्णु-तातें[5] ॥९०॥ (८८)

## १४. शिवाजीचें राजगडीं आगमन (मालिनी)

स्तुति करुनि अशी[6] तो पातला स्वीय दुर्गा,
नमि निज जननीतें, ज्या सदा तुष्ट **दुर्गा**।
अमित तयिं तयाच्या मानसीं तोष झाला,
सुरतरु-सम[7] देई दक्षिणा तो द्विजाला ॥९१॥ (९०)

(वसंततिलका)

संशोधिलें **शिवजि**तें यवनीचरांनीं,
नाहीं तयां उमगला[8] **शिवराय** मानी[9]।

---

१ भास्वत् म्हणजे सूर्य, त्याच्या कुलांत जन्मलेला. २ वामनावतारीं वामनानें दुसरें पाऊल टाकतांना उचललेलें पाऊल. ३ क्वचित्. ४ विष्णूपण, विष्णुता पावती = विष्णूशीं सायुज्य पावतात, विष्णूत मिळून जातात. ५ जिष्णु = अर्जुन, त्याचा तात म्हणजे बाप, अर्थात् इन्द्र. ६ वर दिलेल्या ८२–९० पद्यांत वर्णिलेली. ७ (सुर) देवांचा (तरु) वृक्ष म्हणजे कल्पवृक्ष. ८ ओळखू आला. ९ अभिमानी. येथें हें पद योग्य दिसत नाहीं. चतुर एतदर्थक पद येथें इष्ट होतें.

जाऊन ते कळविता यवनाधिपा हें,
चिंता-पयो-निधिमधें[१] यवनेश पोहे ॥ ९२ ॥ (८९)

तो शूर-संघ-समवेत तदा **शिवाजी**
नांदे **प्रताप**-शिखरीं जित[२]-शत्रु गाजी ।
रक्षी निजा जनपदा रघुराजसा[३] तो,
द्वापरसा सकळिका[४] कलि[५] भासला तो ॥ ९३ ॥ (९१)

## १५. शिवराज्याभिषेक (स्रग्धरा)

**सातारा** राजधानी करुनि नृपति तैं राहिला स्वस्थ तेथें,
पुत्रातें तातसा, तो निशिदिनिं हि करी स्वप्रजापालनातें । (९२)
पंचाशें शाण्णवाच्या रवि-मृगभ-दिनीं[६] राजसिंहासनीं तो ।
**गागा**ख्यें भट्टवर्यें सविधि बसविला मान ज्या लोक देतो ॥९४॥ (९३)

(दिंडी)

नाम **संभाजी** ज्येष्ठ आत्मजाचें,
तसें **राजाराम** हें कनिष्ठाचें ।
देश दिधला ज्येष्ठास उत्तरेचा,
**वारणे**च्या सानास[७] दक्षिणेचा ॥९५॥ (९४,९५)

(आर्या)

विद्वन्मान्या विप्रा वाजसनेयास[८] यौवराज्य दिलें,
स्थापून अष्ट सचिवां राज्यावन-दुःख सर्व नाशियलें[९] ९६(९६,९७)

---

१ चिंतारूपी सागरांत. २ जिंकले आहेत शत्रू ज्यानें तो. ३ रघूच्या वंशजांतील श्रेष्ठ जो राम त्याप्रमाणें. ४ सकल + क यापासून शुद्ध रूप सकलक असें व्हावें, या शब्दांतील इ-कार संस्कृताचे दृष्टीनें समर्थनीय नाहीं. ५ कलियुगांत द्वापरयुगांतल्याप्रमाणें धर्माचरण होऊं लागलें असा अभिप्राय. ६ रविवारीं, मृगनक्षत्र असतां. ७ सान = धाकटा (राजाराम). ८ वाजसनेयी नांवाच्या ब्राम्हणास युवराज नेमिलें. परंतु हें अगदींच अनैतिहासिक आहे. ९ अष्ट सचिवांस राज्याचीं कामें तोडून दिल्यानें स्वतःस विसांवा मिळविला.

भूपें **नागपुराधिप**[१] अंकित केला निज प्रतापानें,
**वंग–विदर्भा**दि[२] तसे जिंकियले देश सर्वही त्यानें ९७ (९८)

### १६. शिवाजी महाराजांचा मृत्यु ( दिंडी )

सहा वर्षें भोगून राज्यपीठा,
नृपें पुण्याचा सांठविला सांठा ।
चैत्र मासींच्या शुद्ध पौर्णिमेस*
दिवीं गेला तो भूभुजावतंस[३] ॥९८॥ (९९)

### १७. श्रीशिवाजीविषयीं प्रार्थना ( स्रग्धरा )

हा हा ! श्रीहिंदुभूपा, तव जनि[४]-विभवें शोभते आर्य–माता,
नाहीं अद्यापि झाला वसुमति[५]-जठरीं त्वत्समा[६] सौख्यदाता ।
स्वर्गस्था तूजला ही मम विनति असे ' ईश तूं आळवावा ',
आतां ही त्वत्कृपेनें तनय तुज–असा आर्य–मातेस व्हावा ॥९९॥

—५—

---

१ नागपुरकर भोसले. २ बंगाल, वऱ्हाड इत्यादि. ३ भू = पृथ्वी. भुज् = रक्षणें. भूभुज् = राजा. अवतंस = भूषण. नृपश्रेष्ठ असा अर्थ. संस्कृतानुसार येथें भूभुगवतंस असें रूप शुद्ध होईल. ४ जनि = जन्म. विभव = ऐश्वर्य. एकत्र अर्थ धन्य, स्तुत्य असा जन्मानें. ५ वसुमती = पृथ्वी. जठर = पोट. येथें वसुमतीं-तील अन्त्य स्वर वृत्तासाठीं ऱ्हस्व केला आहे. ६ येथें 'त्वत्सम' असें रूप पाहिजे; कारण याचें विशेष्य प्रथमान्त आहे. हें पद्य मूलाधिक म्ह. भावे कविकृत असून ह्यांत कवीचें थोर ईप्सित व्यक्त झालें आहे. स्वराज्याशीं समकालीन व त्याच्या उत्तरकालीन कवींमध्यें हा विशेष लक्षणीय आहे.
*श. १६०२ चैत्र शु. १५ (इ. १६८० एप्रिल ४) शनवारीं दोनप्रहरीं.

# चमत्कार ६

## १. शिवाजीपुत्र छ० संभाजी (द्रुतविलंबित)

त्रिदिवि जाय यदा **शिवजी** हिरा,
तनय पाळितसे मग उर्वरा[१]।
मदनशी तनु ज्यास, गुणी[२] नयें[३]
सतत हर्षद होय जना स्वयें ॥१॥ (१)

नृपति **शंभु** करी जनरक्षण,
असुख-हेतु[४] न उद्भवती क्षण।
जलदही समयीं करि वृष्टितें
सुफलदा पृथिवी सुख वर्षते ॥२॥ (२)

द्विजकुलां सकलां नृप रक्षित[५],
बहु धनें विदुषांप्रति अर्पित।
रविसुतासम[६] दान करीतसे,
जनमनास सदा सुखवीतसे ॥३॥(३)

नृपति **शंभु** करी अचला[७]ऽवना,
जन कुणीहि तदा न धनाविना।
लघुपणीं[८] न मरे जनही कुणी,
नच तशा विधवाहि नितंबिनी[९] ॥४॥ (४)

---

१ सुपीक पृथ्वी. २ गुणी = गुणवान्. ३ नीतीनें (हर्षद होय). ४ दुःख-कारक. ५ रक्षित असे. ६ रविसुत = कर्ण. ७ अचला = पृथ्वी + अवन = रक्षण. ८ बालपणीं. ९ स्त्रिया.

असुसमा[१] ममता नृपतीवरी,
करिति चाकर, भूपहि त्यापरी।
करि दया सकलांवर त्या मिसें[२]
विसर तद्गुरुचा[३] पडला असे ॥५॥ (५)

सचिव तत्कृति पाहुनि तोषले,
बुध गुणज्ञपणासहि[४] लोभले।
मनु-नयें[५] करि राज्य म्हणूनिया,
सुरहि तोषति पाहुनिया नया[६] ॥६॥ (६)

व्रतनिबंधन[७] आणि विवाहही,
करितसे गुरुसा,[८] मिळवी मही।
गुणवती सुदती* युवती सती,
नृप वरी जणु ती मदनें[९] रती ॥७॥ (७)

उभय बाहुहि दीर्घ विराजती,
नयन पद्मदलासम शोभती।
[१०]कनकगौर, युवा क्षितिपालक,
विलसतीहि शिरीं कुटिलालक[११] ॥८॥ (८)

तरुण सुंदर तो नृप पाहतां,
नववधू भुलती पतिदेवता[१२]।
करित पूर्वजसाच[८] रिपुक्षय,
हरि-हरार्चन साधित अक्षय ॥९॥ (९)

---

१ प्राणासारखी. २ मिसें = कारणानें. ३ त्याचा बाप शिवाजी याचा. ४ गुणग्रहणसामर्थ्यास, विद्येस उत्तेजन. ५ मनुस्मृतींतील नियमांस अनुसरून. ६ राज्य करण्याच्या प्रकारास. ७ उपनयन, मुंज. ८ वडील शिवाजीप्रमाणें. ९ मदनाकडून (वरिली गेली). १० तांबूस गोरेपण, तेजस्वी. ११ कुरळे केस. १२ पतिव्रता, भुलती-मधील कल्पना पतिदेवता या पदास विरोधी आहे. येथें रूपसुंदरता विवक्षित आहे. *सुंदर (दंतपंक्ति असलेली).

## २. औरंगजेब-संभाजी युद्ध (कामदा)

शूरसंग्रहीं पातल्या रणीं,
त्यां स्वयें वधी जो नृपाग्रणी* ।
दिल्लिपाल† तो त्याचिया* वधा,
योजना करी मानसीं सदा १० (१०)

(स्रग्धरा)

शक्रप्रस्थाधिनाथें† स्वमनिं समजुनी शक्तसा **शंभुराजा**,
केली वीरांस आज्ञा " शिवनृपतिसुता शीघ्र जिंकावया जा ।
आणा बांधून त्यातें मम[१] निकट[१] तुम्हीं, " ऐकुनी हें तयांनीं,
केलें तैं दक्षिणशीं[२] गमन सकळिकीं[३] स्वीयनाथा नमूनी ११ (११)

(शालिनी)

त्या वीरांनीं संगरीं युद्ध केलें,
**शंभू** भूपें त्यां दिवीं पाठवीलें ।
भ्याले[४] जे ते[४] शीघ्र दिल्लीस गेले,
म्लेंच्छाधीशें वृत्त तें ऐकियेलें १२ (१२)

## ३. पराभूत औरंगजेब

' स्वर्गी गेले ' ऐकुनी तोष मानी[५],
कर्तव्यातें त्यागिलें ना म्हणूनी ।
' आले ' ऐसें ऐकतां दुःख झालें,
कीं दुष्टांनीं कीर्तिनें दूषिलें ॥१३॥ (१३)

---

* नृपश्रेष्ठ संभाजी याच्या. १ माझ्याजवळ. २ दक्षिण दिशेकडे. ३ सर्वांनी. ४ भ्यालेले. ५ मानिता झाला. † दिल्लीपति = औरंगजेब.

( वसंततिलका )

आज्ञा करी यवन भूपति शैव[१] लोकां,
आहे तुम्हांस हरभक्ति तरीहि ऐका।
केव्हांहि शंभु,[२] शिव हीं[२] वदणें न नांवें,
शूली, महेश, गिरिजापति, हें वदावें ॥१४॥ (१४)
हीं मद्‌हृदीं[३] शरसमा[४] लसतात नांवें,
कोणींहि हीं म्हणुनियां नच घेत जावें।
मच्छत्रुचा करिल जो मतिभेद[५] त्यातें,
मानीन मी प्रिय सखा, सुख तेंच मातें ॥१५॥ (१५)
आणील जो त्वरित शंभु नृपास येथें,
अर्पीन अश्व, गज, हेम, रथादि त्यातें।
देईन राज्य विभवासह; फार काय,
होईन ही वश[६] तयाप्रति मी सकाय[७] ॥१६॥ (१६)
चिंताज्वरें शिथिलता वरिली सुगात्रीं[८],
भीतीमुळें निज न ये नयनास रात्रीं।
खातां-पितांहि, वदतां वधुशीं[९] सकामा[१०],
त्या म्लेंच्छषा दिसतसे नृप शंभुनामा ॥१७॥ (१७)
तोया विना कमल, कीं पतिवाचुनीया,
योषा[११] जशी विगतभा[१२], जरठाहि[१३] काया।

---

१ शिवाचे भक्त. २ कारण, या शंकरा च्या नांवानें बादशाहास क्रमानें संभाजी व शिवाजी यांची आठवण होऊन धडकी भरत असे. ३ माझ्या हृदयांत. ४ शल्यासारखीं. ५ बुद्धिभ्रंश. २ आधीन, आज्ञाधारक. ७ देहासह. ८ (पूर्वींच्या) दृढ असलेल्या अशा (कसलेल्या) अवयवांनीं. ९, १० प्रेमानें आलिंगावयास आलेल्या स्त्रीला. ११ स्त्री. १२ निस्तेज. १३ जरठ = म्हातारी.

किंवा दिनांतसमयीं रवि होय जैसा,
द्रव्याविना नर जसा, यवनेश तैसा ॥१८॥ ( १८ )

चिंता चिता[१] उभयता भगिनी परंतू,
ज्येष्ठाच दुष्ट गमते नच यांत किंतू ।
सप्राण[२] भस्म करिते तनुचें वरिष्ठा,
जाळीतसे मृत शरीरचि ती कनिष्ठा ॥१९॥ (१९)

( भुजंगप्रयात )

'नयानें करी शंभु लोकावनाला[३],
म्हणूनी रणीं कीर्ति लाभे तयाला ।
कसा वश्य[४] होईल तो हो अम्हांला'
अशा चिंतनें म्लेंच्छ तो रोड झाला ॥२०॥ (२०)

**४. कलुषा कबजी** (शालिनी)

देवीचा जो गौड-देशीय भक्त,
**कब्जी**[५]—नामा विप्र मांत्रीक धूर्त[६] ।
**संभाजीचा** जो महाघात[७]-कर्ता,
द्रव्याशेनें बोलला म्लेंच्छनाथा ॥२१॥ (२१)

'**संभाजीनें** आणितों शीघ्र आतां,
मंत्रानें मी, कासया व्यर्थ चिंता ? ।
माझी वाचा नानृता[८], होय साची,
पीयूषीं[९] कां व्यर्थ चिंता विषाची'? ॥२२॥ (२२)

---

१ प्रेतदहनार्थ रचलेली लांकडें. २ प्राणासह. ३ जनांचें रक्षण. ४ ताब्यांत आलेला असा. ५ हें विशेषनाम आहे. ६ कावेबाज. ७ पूर्ण नाश करणारा. ८ अनृता न = खोटी नाही. ९ अमृताचे ठिकाणी.

(वसंततिलका)

‘ कांहींच दुर्घट नसे तुज विप्रवर्या,
जा शंभुच्या निकट सत्वर साधि कार्या।
घेऊन त्यास झणिं ये, मग अल्पकाळें,
देईन इच्छित’ असें यवनेश बोले ॥२३॥ (२३)

## ५. कलुषाचें संभाजीकडे गमन व वशीकरण (दिंडी)

पथीं देखोनी तोयपूर्ण कुंभ,
विप्र मानी चित्तांत महालाभ ।
वदे ‘झाला हा शकुन सुदैवानें,
**शंभु**भूपा आणीन निश्चयानें’॥२४॥ (२४)

विप्र आला तो **शंभु**नृपापाशीं,
बहुत नजराणे देत तदा त्याशी ।
मधुर बोलोनी सुखें तेथ राहे,
मंत्रसामर्थ्यें नृपा भुलवुं पाहे ॥२५॥ (२५)

तया विप्रानें कार्य साधियेलें,
वीस दिवसांनीं वश्य नृपा केलें ।
औषधींतें जाणता, मंत्रवंत,
जसें मर्पा, वागवी[1] निजाज्ञेंत ॥२६॥ (२६)

**शंभु**-भूपति तो भ्रष्टचित्त झाला,
मान देई सर्वदा **कब्जि**-बोला ।
चतुर पूर्वींचे सचिव कमी केले,
नयांतरचें प्रेमही नष्ट झालें ॥२७॥ (२७)

---

१ वागविता झाला.

योग्य रीतीनें अनुग[1] सूचवीती,
कडु लागे उवरितास शर्करा ती।
नये[2] भूपें ऐकूंच तद्वचातें,[2]
दैव फिरतां विपरीत असें होतें ॥२८॥ (२८)

फार पूर्वीचे महाशूर योध,
सदा असती जे शत्रुवधा सिद्ध।
टेविलें जें देऊनि वेतनातें[3]
नृपें त्यांतें प्रेपिलें तद्गृहातें ॥२९॥ (२९)

गृहीं प्रतिनिधिमुख[4] करिति विष्णु-पूजा,
'त्वरें व्हावा म्लेंच्छ-हा[5] शंभुराजा।
निजा कीर्तीची शुद्धि[6] यास राहो'!
अशी करिती विष्णूस प्रार्थना हो ॥३०॥ (३०)

## ६. औरंगजेबाचें दक्षिणेंत आगमन (वसंततिलका)

'कृष्णातटीं पसरला बहु जो निजांगें[7],
झाला असें शिथिल तो तरु नीरवेगें।
खालीं पडेल लघुशा पवनेंहि आतां'
विप्रें असें सुचविलें शिशिखाधिनाथा[8] ॥३१॥ ३१)

संकेत[9] हा सुखदसा गमतां मनाला,
म्लेंच्छेश दक्षिण दिशेप्रति शीघ्र आला।

---

१ नोकर. २ राजानें त्यांचा उपदेश ऐकूंच नये, मुळींच ऐकला नाहीं. ३ पगार. ४ प्रधान इत्यादि. ५ यवनाचा घात करणारा. ६ आठवण, आदर, आवड. ७ आपल्या शाखांनीं. ८ शिखानष्ट (यवन) यांच्या राजाला. ९ लाक्षणिक भाषेत पाठविलेला निरोप.

त्यानें सर्व सकल वैभव आणियेलें,
मार्गी तया शकुनही बरवेच झाले ॥३२॥ (३२)

(द्रुतविलंबित)

सलिलयुक्त घटास सुवासिनी,
निज कटीवर पातलि घेउनी।
शकुन होति तया बरवे असे,
विविध देशप गाति यशा तसे ॥३३॥ (३३)
यवन-भूपति-सन्निध जाउनी,
नृपति भेटति त्यास उपायनी[1] ।
विविध देश, नदी सुरनिम्नगा[2],
क्रमुनि ये मग **भीमरथीस**[3] गा ॥३४॥ (३४)

## ७. **कब्जीची संभाजीस प्रेरणा** (वसंततिलका)

'आला असे यवनभूप **तुलापुरास**[4],
जाऊं चला त्वरित आपण भेटण्यास।
आहे गुणाढ्य[5] बरवा, वदण्यास योग्य',
**कब्जी** असें कथितसे, नृप मानि भाग्य ॥३५॥ (३५)
ही म्लेंच्छ-सद्‌गुण-कथा नृपतीस मानें,
आरंभिली यवन-जा-स्तुति[6] त्या द्विजानें।
आश्चर्य हें न गमतें कविच्या मनास,
जे दुष्ट ते फसवितात असें भल्यास ॥३६॥ (३६)
'त्यां पैकिली कलियुगीं न अशी सुरूपा,
या "देखिली न" कथणें मग काय? भूपा।

१ उपायनिन् = उपायन म्ह. नजराणा घेऊन. २ गंगा. ३ भीमा-नदी.
४ तुळापूर. ५ गुणवान्. ६ बादशहाच्या मुलीच्या सौंदर्याचें वर्णन.

जो शंकरें स्वनयनें पति दग्ध केला,
शोधीतसे रतिच[1] ही गमतें तयाला[2] ॥३७॥ (३७)

आहेस तूं मदनसा गुण-रूप-यांहीं[3],
वा शोभसी पति तिचा, गमतें मलाही ।
आहे तुझें अतुल वैभवही नृपाला,
त्वद्दर्शनें क्वचित भूल पडेल ताला ॥३८॥ (३८)

## ८. औरंगजेबकन्यारूपवर्णन (शार्दूलविक्रीडित)

जीचा केश-कलाप[4] भृंग[5]-निचया आणीतसे न्यूनता,
आरण्यीं[6] लपल्या मृगी गमतसे नेत्रांकडे पाहतां[7] ।
जीचे दंत हिऱ्यापरी, अधरही बिंबप्रभा[8] हो जशी,
भासे वक्त्र जणूं नभीं उगवला तो पूर्णिमेचा शशी ॥३९॥ (३९)

वाणी आइकितां वनांत शिरले कोकील लाजोनिया,
भासे हेमघटा[9] स्तनद्वय तिचें जातेंच जिंकावया ।
आंगाची रुचिरा[10] प्रभा उमलली चाफेकळी[11] आंगणीं,
भूपा सत्य अशी जगांत दुसरी नाहीं मनोहारिणी ४० (३९)

सोडी भ्रूधनुषीं[12] सुचंचल असा दृग्बाण ती योजुनी,
तेव्हां मूर्छित होउनी नर पडे भूमीवरी तत्क्षणीं ।
एकांतीं रमसी न तूं तिजसवें; नाहीं बरें वा तरी[13],
दृग्बाणें वहुतां युवा नरवरां मारील ही सुंदरी ॥४१॥ (४०)

---

१ रति = मदनाची स्त्री. २ मदनाला. ३ गुण व रूप यांनीं. ४ डोक्यावरील वेणी. ५ भुंग्यांचा थवा. ६ अरण्य-चा अ वृत्तासाठीं दीर्घ केला आहे. ७ नेत्राचा विचार करितां. ८ (पक्व) तोंडल्याची कांति. ९ सोन्याची घागर. १० सुंदर. ११ सोनचाफ्याची कळी. १२ कमानदार भुवयांनीं. १३ तूं तिचा पति न झाल्यास.

( भुजंगप्रयात )

वयानें गुणानें सुरूपेंहि पाहे,
तुझ्या योग्य ती नोवरी वाटताहे ।
परी जाति-भेदा नसे या उपाय,
तिच्या दर्शनें तुटत्वी अंतराय[1] ॥४२॥ (४१)

## ९. संभाजी औरंगजेबाचे दरबारीं जातो

असे राजराजा पिता रे तियेचा,
तिच्या दर्शनाचा नसे लाभ काचा* ।
तियेच्या पित्याची अधीं भेट घ्यावी,
तयामागुनी पूर्ण इच्छा करावी ॥४३॥ (४२)
असे रीति कीं हस्त बांधूनि जावें,
तया सार्वभौमा नतांगीं[2] नमावें ।
तदाज्ञेस घेऊनिया या बसावें,
सभेमाजि हें [3]वर्म चित्तीं असावें'॥४४॥ (४३)
असें ऐकतां क्रोध आला नृपाशीं,
वदे 'काय माझें असें कार्य त्याशीं ? ।
कशाला हवी म्लेंच्छजा सुंदरी ती ?
कशी म्यां त्यजावी कुलाचार-रीती ? ॥४५॥ (४४)
गुरूतेंचि या शंकरातें नमावें,
पराच्या पुढें या, न मी लीन व्हावें ।
अशी पूर्वजीं चालवाली प्रतिज्ञा,
मलाही असे मान्य ती या, नयज्ञा[4]' ॥४६॥ (४५)

---

१ मन असा संस्कृतांत नमणारा अर्थ येथें करणें प्राप्त आहे. २ डोकें इत्यादि अवयव वांकवून. ३ मुख्याची गोष्ट, *क्षुद्र, थोडा, सहज. ४ नीति, रीति इत्यादि जाणणाऱ्या.

'तुझ्या ह्या व्रताचा न[१] हो[१] भंग ऐशी,
करीनों पद्दा युक्ति मी शाह स्वाशी।
चलावें तुवां त्यास भेटावयाला'
असें बोलला **कब्जि** तैं भूपतीला ॥४७॥ (४६)

(इंद्रवज्रा)

तैं **शंभू** बोले 'वचनें तुझ्या मी,
जाईन विप्रा यवनेश-धामीं'।
ऐकूनि हें वाक्य क्षणीं निघाला,
म्लेंच्छाधिपासन्निध विप्र गेला ॥४८॥ (४७)

(मंदाक्रांता)

'**शंभू** येतो, परि नत कदा तो न होई तुम्हांला',
**कब्जीनें** हें सकल कथिलें वृत्त त्या म्लेंच्छराला।
हें ऐकूनी यवन वदला युक्ति काढूं कशीशी,
आणा त्यानें लवकर तुम्ही मत्समीप प्रदेशीं ४९. (४८,४९)

(दिंडी)

मान देवोनी तदा म्लेंच्छ बोला,
म्लेंच्छ-कन्या-शिबिरास **कब्जि** गेला।
तिला सांगे 'तूं हिंदुभूप पाहें,
गुणें स्मरें जो मदनतुल्य आहे ॥५०॥ (५०)

(आर्या)

तेजस्वी आणि वली, त्यासम मी पुरुष देखिला न दुजा,
तो येथें येतां तूं, लज्जा त्यागूनि पाहण्या सखि [२]जा' ॥५१॥ (५१)

---

१ न होईल. २ गडे, सुरी.

(वैश्वदेवी)

तीतें ऐसें सांगुनीया निघाला,
**सातान्यातें काझि** तो शीघ्र गेला।
भूपाळाचें रूप आणूनि चित्तीं,
वेडी झाली मन्मथें[1] म्लेंच्छजा[2] ती ॥५२॥ (५२)

भेटीसाठीं रम्यसें गेह केलें,
म्लेंच्छाधीशें वैभवें शोभवीलें।
त्या गेहाचें ठेंगणें द्वार साजे,
जाऊं ना दे नम्र झाल्याविना जें ॥५३॥ (५३)

(इंद्रवज्रा)

**शंभू**हि **कब्जी**सह तेथ आला,
घेऊन अल्पाच निजा चमूला।
तेथें यदा द्वार लहान पाहे,
'आहे' वदे 'नम्र करावया हें ॥५४॥ (५४)

विप्राविना मी इतरां नमाया,
केलें नसे नम्र कधीं शिरा या।
जाऊं नये[3] मद्व्रत हें न वायां,
देवो अशी धी जगदेकमाया!' ॥५५॥ (५५)

ऐसें वदूनी पद आंत आधीं,
ठेवून गेला नृप तीक्ष्ण[4]-बुद्धी।

---

१ कामविकारानें. २ बादशहाची मुलगी. ३ 'येथें विवक्षा पाहतां, या चरणांत नये-बरोबर न योजावयास नको. यांतील दोन नकारांपैकीं एक गाळण्यासाठीं नये हें सानुस्वार तृतीयान्त पद घ्यावें व त्याचा अर्थ युक्तीनें असा करावा. ४ चलाख बुद्धीचा.

बाजूस अंतःपट[1] सारुनीया,
तै म्लेंच्छजा देखत हिंदुराया ॥५६॥ (५६)
जें सौख्य तैं होय परस्परातें,
तें ठाउकें त्या रति-वल्लभातें[2] ।
तैं एकटा **शंभु** भय त्यजूनी,
वैसे सभे म्लेंच्छसन्निधानीं ॥५७॥ (५७)
म्लेंच्छां न केली नति उद्धतें[3] ज्या,
त्यातें पुसे तो विशिखाधिराजा* ।
'येथें असे कोण तवासुपाता[4] ?'
तैं **शंभु** बोले 'मज मीच पाता' ॥५८॥ (५८)
एकाच पात्रीं अशना† कराया,
बोहे[5] यदा म्लेंच्छप* हिंदुराया ।
भ्याला न **शंभू** यवनप्रभूतें*,
योग्या[6] गिरा तैं[7] वदला तयातें ॥५९॥ (५९)

## १०. छ० संभाजीचा मृत्यु (शार्दूलविक्रीडित)

'देशी तूं तव कन्यका जरि मला, जेवीन येथें तरी'
ऐसें **शंभु** वदे तदां यवनपा* ये कोप अभ्यंतरीं ।
**शंभूतें** यवनेश तो मग निजा कारागृहीं[8] पाठवी,
तेव्हां **शंभु** नृपें तनू त्यजुनियां केलें प्रयाणा[9] दिवीं[9] ६० (६०)
त्याच्या शोकभरें तदा यवनजा झाली महा विव्हला,
म्लेंच्छाधीश वदे तिला 'सुतनुजे, कां दुःख झालें तुला ? ।

---

१ मधील पडदा. २ स्त्री तिचा पति मदन. ३ मानी. ४ तव = तुझा. असुपाता = प्राणरक्षक. येथील संधि मराठीच्या वळणास विरोधी आहे. ५ बोलाविता झाला. ६ उचित उत्तर. ७ तेव्हां. ८ तुरुंगांत. ९ स्वर्गास गमन; पक्षांतरी मरण. *औरंगजेब (म्लेंच्छ = भ्रष्ट मुसलमान ह्यांचा राजा). †भोजन.
६ शिव.

शत्रूच्या हननें वरी मन मुदा[१], त्यागून हे[२] कां अशी
तूं वेड्यापरि शोक हा करिशि गे? होई मुली स्वस्थशी' ॥६१॥
(६१–६३)

(वसंततिलका)

तैं म्लेंच्छजा नय[३] वदे विशिखाधिराजा,
'जो शंभु मद्धृदिं वसे पति तोच माझा।
आतां दुज्या पतिस मी न वरीं कदाही,
मज्जन्म दुःखदचि; संशय यांत नाहीं' ॥६२॥ (६४)

(तोटक)

तयिं शंभुसुता अणिलें यवनें,
दुहितेस दिला झणिं तो सुमनें[४]।
दुहिता–सुतसा मनिं मानुनिया,
करि रक्षण तो यवनेश तया[५] ॥६३॥ (६५)
अवबी जगती* सुनयें अवुनी[६],
निजकीर्तिस ठेवुनिया भुवनीं।
निज राज्य करून सहा वरुषें,
नृप शंभुहि जाय दिवीं हरुषें[७] ॥६४॥ (६६)

(पृथ्वी)

खभूमिरसभू–शकीं[८] नृपति शंभु गेला दिवीं,
विसर्जुनि तुळापुरीं निज तनू, जनीं[९] संपवी।
मनीं हरि-पदांबुजा स्मरुनि, मर्त्य लोका त्यजी,
परां वश न होति जे कुलज-हें असें सत्य जी ६५ (६७)

—६—

१ आनंद. २ हे (मुदा), हा संताप. ३ नीति. ४ प्रसन्न मनानें. ५ त्या साहूला. ६ अव = रक्षणें. ७ हर्षें, आनंदानें. ८. १६१० शक. ९ जन्म, आयुष्य.
*पृथ्वी, प्रजा.

# चमत्कार ७

## १. छत्रपती-शाहू-जन्म व बालपण (कामदा)

**शाहु** चंद्रमा **शंभु**[1]-सागरीं,
जन्मला तदा तोष अंतरीं।
जाहला तया पाहतां जनां,
वंद्य जो असे क्षत्रियां जनां ॥१॥ (१)

चार-शून्य-सा-एक वत्सरीं[2],
भूप जन्मला **शाहु** भूवरी।
त्या शका असे नाम दुंदुभी,[3]
वाजल्या दिवीं देव-दुंदुभी ॥२॥ (२)

सौख्य देतसे दर्शन प्रियां,
मिष्ट भाषणें तोषवी तयां।
न्यून तैं गमे कृष्ण[4]-खेळणें,
कां न मोहनीं सत्प्रजा-मनें ॥३॥ (३)

कल्पवृक्षसा नीर-सिंचनें[5],
**शाहू** वाढला तात-पोषणें।
माय-बाप हे वंदिती **हरा**,
प्रीति वाढली त्यां परस्परां ॥४॥ (४)

---

१ छत्रपति संभाजी. २ श. १६०४ वैशाख व. ७ (अंकानां वामतो गतिः) मे ४ गुरुवारी = इ. १६८२ ह्या वर्षी. ३ संवत्सराचें नांव. ४ कृष्णाच्याही बाललीला यांच्या खेळण्यापुढें फिक्या वाटल्या. ५ पाणी घालण्यानें.

## २. संभाजीचा मृत्यु व शाहूचा बंदिवास (शालिनी)

सत्प्रेमानें पांच[१] वर्षें पित्यानें,
शाहू-नामा पाळिला पुत्र त्यानें ।
जेव्हां झाला तात[२] तो स्वर्गवासी
शाहू नेला म्लेंछभूपें गृहासी ॥ ५ ॥ (५)

(इंद्रवज्रा)

त्या तात-हीना यवनेश पाळी,
त्याच्या असे हें लिहिलें कपाळीं ।
होता जरी म्लेंच्छप दुष्ट-कर्मा,
शाहूस त्यानें दिधलें सु-शर्मा[३] ॥ ६ ॥ (६)

आतां मुला या ममता न कोणी,
लावील हें म्लेंछ मनांत आणी ।
शाहूस पुत्रासम आदरानें,
रक्षूनि तद्दुःख दिगंतरा[४] ने[४] ॥ ७ ॥

(कामदा)

मिष्ट भाषणें शाहु तोषवी,
म्लेंछजेस तो प्रीति आणवी ।
युक्ति आपली त्या दिली कचें[५],
बुद्धि सौख्यदा संकटीं सुचे ॥ ८ ॥ (७)

---

१ इतिहासदृष्ट्या 'साडेसहा' पाहिजे. २ संभाजी मृ. श. १६१० फा. व. ३०, इ. १६८९ मार्च ११. ३ शर्मन् = कल्याण, सुख. ४ दिशेच्या टोंकाला नेणें = नष्ट करणें. ५ दैत्यगुरु शुक्राचार्यांपासून संजीवनी विद्या आणणारा बृहस्पतीचा पुत्र.

(शिखरिणी)

स्वपुत्रापेक्षांही यवननृप शाहूस ममता
करी, शाहूही तो निजवचसुखी[1] सर्व जनता।
पहाया देशांतें सह-कटक जैं म्लेंच्छप निघे,
सवें शाहूलाही बहु सुविभवें पुत्रसम घे ॥९॥ (८,९)

(वसंततिलका)

शाहूपुढें गज-तुरंगम-संघ चाले,
सद्वेत्र[2]-दंड-धर कौंतिकही[3] निघाले[4]।
होते अनेकविध वीरहि पश्चिमांगीं[5],
ह्या वैभवें नृपज चालत मध्यमार्गीं ॥१०॥ (१०)

कित्येक 'हाच[6] वदती यवनेश-तोक[6]',
'तत्कन्यकासुत' असें वदती कितीक।
होते विचारयुत जे सुजन प्रबुद्ध,
ते 'शंभुराज-सुत हा' वदती 'प्रसिद्ध' ११ (११)

## ३. औरंगजेबाचें मूर्तिविध्वंसन व पंढरीस गमन

म्लेंच्छाविरुद्ध जन जे असती तयांला,
दावूनि तेज समरीं बहु दंड[7] केला।
सन्मूर्ति[8]-भेद करणें निजधर्म मानी,
तो पंढरीस मग ये यवनेश मानी ॥१२॥ (१२)

---

१ आपल्या भाषणानें आनंदित. या संस्कृत समासांत वचस्-चें मराठी रूप वच हें योग्य नाहीं. २ सत् + वेत्रदंड + धर = चांगले वेताचे सोटे धारण करणारे, चोपदार. ३ कुंत = भाला, कौंतिक = भालेकरी. ४ पुढें चालत होते. ५ मागल्या बाजूस. ६ कोणी शाहूस शाहजादाच समजले. ७ शिक्षा, पारिपत्य. ८ सुरेख घडलेल्या देवांच्या मूर्ती फोडणें.

(उपजाति)

श्री[1]-पूजक श्रीफल[2] पुष्पमाला,
प्रसाद देवोनि नृपाग्रमाला।
"श्री**विष्णु** येथें वसतो कृपाला,
ही मूर्ति रक्षी" वदती नृपाला ॥१३॥ (१३)

(शालिनी)

मालेमध्यें देखतां कुंतलातें[3],
म्लेंच्छाधीशें प्रश्न केला द्विजातें।
"**श्रीरंगाच्या**[4] मस्तकीं केशराजी[5],
आहे कीं? हें सत्य सांगा मला जी" ॥१४॥ (१४)

(वसंततिलका)

हा वेळ दुखःद असें समजून भ्याले
श्री-विष्णु-पाद-कमळीं द्विज भृंग झाले।
'श्री[6]-मस्तकीं यवनपा, कच[7]-संघ-माला
आहे' असेंच कथिती यवनेश याला ॥१५॥ (१५)

म्लेंच्छेश त्यांस वदला 'झणिं देव पाहों,
तद्दर्शनीं उपजला मजलागि लाहो[8]'।
तो पूजकांसह निघे मग देवळातें,
श्रीमस्तकीं कच तदा दिसले तयातें ॥१६॥ (१६,१७,१८)

---

१ श्री = विठ्ठलदेव, त्याचे पूजक, देवाचे पुजारी, बडवे. २ नारळ. ३ कुंतल = केश. ४ लक्ष्मीचें आनंदाचें स्थान, विष्णु. ५ केशसमुदाय. ६ विठोबाच्या मस्तकावर. ७ केशांच्या बटांचा समुदाय. ८ उत्सुकता, उत्कंठा.

### ४. औरंगजेबाचा श्रीविठोबाविषयीं पूज्यभाव (मंदाक्रांता)

तेव्हां झाला हरिपदरजीं म्लेंच्छ भूपाळ लीन,
केलें त्यानें गरिब-गुरिबां रत्न-हेमादि[1] दान ।
'देवाचे कां कर कटिवरी ? मस्तकीं लिंग ठेलें ?
सांगा' ऐसें कुमति यवनें पूजकां प्रश्न केलें ॥१७॥ (१९–२१)

त्यांनीं जें जे कथन कथिलें स्वस्वबुद्धि[2]-प्रसारें,
तें पद्यांनीं सुनव[3] कवि मी वर्णितों सार्थ[4] सारें ।
होते ज्याच्या श्रवण-पठणें पूर्ण इच्छा नराची,
अंतीं देते मधु[5]-रिपु-वरें योग्यता किन्नराची ॥१८॥ (२२)

### ५. श्रीविठ्ठलाचे कटेवरी कर कां ? सप्तक (वसंततिलका)

"जो होय मत्पदरजीं नरसिंह[6] लीन,
होईल त्या भवनिधी जघन[7]-प्रमाण ।
हें वर्म[8] सर्व जगतास कळो" म्हणूनी,
झाला स्वयें सुरललाम[9] नितंब-पाणी[10] ॥१९॥ (२३)

देखूनि ही सुरनदीहुन रम्य भीमा,
आला त्वरें हरि पुढें त्यजुनि स्वधामा[11] ।
तैं[12] दाखवी, यवनपा, अनुगांस पाणी,
झाला असे हरि म्हणूनि नितंबपाणी ॥२०॥ (२४)

---

१ रत्नें; हेमन् = सोनें. २ आपापली कल्पना जशी चालली तसें. ३ नुकताच काव्य करूं लागलेला. ४ अर्थासह, फोड करून. ५ मधु नांवाचा दैत्य त्यास मारणारा विष्णु, त्याच्या कृपेनें. ६ शूर पुरुष; पण येथें विचारी पुरुष असा अर्थ योग्य. ७ कमरेएवढ्या खोलीचा. ८ रहस्य, गुप्त गोष्ट. ९ देवाचें भूषण, श्रीकृष्ण. १० कमरेवर दोन्ही बाजूस ज्यानें हात टेकिले आहेत असा. ११ आपलें स्वर्गातील स्थान, त्यास. १२ तेव्हां.

किंवा जरा[१]-सुत-भयें मथुरा त्यजून,
केलें [२]प्रवर्षणगिरींवरि हो प्रयाण।
तो पेटवी अरि, म्हणूनि उडे[३], श्रमूनी,
झाला असा सुरललाम नितंबपाणी ॥२१॥ (२५)

किंवा त्यजूनि भजकीं निज पुत्र-जाया,
आरंभिलें स्तवन हा प्रभु तोषवाया।
तैं फार वेळ परिसे भजकोक्तवाणी,
शेवीं[४] श्रमे म्हणुनि होय नितंबपाणी ॥२२॥ (२६)

कीं[५] खेळतां भ्रमण नामक बाललीले,
गोपाल[६] जे समवयस्क तदा मिळाले।
हा त्यांस कूर्परवशें[७] बहु दूर सारी,
झाला नितंबकर यास्तव दानवारी* ॥२३॥ (२७)

गंगातटीं विहरतां महिलासमाजीं[८],
झाला तिथें प्रियसखीसह गुप्त हा जी।
स्कंधीं[९] तिचेस चढण्यास्तव मार्ग सोपा
केला, नितंबकर यास्तव होय भूपा ॥२४॥ (२९)

भस्मासुर त्रिनयनास वधूं निघाला,
झाला वधू हरि तया फसवावयाला।
ठेवी कटींवर तदा कर नर्तनीं हा,
म्लेंच्छा, नितंबकर यास्तव विष्णु पाहा ॥२५॥ (२८)

---

१ जरासंध राजाच्या भयानें. २ प्रवर्षण = एका पर्वताचें नांव. ३ पेटलेल्या पर्वतावरुन उडी मारुन निसटला. ४ (भक्तांचें भजन ऐकत असतां) शेवटीं. ५ किंवा, भ्रमण नांवाचा एक मुलांचा खेळ खेळतांना. ६ गवळ्यांचीं मुलें. ७ कोंपराच्या सावनानें. ८ स्त्रियांच्या समुदायांत. ९ खांद्यावर सहज चढण्यासाठीं (प्रथम कोंपरावर पाय देतां यावा अशासाठीं). *राक्षसशत्रु = विष्णु.

कीं पुंडरीक करितां गुरुसेवनातें,
हा तोषला मग वदे 'वर माग' त्यातें ।
कांहींच तो जनक[1]-भक्त वदे न वाणी,
द्वारीं उभा श्रमवश स्वनितंबपाणी ॥२६॥ (३०)

## ६ श्रीहरिमस्तकीं हर कां ? अष्टक (मंदाक्रांता)

**राधा**[2] त्यागी परकुचभरें रक्त देखूनि वक्ष,
तेव्हां झाला विरहदहनें तप्त हा नीरजाक्ष[3] ।
नाना यत्नीं मदन न शमे, होतसे फार दाहा[4],
अतीं कृष्णें सुखद धरिला काम-हंता[5] शिरीं हा २७(३१)

जैं **कृष्णाला** अभिनव असें लागलें कामभूत,
तेव्हां यानें बहुत युवती भोगिल्या गोकुळांत ।
नोहे शांती तरिहि म्हणुनी फार दारा[6] करी हा,
अतीं[7] **कृष्णें** सुखद धरिला कामहंता शिरीं हा २८ (३२)

किंवा भेटों हरिस सुमुदें[8] पातला ईश येथें,
त्या माघारें अजनि[9] हरि हा पोंचवी ज्या सुपंथें ।
मार्गी होती स्वपुर-[10]तटिनी भरि-नीरप्रवाहा,
श्रीकृष्णानें त्वरित धरिला मस्तकीं तेधवा हा ॥२९॥ (३३)

---

१ जनक = बाप, पण येथें या पदानें आई व बाप या दोघांचें ग्रहण करणें योग्य आहे. एतदर्थ जनक हा शब्द जननी–जनक–चा एकशेष मानावा. २ कृष्णाची छाती अन्य स्त्रीच्या उटी लावलेल्या भरदार कुचानें रंगलेली पाहून राधेनें त्यास टाकिलें. ३ नीरज = कमल, त्यासारख्या डोळ्यांनीं युक्त, कमलाक्ष. ४ हें पद प्रथमान्त इष्ट असल्यानें याचें आकारान्त रूप चूक आहे. ५ मदनाचा शत्रु शंकर. ६ स्त्रिया. ७ शेवटीं, स्त्रीसेवनानें काम शांत होत नाहींसे पाहून. ८ मोठा आनंद. ९ जनि = जन्म, अजनि = जन्मरहित. १० आपल्या नगरीची नदी = चंद्रभागा.

मृल्लिंगाची[१] सविधि[२] करुनी प्रेमपूजा[३] प्रदोषीं[४],
श्रीरंगानें शिव-द[५] नमिला शंभु जो शीघ्रतोषी[६] ।
तें टाकाया रुचिर गमला[७] पूत भीमाप्रवाहा,
**श्रीकृष्णानें** अपणचि तदा मस्तकीं घेतला हा ॥३०॥ (३४)
किंवा 'नाहीं हरि-हर असा भेद', हे वेद[८]-वाणी,
गर्जे लोकीं स्वमनिं धरणें तत्त्व हें वैष्णवांनीं ।
तें त्यागूनी, सतत करिती जे सदा शैव[९]-निंदे,
त्यां बोधाया स्वशिरिं धरिलें शंकरातें मुकुंदें ॥३१॥ (३५)
भावें होतां मम पदरजीं लीन पूरूप, त्याला
प्रेमानें मी अव निवटुनी मुक्ति[१०] देतों सुखाला[१०] ।
हें सांगाया हरि निजशिरीं घेउनी कामहंता,
**श्रीशंभूची** शपथ करि हा भक्तकैवल्यदाता[११] ॥३२॥ (३६)
किंवा आले बहु भजक जैं विष्णुच्या दर्शनाला,
दाटी झाली स्थल नच मिळे देउळीं त्या जनांला ।
तेव्हां येतां भजक-वर हा शंभु दामोदरानें,
प्रेमें त्यातें स्वशिरिं दिधलें स्थान बव्हादरानें ॥३३॥ (३७)
कोठें-कोठें जन निजमतें रीति हे आचरीती,
कीं लग्नांतीं स्वशिरिं नवरा घेउनी नाचताती ।
जैं **शंभूनें** सुमति गिरिजा परिणिली[१२] गौरवानें,
तैं पौत्राला[१३] स्वशिरिं धरुनी नृत्य केलें अजानें[१४] ॥३४॥३८

---

१ पार्थिव लिंगाची. २ विधियुक्त, यथाशास्त्र, ३ प्रेमपूर्वक पूजा. ४ रात्रींच्या आरंभीं. ५ कल्याण देणारा. ६ आशुतोष. लवकर प्रसन्न होणारा, शंकर. ७ गेला. ८ वेदाचें वाक्य, अभिप्राय. ९ शैव = शिवाची. १० सुखासाठीं मोक्ष देतो. ११ भक्तास मोक्ष देणारा. १२ परि-णी = लग्न करणें. १३ विष्णूच्या नाभिकमलापासून जन्मल्या असल्यानें ब्रह्मदेव हा त्याचा पुत्र व ब्रह्मदेवानें सर्वच सृष्टि केली असल्यानें तीतील शिव हा ब्रह्मदेवाचा पुत्र म्हणजे विष्णूचा पौत्र = नातू. १४ विष्णूनें.

### ७. औरंगजेबास नरसिंहमूर्तिभंगाबद्दल भय (साकी)

तोरा पाबुनि यवन नृपति **नरसिंहपुरातें** गेला,
**भीमा** आणि **नीरा** ह्यांचा संगम जेथें झाला ॥३५॥ (३९)
फोडूं इच्छी **नरहरिमूर्ती,** देवें अघटित केलें,
वृश्चिकसर्पां आज्ञा दिधली, सर्व यवन तैं भ्याले ॥३६॥(४०,४१)
जेथें असतीं शंकरलिंगें, मूर्ति तशा विष्णूच्या,
नमूनि त्यांतें रक्षी धर्मा यवननृपति हिंदूच्या ॥३७॥ (४२)

### ८. छ० राजाराम व तत्पुत्र शिवाजा

जैं **संभाजी** मृत झाला तैं यवनें **शाहू** नेला,
**राजारामें** प्रजाऽवनाचा भार शिरीं वाहीला ॥३८॥ (४३)
**राजारामें** देह त्यजितां तत्सुत **शिवाजि** मागें,
भूचें पालन करीत होता सुनीति चित्तीं वागे ॥३९॥ (४४)

### ९. छत्रपती शाहूच्या सुटकेची सिद्धता

**शंभुनृपाचा** पुत्रद्रुम हा यवनतनूजा[१]-भूंत,
म्लेंच्छप्रेमाजल-[२]प्रसेकें झाला छायावंत[३] ॥४०॥ (४५)
निज कन्येचा मानससुत जो **शाहू** त्याचें केलें,
लग्न प्रेमानें त्या यवनें दुःख लयाला नेलें ॥४१॥ (४६)
दिधलीं वस्त्रें रत्नें वाजी गजहि दिले बहु-मोल,
सर्वांटाही सुखद असे तैं **शाहू** बोले बोल ॥४२॥
**शाहु** नृपातें तोर जहाला यवनें वस्त्रें देतां,
यवन-सुतेला रंजवुना तो अटरा वर्षें होता ॥४३॥ (४७)

---

१ शहाजादी हीच कोणी भूमि तिच्यांत, = तिच्या आश्रयाखालीं. २ वात्सल्याचें प्रेम हेच पाणी, त्याच्या वर्षावानें. येथें संस्कृत समासांत प्रेम अने अकारान्तरुप रूढ होते. ३ छायेनें युक्त. अर्थात् फांद्या, पालवी इत्यादींनी भरलेला = पुष्ट.

एके दिवशीं बादशहाच्या चित्तीं ऐसें आलें,
कीं 'प्रेयाचा सन्मानुन हा,' दयार्द्र मानस झालें ४४ (४८)

'संभाजीतें वधून मी हा तत्सुत शाहू येथें,
अठरा वर्षे ठेवियला कीं योग्य नसे हें मातें' ॥४५॥ (४९)

म्लेंच्छें दिधली स्वामात्यातें आज्ञा कीं 'शाहूला
तज्जायेसह सभेस आणा; पाहूं त्यां उभयांला' ॥४६॥ (५०)

प्रधान बोले 'त्यां जायेसह यवन-सभेतें यावें,
तेथें येउनि यवन-मनांचें कोड सर्व पुरवावें' ॥४७॥ (५१)

## १०. मराठ मोळा (दिंडी)

मराठ्यांच्या सत्स्त्रिया[1] पराव्याच्या[2],
कदा नाहीं दृष्टीस पडायाच्या ।
तोच आला शाहूस वेळ जेव्हां,
पडे त्याचें संकटीं चित्त तेव्हां ॥४८॥ (५३)

तदा शाहूनें युक्ति अशी केली,
अन्य[3] कन्या सजवून सभे नेली ।
नृपा सांगितलें 'हीच वधू माझी',
तुष्ट झाला यवनेश मना-माजीं ॥४९॥ (५४)

## ११. शाहूची सुटका

पुत्रपौत्रीं उपभोग कराया़स,
दिला यवनेशें राज्य-चतुर्थांश[4] ।

---

१ कुलीन स्त्रिया. २ परक्याच्या. ३ भार्येहून अन्य = विरुबाई.
४ चौथाईचा हक्क.

स्वीय-मुद्रांकित दिलें ताम्रपत्र,
म्लेंच्छ झाला शाहूस आतपत्र[1] ॥५०॥ (५७)
यवन बोले ‘ श्रमविलें तूज वायां,
जाइ आतां निजराज्य चालवाया ।
प्रजा रक्षीं तूं, आपल्या घरा जा,
[2]राजराजासम नांद तरुण राजा !’॥५१॥ (५८,५९)
म्लेंच्छ कन्येच्या गृहीं शाहु गेला,
सर्व तिजला सांगता वृत्त झाला ।
श्रवण करितां वृत्तांत तुष्ट झाली,
शाहुगमनाची सिद्धि तिनें केली ॥५२॥ (६०)
‘ सुखद होवो तुज, मार्ग ! शाहुराया,
बुद्धि उपजो सद्रीति[3] आचराया !
ईश रक्षो !’ बोलतां नयन झाले
अश्रु-तोयें आरक्त आणि ओले ॥५३॥ (६२)
दान[4] देतां निज चित्त त्या उदारा,
तदा सोडी ती नेत्र-तोय-धारा ।
दिलें तोयाविण दान तरी व्यर्थ,
विदित होता हा सर्व तीस अर्थ ॥५४॥ (६३)

(स्रग्धरा)

ये ये ये शाहु राजा म्हणवुनि दिधलें सन्निरोपास[5] तीनें,
वत्सावांचून धेनु-समचि बहु तदा दुःख केलें सतीनें[6] । (६४)

---

१ छत्री, आश्रय. २ राजाचा राजा, सार्वभौम. ३ चांगल्या लोकांच्या चाली. ४ दान देताना तें यथासांग व्हावें म्हणून पाणी सोडावें लागतें. ही रीत येथें लक्षित आहे. ५ प्रेमाचा निरोप. ६ सदाचरणी (शहाजादी) तिनें.

म्लेंच्छाला तत्सुतेच्या असकृत[1] नमितां अश्रुपूर्णाक्षि[2] झाले,
ऐसा तो **शाहु**राजा गज तुरग चमू घेउनी मार्ग चाले ॥५५॥ (६५)

## १२. शाहू व ताराबाई

जातांना पाहुनीयां विविध जनपदां[3] तो स्वराज्यास[4] आला,
लोकां फारा दिसांनीं निज नृप बघतां फार संतोष झाला। (६७)
होती पितृव्य-पत्नी[5] स्वसुतसह तिथें, ती वदे 'हा न **शाहू**,
आहे कोणी दुजा हा, अपण नृप,' म्हणे 'राज्य यातें न वाहूं' ५६(६८)
युद्धाला सिद्ध झाली; मग नृपति वदे 'घोर संग्राम द्यावा',
**बल्लाळें**[6] तत्सचिवें[7] सुमति कथियली-'बोध तीतें करावा'।
गेला सामा कराया त्वरित विनटली[8] राज्य भूपास द्याया,
**शाहू**ही राज्य घ्याया निघत सुविभवें तोष लोकांस व्हाया ५७ (६९)

## १३. छ० शाहूस राज्याभिषेक (ओवी)

आश्विन मासीं सातार्‍यांत। सर्वजित्नाम संवत्सरांत।
शके सोळासें एकोणतिसांत। अभिषेक **शाहू**तें जाहला ॥५८॥ (७५)

—७—

१ अ-सकृत् = अनेक वेळां. २ अक्षि अश्रुपूर्ण झाले. असा संधि मराठींत सदोष आहे. ३ प्रांत, देश. ४ आपल्या महाराष्ट्र देशाला. ५ चुलत्याची स्त्री. चुलती, येथें प्रथमाक्षर गुरु पाहिजे, पण त्याचे पुढील तू जोडाक्षर नसल्यानें ति–ला गुरुत्व येणें शक्य नाहीं. यामुळें येथें वृत्तदोष झाला आहे. याचा परिहार पितृव्य असा पाठ घेऊन करावा. ६ बाळाजी विश्वनाथानें. ७ शहाणा मंत्री. यांतील चि ऱ्हस्व असणें योग्य आहे. ८ सिद्ध झाली.

# चमत्कार ८

---

## १. छत्रपती शाहूचें राज्यपरिपालन (साकी)

तोषविलें यवनेशा ज्यानें बाल्यावस्थेमाजीं,[२]
पूर्ण[१]-मनोरथ तो **शाहू** घे स्वराज्य हस्तामाजीं[२] ॥१॥ (१)
न्यायें स्वर्गाधिपास, रिपुला जिंकियलें शौर्यानें,
विप्रमनींचें कोड पुरविलें[३], सर्वहि त्या **शाहूनें** ॥२॥ (२)
दीना तैशी मिथ्या वाणी कधींहि तो नच बोले,
त्याच्या सुगुणें अवघे भूपति तत्पादीं नत झाले ॥३॥ (३)
सारे जन निज धर्में त्याच्या राज्यीं नांदत होते,
त्यांचें पोषण **शाहु** करितसे झाले बहुत सुखी ते ॥४॥ (४)
पूर्वीं जे जन मृन्मय पात्रीं अन्नें शिजवित होते,
तसेंच तुंबी[४]-पात्रें आणित होते जे उदकातें ॥५॥ (५)
**शाहु**नृपाच्या राज्यीं झालीं त्याच जनांच्या गेहीं,
बहुत रुप्याचीं भांडीं सुंदर महिमा[५] **शाहूची** ही ॥६॥
दारिद्र्यास्तव दीप-कचांना[६] स्नेह न शाखातें[७] ही
कन्या-सुत-धव[८] यांनाही ज्या दावित नव्हत्या त्वही ७ (६)

---

१ ज्याचे मनोरथ पूर्ण झाले आहेत असा. २ माजी = मध्यें. ३ (भरपूर दानें देऊन ब्राह्मणांस) तुष्ट केलें. ४ भांड्यासारखा उपयोजिलेला भोपळा. ५ महिमा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. येथें मराठींतील सामान्य रूढीस अनुसरून हा शब्द स्त्रीलिंगी योजिला आहे; पण पुढें आठव्या पद्यांत संस्कृतानुसार पुल्लिंगी आढळतो. ६ दिवे आणि डोक्याचे केश. ७ शाखा-पदानें येथें पुरुषाची शेंडी विवक्षित असावीसें दिसतें. तसें असल्यास दीप-कच यांतील 'कच' शब्दानें स्त्रियांच्या केसांचें ग्रहण प्राप्त होतें. ८ मुली, मुलगे, पति

( पुढील पृष्ठावर )

त्या नारी श्री-**शाहू**-राज्यीं झाल्या पूर्ण[१]-स्नेहा,
दारिद्र्याचा नाश जहाला महिमा **शाहूचा**[२] हा ॥८॥

मासा अथवा गुंजचि सोनें घालुनि आंगावरती
करीत होते जे जन पूर्वी विवाह ऐशा रीती ॥९॥ (७)

तल्लोकांच्या सुंदर नारी मौक्तिक-भारें लवल्या,
सोन्याच्याही मुद्रा[३] सहजचि अश्व[४]-भूपणें झाल्या ॥१०॥

दळीत होत्या विद्वद्भार्या पूर्वी मोलानें[५] ज्या
त्याच ' दुजाच्या हातीं करवूं ' वदती ' स्वीया काजा ' ॥११॥ (८)

पूर्वी पेजहि मिळत नसे ज्या, त्यांना **शाहू**-राज्यीं,
चतुर्विधान्नें[६] यथेच्छ मिळतां, कडवट लागे कंर्जी[७] ॥१२॥ (९)

---

( मागील पृष्ठावरून )

यांनाही दारिद्र्यामुळें मनांत प्रेम असूनही तें कृतीनें दाखविणें स्त्रियांना शक्य नव्हतें. प्रस्तुत पद्यांत स्नेह शब्द श्लिष्ट आहे. दीप इत्यादि संबंधांत त्याचा अर्थ तेल असा आहे. कन्या इत्यादिकडे त्याचा अर्थ **प्रेम** असा आहे. १ ज्यांजवळ दिव्यासाठीं **भरपूर तेल** आहे आणि **प्रेममूलक** कृत्यें पैशामुळें ज्या **पुरीं** करूं शकतात अशा (पूर्ण, भरपूर, फलित आहे स्नेह ज्यांमध्यें अशा). २ याचें विशेष्य महिमा (पुं.). ३ मुद्रा = आंगठ्या. ४ घोड्यांच्या अंगावरीलही दागिने सोन्याचे करण्यांत येऊं लागले. ५ पैसा घेऊन (दुसऱ्याचें दळण करीत). ६ खाद्य, पेय, चोष्य व लेह्य—यांचे नमुने क्रमानें—लाडू, बासुंदी, पाकानें भरलेल्या जिलबीच्या टोसर नळ्या, व मोरांबा. ७ या शब्दाचे घटक क् अ र् अनुस्वार ज ई असे आहेत. हा उच्चाराचा क्रम अशा लेखनांत पाळला जात नाहीं. (१) क–वर अनुस्वार दिल्यास त्याचें लेखन रेफाच्या पूर्वी होतें. (२) रेफाच्या बांकांत दिल्यासही–रेफ व अनुस्वार हे जी–च्या नंतर येतात. एवं अनुस्वार क–वर दिला किंवा रेफाच्या बांकांत दिला तरी लेखन उच्चार-क्रमास विरोधी होतें. हा विरोध टाळण्यास क–वर रेफ व त्याचे बांकांत अनुस्वार म्हणजे ' कंर्जी ' असें लिहिणें योग्य होईल.

ज्याच्या गेहीं बाळातेंही न मिळे पायस[1] पूर्वी,
तद्गेहीं सद्धेनु-पयानें[2], ओली झाली उर्वी[3] ॥१३॥ (१०)

शाहू भूपाशीं नच करिती षड्रिपु[4] वैर कदाही,
अन्य रिपूंची गोष्ट कशाला? व्याघ्रा न भिती गाई ॥१४॥ (११)

शाहु नृपाची आज्ञा होता, त्याच्या यश—तेजानीं ।
आक्रमिली हो सकला पृथ्वी, नमिल्या साध्वी[5] त्यांनीं ॥१५॥ (१२)

साध्वी[5]-हस्तीं कंकण-वेशें[6], प्रताप राहे त्याचा,
मुक्ताहारचि[7] होउनि यश[8] तें आश्रय करि कंठाचा ॥१६॥ (१३)

शाहुनृपति तो निजप्रजेचें पालन करीत असतां
नृप-जल-तस्कर-रोगांपासुनि ताप जनातें नव्हता ॥१७॥ (१४)

सुविद्य असुनी दारिद्र्यास्तव जीर्ण पटा नेसोनी,
पूर्वी लज्जेस्तव मानव जे हिंडत होते रानीं ॥१८॥ (१५)

शाहुनृपानें त्यांना दिधले ग्राम तसे गज वाजी,
विद्वानांतें मान मिळतसे ऐसा शाहू-राज्यीं ॥१९॥

---

१ दूध, दहीं इ०; दूध व त्याचीं रूपांतरें. २ सत्+धेनुपय=चांगलें दाट असें गोदुग्ध. ३ जमीन (दूध भरपूर असल्यानें तें वारंवार भूईवरही सांडत असे व त्याबद्दल हळहळही वाटण्याचें कारण नव्हतें.) ४ काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे मनांतील घातक विकार. ५ साध्वी=पतिव्रता. ६ हातांतील कांकणांच्या रूपानें. ७ मोत्यांचे हार. ८ कविकल्पनेप्रमाणें प्रताप अग्नीप्रमाणें तेजस्वी पिवळ्या रंगाचा आहे. म्हणून शाहूचा प्रतापच जणूं काय (उजळ आणि पिवळा असल्यानें) स्त्रियांच्या हातांत सोन्याच्या बांगडीच्या रूपानें राहत असे. यशास कवि शुभ्र समजतात. यामुळें शाहूचें यश शुभ्र मोत्यांच्या रूपानें नटून स्त्रियांच्या गळ्यातील मोत्यांचे हार बनत असे.

७ स्त्रिय.

पूर्वीं चौघां भावांमध्यें, विवाह जरि एकाचा[१],
झाला तरि जे मानित होते, मोठा लाभचि साचा २० (१६)
शाहू-राज्यीं त्या सर्वांचीं लग्नें होउनि कोणी,
संततिसाठीं दुसरी भार्या वरिती निरुपायांनीं[२] ॥२१॥
असकृत्[३] मंगल कार्यें बहुविध ब्राह्मण-गेहीं होतीं,
तद्धोमांनीं[४] सर्वहि निर्जर* तोषित झाले चित्तीं ॥२२॥ (१७)
सकला[५] शाखांच्या विप्रांना भूपें मंत्री केले,
त्यांनीं स्वधनें दुज्या द्विजांचें, दुःख लयातें नेलें ॥२३॥ (१८)

## २. उत्तरप्रांताक्रमणार्थ बाळाजी विश्वनाथाचें गमन

शाहू भूपें आज्ञा दिधली [६]**बहिरोजी**पंतातें,
'तुह्मीच उत्तर दिशेस जावें, जिंकाया यवनातें ॥२४॥ (१९)
मुख्य सचिवही तुम्हीच आहां, मुख्य[७] दिशेतें जावें,
सत्वर जिंकुनि सर्वहि यवनां, अपूर्व यश मिळवावें' २५ (२०)
तेव्हां **बहिरोपंत** वदे कीं, 'झालों मी म्हातारा,
आतां मज हें कार्य न झेपे, प्रेषा अन्या वीरा' ॥२६॥ (२१)

---

१ वर्णनाच्या भरांत पूर्वकाल व शाहूकाल यांत मोठें अंतर दाखविण्या-साठीं कवि म्हणतो, तीनचार भावांत दारिद्र्यामुळें झाला तर एखाद्याचाच विवाह होत असे. पण त्या कालीं आपल्या गरजा फारच माफक असल्यानें 'दारिद्र्यामुळें विवाह घडत नसत' हें म्हणणें वस्तुस्थितीस धरून नसावें. २ पहिलेंच लग्न होण्याची मारामार; तेव्हां दुसरें लग्न कोणीं केलेंच तर तें कुलास तारण्यासाठीं संतति असावी याच एका हेतूनें. लग्नाच्या अभावीं कुलतारण संभवत नसल्यानें असें लग्न निरुपायीच होत असे. ३ अ–सकृत् = एकदां नव्हे, वारंवार. ४ तद् + होम. त्या मंगल कार्यांतील होम. ५. ऋग्वेद, यजुर्वेद इत्यादि सर्व शाखांचे ब्राह्मण त्यानें मंत्री नेमिले. पण हें इतिहासानें समर्थित नाहीं. ६ बहिरोपंत पिंगळे यांस. ७ मोंगलासारखे प्रबळ राजे उत्तरेस असल्यानें ती मुख्य दिशा गणली आहे. *देव.

तेव्हां **बाळाजी**पंतातें उत्तर दिशेस जाया
आज्ञा देउनि निज योधांसह धाडी हिंदू राया ॥२७॥ (२२)
आज्ञा घेउनि तो **बाळाजी** उत्तर दिशेस गेला,
सर्वहि यवनां पराभवूनी सयश घेता झाला ॥२८॥ (२३)
**अटक**[1] नदीचें हिमशुद्धोदक[2] निज तुरगांतें पाजी
परतीरीं[3] तो नाहीं गेला शास्त्रास्तव **बाळाजी** ॥२९॥ (२४)
जैसें सयश तशींच मोत्यें अपार रौप्यहि[4] तैसें,
घेउनि येतां तो **बाळाजी** हिमगिरिसा तैं विलसे ॥३०॥ (२५)
'जनगिरिकुहरीं जागृत तुमचा प्रताप[5]-पंचानन हो
आहे, यास्तव तवानुगांतें भ्याले म्लेंच्छ-करी[6] हो' ॥३१॥
**बाळाजी**नें ऐसें विनवुनि **शाहु** नृपातें दिधलें,
आणियलेलें सर्वहि वैभव, निज शिरही नत केलें ॥३२॥
मधुर वचानें, नमस्कृतीनें, निस्तुल पराक्रमानें,
**शाहु**नृपातें तुष्टचि केलें तेव्हां **बाळाजी**नें ॥३३॥

## ३. छत्रपती शाहूचे अष्ट प्रधान

निज संतोषें **शाहू** भूपें **बाळाजी**पंतातें
मुख्य प्रधान केलें, त्याच्या पाहुनि चातुर्यातें ॥३४॥ (२६)
कोंकणवासी **राम-तनय**[7] जो गुणी तयातें दिधलें,
मंत्री-पद तैं **शाहु**नृपानें, निज भारा लघु केलें ॥३५॥ (२७)

---

१ बाळाजी विश्वनाथ अटकेपर्यंत गेले असें इतिहास सांगत नाहीं. तेव्हां येथील विधान अक्षरशः घेतां येत नाहीं. २ बर्फाचें बनलें असल्यामुळें स्वच्छ असलेलें पाणी. ३ सिंधूच्या पलीकडे आर्यांनीं जाऊं नये अशा कल्पित दंडकामुळें. ४ येथें मोत्यामागून सोन्याचा उल्लेख अवश्य होता. पण सोनें शुभ्र नसल्यानें तत्स्थानीं रुपें सांगितलें आहे,—अशाकरितां कीं, यशाच्या पांढऱ्या रंगाशीं मोत्याबरोबर रुप्याचा रंग सवादी (मिळता) व्हावा. ५ प्रतापरूपी सिंह. ६ यवनरूपी हत्ती. ७ हा नाना फडणिसाचा चुलत आजा (?).

यथार्थवादी वशी[१] द्विजातें[२] सचिव-पदीं शाहूनें
नेमियलें, मग ऋग्वेदी द्विज[३] केला अमात्य त्यानें ॥३६॥ (२८)
निज प्रजेचें उत्तम पालन व्हावें यास्तव ऐसे
स्थापुनि अष्ट प्रधान चित्तीं शाहूराजा तोषे ॥३७॥ (२९)
लेखन-कर्मीं योजियलें तैं नयज्ञ-शा परभूतें[४],
प्रधान-हस्तीं राज्य निवेदुनि, शाहु करी मृगयेतें ३८ (२९,३०)

## ४. शाहूची मृगया व त्याचा कुत्रा

व्याघ्रवृकादिक हिंसक पशुंना वधून गहनीं[५] स्वांगें[६]
चपल श्वानासह तो धन्वी धांवे हरिणामागें ॥३९॥ (३१)
सांद्रा[७]वृक्षच्छायेमाजीं व्याघ्र लपाला होता,
तेथें गेला भीतीनें मृग, भूपहि तो मृग-हंता ॥४०॥ (३२)
व्याघ्र नृपातें देखुनि उठला भव्य[८] मुखा पसरोनी,
पुढच्या चरणें उकरित भूमी, लांगूला हलवूनी ॥४१॥ (३३)
आतां दैवचि रक्षक ऐसा भूपें करुनि विचार,
सिंहासम निज ठाण[९] मांडिलें, घेउनियां तलवार ॥४२॥ (३४)
जो शाहूच्या सन्निध होता बली[१०] तयाचा श्वान,
निज प्रतापें वांचविलें तैं त्यानें भूप-प्राण ॥४३॥
सरसावुनि ये व्याघ्र यदा तैं श्वानें वृषण[११] तयाचा
दातीं धरिला तदां व्याघ्र तो झाला तेजें कांचा[१२] ॥४४॥(३५)

---

१ मनावर सत्ता चालविणारा; सत्ता २ चिमणाजी शंकर सचीव. ३ रामचंद्रपंत अमात्यांचा पुत्र भगवंतराव. ४ गोविंद खंडेराव चिटणीस. ५ अरण्यांत. ६ स्वतः, जातीनें. ७ दाट. ८ अजस्र (संस्कृतांत याचा अर्थ 'मंगलकारक' असा आहे.). ९ ठाण मांडिलें = पवित्र्यांत उभा राहिला. १० बलवान्. ११ अंड. १२ धैर्यानें कमी, घाबरलेला.

निज खड्गानें शिर तोडियलें शाहूनें व्याघ्राचें,
इतुक्यामध्यें धांवत आले सैन्य-प[1] त्या शाहूचे ॥४५॥ (३६)
नगरा जाउनि शाहु नृपानें, शिबिका[2] दिधली श्वाना,
स्मरणें उपकृति सर्वांची हें व्रत आहे विबुधांना[3] ॥४६॥ (३८)
[4]यदाश्रयानें [5]सुकृता चरणी होउनि पुरुष प्राणी
सुयोग्य[6] होती स्वर्गसुखातें भोगाया अवसानीं[7] ॥४७॥ (३९)
त्या देहाचें रक्षण केलें ज्यानें त्या श्वानातें
शिबिका दिधली शाहुनृपें हें नवल न भासे कवितें ॥४८॥

## ५. शाहूची देणगी व प्रजांचें सुख

**कृष्णा-वेण्या**-संगमतीरीं तो शाहू स्नानातें
जाई, एके समयीं नमिलें निर्धन विप्रें त्यातें ॥४९॥ (४०)
हिम बहु लागे यास्तव मागे द्विज कंबल[8] भूपातें,
भूपें **कंबल**-नामा ग्रामचि दिधला त्या विप्रातें ॥५०॥ (४२)
ज्या विप्रांनीं शाहूपाशीं पूर्वी याच्ञा केली,
अद्यापिहि त्या विप्रांची श्री न्यूना नाहीं झाली ॥५१॥ (४३)
भूपें दिधले ग्राम बहुत जे विबुध-वरां[9] विप्रांतें,
अद्यापिहि ते समस्त चालति त्यांच्या सद्वंशातें[10] ५२(४४,४५)
जैसे[11] दिधले शाहूभूपें, तैसे सचिवांनींही,
होतें राज्यचि विप्रकरी हें, वदण्या चिंता नाहीं ॥५३॥ (४५)

---

१ प = पालक, नाईक. २ पालखी. ३ विबुध = शहाणा. ४ जें शरीर धारण करून. ५ सुकृत = पुण्य. ६ समर्थ. ७ शेवटीं, मरणोत्तर. ८ कांबळा, घोंगडी. ९ विद्वानांत श्रेष्ठ. १० चांगले, सदाचरणी वंशज. ११ शाहूराजाप्रमाणेंच त्याचे मंत्रीही दानधर्म करीत असत.

'निर्जर-पंथा रोधक[१] ऐशा, प्रासादाच्या शिखरीं
[२]चंद्रादर्शी निजमुख बघतां, 'तुम्ही कुणाच्या नारी?'॥५४॥(४६)

सुरांगनांनीं शाहुनृपाच्या केला विप्रवधूंतें
प्रश्न असा तैं विप्रवधूही वदल्या सुरांगनांतें ॥५५॥

'निज श्रियेनें जो नृप आहे इंद्रश्रीतें जेता,
बायांनो, गे, समजा आम्ही तद्विप्रांच्या वनिता ॥५६॥(४६)

शाहुनृपाच्या दानें भू-सुर[३], तसेंच सुरही[४] पुष्ट,
तसेच वैश्यहि अव्याहत[५] निज कर्मे झाले तुष्ट ॥५७॥(४७)

त्याच्या सदानानें[६] भानुहि अस्तातें नच जाई,
क्रौंचांच्या[७] मिथुनांतें यास्तव तोष मनीं बहु होई ५८ (४७)

---

१ देवांच्या (विमानाच्या) मार्गांत अडथळा आणण्याइतके (उंच). २ चंद्ररूपी आरशांत. ३ ब्राह्मण. ४ देव. ५ ज्यांत व्यत्यय येत नाहीं असें; निर्विघ्न. ६ उदार दान. ७ क्रौंच-नें चक्रवाक पक्षी विवक्षित दिसतो. या पद्यांतील कल्पना—उदय-पर्वत सोन्याचा आहे, त्याचे मागें सूर्य अस्तास जातो—ही आहे. शाहू पुष्कळ दान करीत असे, अर्थात् पुष्कळ सोनें खर्च करी. यामुळें होतांहोतां सोन्याचा पर्वत मेरू सर्व संपून गेला. अर्थात् सूर्याचें मावळणें बंद झालें. आतां, सूर्य मावळला असतां चक्रवाक पक्ष्यांचा जोडा परस्परांपासून वेगळा झाल्यानें त्यांचा होणारा शोक, कारणाभावीं बंद झाला. एतत्संबंधांत पुढील पद्य पहा—

कतिपयदिवसैः क्षयं प्रयायात् कनकगिरिः कृतवासरावसानः।
इति मुदमुपयाति चक्रवाकी वितरणशालिनि वीररुद्रदेवे॥

**अर्थ**—राजा वीररुद्र हा औदार्यानें दान करीत असतां 'सूर्याच्या आड येणारा मेरुपर्वत थोड्याच दिवसांनीं खपून जाईल' या भोळ्या समजुतीनें चक्रवाकीला आनंद होतो.

मन्मय-पात्रें नच घेती जन, यास्तव कुंभारातें[1],
बरें न वाटे; तसेंच दानें जल सरतां मत्स्यांतें ॥५९॥ (४७)

एके समयीं शाहूराजा मृगयापंथीं श्रमला,
तदा क्षुधेनें तसा तृषेनें व्याकुळ फारचि झाला ॥६०॥ (४८)

दहि-भाताची निज भर्त्याची घेउनि शीघ्र शिदोरी[2],
पंथा चालत होती एका शूद्राची तैं नारी ॥६१॥ (४८,४९)

तीतें देखुनि शाहू बोले, 'अन्नोदक दे मजला,
क्षुधे-तृषेनें प्राण पहा हा, व्याकुळ आहे झाला' ॥६२॥ (५०)

ऐकुनि त्याचें वाक्य सतीनें, त्यास शिदोरी दिधली,
शाहू-भूपें भक्षुनिया ती क्षुधा लयातें नेली ॥६३॥ (५१)

'गे साध्वी मी राजा आहें, पतिसह मज भेटाया
यावें तूं' हें कथुनि तीतें, नृप गेला निज ठाया ॥६४॥ (५२)

जेव्हां गेली निज भर्त्यासह शूद्री[3] ती भेटाया,
शाहू-भूपें ग्राम दिला तैं, तीतें उपभोगाया ॥६५॥ (५३,५४)

अष्टहि निर्जर निजांशरूपें वसती ज्या नृपदेहीं,
त्याचें पालन-[4]कर्त्या दिधला ग्राम, नवल हें नाहीं ॥६६॥(५६)

[5]जयसिहानें वाजिमखातें[6] करूनि ऋत्विज पुजिले,
वस्त्राभरणीं तोषवुनी त्यां अपार धनही दिधलें ॥६७॥ (५७)

---

१ या पद्यांतील कल्पना—श्रीमंतीमुळें लोक मातीचीं गाडगीं वापरीनात, त्यामुळें कुंभाराचा धंदा बसला; आणि वारंवार दान दिलें जातांना, पाणी सोडावें लागल्याने पाणी खपून माशांवर जलाभावीं तडफडण्याचा प्रसंग आला. २ (येथें) शेतावर खावयाचें अन्न. ३ शूद्र स्त्री. ४ येथें पालनचा अर्थ पोषण घेणे प्राप्त आहे. ५ जयसिहानें अश्वमेध केल्याचा उल्लेख बखरग्रथात येतो. ६ अश्वमेध.

**शाहू**-भूपाचिया द्विजांतें[१] पाठविलें धन कांहीं,
जाणविलें कीं 'ऋणी करावा, ऐसा यज्ञ तुम्हींही' ६८ (५८)

'विप्रकरीं मम राज्यचि आहे,' ऐसें लिखितार्थानें
जाणविलें तैं त्या **जयसिंहा** चतुरा **शाहु**नृपानें[२] ॥६९॥ (६४)

ऐसें कळतां त्या **जयसिंहा**, त्याचा गर्व निवाला,
मानित होता तो कीं, 'मत्सम दाता नाहीं झाला' ॥७०॥ (६५)

—८—

१ ब्राह्मणांस देण्यासाठीं. (शाहूकडे दक्षिणार्थ धन पाठविलें.). २ हा निरोप शाहूकडून न जातां ब्राह्मणांकडून जाणें अधिक योग्य झालें असतें.

# चमत्कार ९

## १. प्रधान बाळाजी विश्वनाथकृत

### त्रिविध कोकणस्थांची इच्छातृप्ती (आर्या)

'**श्रीमच्छिवाजि**वंशा देउनिया मान सर्वकाळ तुम्हीं,
न्यायें प्रजेस रक्षुनि भोगावी ही तदर्जिता[१] सु-मही[२]' ॥१॥
**बाळाजीपंता**तें ऐशी आज्ञा करोनि सन्मानें,
त्याच्या करीं निरविलें[३] सकळहि निज राज्य **शाहुभूपानें** ॥२॥
विधि-विद[४] तो **बाळाजी** भूपाज्ञेतें धरूनियां स्वशिरीं,
वृक्षाच्छादित तैसें सुजनाच्छादित[५] समस्त राज्य करी ॥३॥ (१)
त्रेतायुगीं जन जसे निजधर्मीं सर्वथैव रत होते,
तैसेंच होउनीयां, मंगळ कार्यें सदैव करिती ते ॥४॥ (२)
द्विज कोंकणस्थ[६] आले **बाळाजीपंत** यास भेटाया,
आजानुवस्त्र[७] नेसुनि हातीं घेऊनि वेत्र टेकाया ॥५॥ (३)

---

१ त्यानें अर्थात् शिवाजीनें मिळविलेली. २ समृद्ध स्थितींत असलेला देश. ३ सोंपविलें. ४ कार्यज्ञ. ५ एखादा रूक्ष व रखरखीत प्रदेश सुखावह होण्यास त्यांत वृक्ष लावून त्यांची छाया करावी लागते. त्याप्रमाणें राज्यांतील लोकांस सुख होण्यास बाळाजीनें ठिकठिकाणीं अनेक सज्जनांस स्थापून इतरांस त्यांमुळें मार्गदर्शन होईल असें केलें. ६ रत्नागिरी, कुलाबा इत्यादि घाटाखालच्या जिल्ह्यांतून. कोकणस्थ ह्या संज्ञेचा 'चित्तपावनाः काराष्ट्राः देवर्षय इति त्रिविधाः' असा अर्थ, मुळांतील १० व्या चमत्कारांतील १७ व्या पद्यांत आलेल्या 'ये कोकणस्थास्त्रिविधाः' ह्या पदावरील टीकेंत पुरुषोत्तम कवीनें पुढें दिला आहे. ७ जानु म्हणजे गुडघा, तेथपर्यंत पुरणारें धोतर म्हणजे पंचा. ८ वेत्र = वेत. कोंकणांत वेत नसून बांबू पुष्कळ उगवतो. अर्थात् या त्रिविध कोंकण्यांच्या हातांत वेत्राचे स्थानी बांबूची काठी म्हणजे 'वंश-दंड' असणे हेंच योग्य दिसतें. अर्थात् येथें वेत शब्द [illegible]चित्य आहे.

पूग[1], श्री-फळ[2], तैसे [3]पृथुकहि देवूनियां उपायन हो ।
**बाळाजी**तें ते द्विज वदती ‘ तुजला प्रसन्न शंकर हो ! ॥ ६ ॥ (४)
अस्मत्सखे, तुलाही प्राप्ता झाली असे नृपश्री रे,
त्वद्देश-बंधु[4] आतां त्वांही करिजे[5] तिनें सुखी सारे ’ ॥७॥ (४,५)
**बाळाजी**नें बहु धन अर्पुनियां त्या द्विजांस तोषविलें,
इच्छाभोजन देउनि त्यांच्या देशीं तयांस पाठविलें ॥ ८ ॥
**बाजीराय, चिमाजी** हे दोघे सुत तया प्रधानाचे ।
भानु-शशी-सम होते, कीर्ति-वधू ज्यांचिया करीं नाचे ॥९॥ (६)
सर्वतूंत सुखावह ऐसा जो ग्राम, नाम ज्यास **पुणें** ।
निज वसति-स्थान तिथें केलें **बाळाजि**नें कलानिपुणें[6] ॥१०॥ (७)
ऐसें करीत असतां निज प्रजेचें सशास्त्र रक्षण तो,
आला तन्निधनाचा समयचि सर्वां जनांस जो येतो ॥११॥ (८)
**अंबाजी**[7]-नामा जो **पुरंदरे** त्यास ठेउनी स्वपुरीं,
त्यजुनि अशाश्वत जग हें **बाळाजी** शाश्वता[8]पदास वरी १२(९)
हें वृत्त ऐकुनीयां शोक क्षणमात्र **शाहु**नें केला,
**बाजीराय**-शिरीं मग सर्वहि निजराज्यभार अर्पियला १३ (१०)

## २. प्रधान थोरले बाजीराव

गुरु[9]–हुनि निजप्रजेचें उत्तम पालन करीतसे **बाजी**,
वेदाध्ययना करुनी विप्र सदा जाहले तया राजी[10] १४(११)

---

१ सुपारी. २ नारळ. ३ पोहे,(कोंवळा नारळ म्हणजेच शहाळें, ओली सुपारी, वाळलेली फणसपोळी, काजू-बिया, पोहे इत्यादि वस्तु कोंकणांत पैदा होतात. त्या देशावर विरळा.) ४ तुझ्या प्रांतांतील रहिवाशी. ५ करिजे– एकवचनी आहे. येथें याचें अनेकवचन करिजेत असें असावयास पाहिजे. ६ कलांमध्यें चतुर अर्थात् कलाकुसरीचा चाहता. ७ सासवडकर अंबाजीपंत. ८ (स्वर्गांतील) कायमचें स्थान, मोक्ष ९ गुरु = वडील, बाप. १० त्यावर संतुष्ट.

तत्तातांहुनि अधिका जडली **बाजी**वरी नृपप्रीती,
सकला सुकला शिकण्या स्वस्थमनें[1] लोक यत्न तैं करिती १५ (१२)

## ३. थोरले बाजीराव व त्रिंबकजी दाभाडे

त्या **बाजीराया**तें आज्ञा सर्वांसमक्ष **शाहु** करी,
'उत्तर दिशेस जाउनि जिंकीं म्लेंच्छास सर्वथा समरीं' १६ (१३)
**शाहू**भूपति देई, गज, रथ, पदचर, तसेंच वाजी ही,
चतुरंग[2]-सैन्य-भारें, लवली तेव्हां क्षणैक सर्व मही १७ (१४,१५)
रणभेरी वाजवुनी संगें घेऊनि भूप-दत्त बल,
रिपु मथुनी धन अणण्या, धनदाशेतें[3]च जाय तो प्रबळ १८ (१७)
सेनापति **दाभाडे त्रिंबकजी** जो वसे **तळेगांवीं**,
भूपप्रीति तयावर होती; ती **बाजि**तें असे टावी ॥१९॥ (१८)
त्याच्यापाशीं होते अष्टायुत वाजिसादि भट[4] गाजी[4]
त्यानें वृत्त परिसिलें कीं जातो या पथें सचिव **बाजी** २० (१९,२०)
'या मार्गें नच जावें' ऐसें **बाजीस** कळविलें त्यानें
'युष्मद्वच मान्य' असें जाणविलें तैं तयास **बाजीनें** २१ (२१-२३)
निजहितकर योधांतें, पाचारुनि तैं वदे तयां **बाजी**,
'ऐशा संकटसमयीं, युक्ति बरीशी मला कथावी जी ॥ २२ ॥
पूर्व दिशेनें जातां लागे मार्गांत यावनी[5] देश,
उत्तर-पश्चिम भागीं **त्रिंबकजी** हा असेच कुजनेश[6] २३ (२४)

---

१ (पैशाची उणीव नसल्यानें) २ हस्त्यश्वरथपादातं सेनांगं स्याच्चतुष्टयम्। **अर्थ**—हस्तिन् (हत्ती), घोडे, रथ व पायदळ हीं सेनेचीं चार अंगें होत. ३ धनं दधते (रक्षितो) सः धनदः (कुबेर) इंद्राचा खजिनदार याची दिशा म्हणजे उत्तर दिशा. ४ विजयी वीर. ५ यावन-चे स्थानीं वृत्त साधण्यासाठीच यावनी हें रूप योजिलेलें दिसतें. ६ खलनायक.

भूपप्रिय हा असुनी, सेना आहे महत्तरा याची,
तैशी न आपुली हो, मागें फिरतां अकीर्ति व्हायाची २४ (२४,२५)

आम्हां न साह्य कोणी, **त्रिंबकजी**तें नृपेंच योजियलें,
मद्धैर्य[1] पहायातें, ऐसें माझ्या मनीं असे[2] आलें' २५ (२५,२६)

सर्वानुमतें ठरतां, धाडियलें पत्र **शाहुराजा**तें,
आलें नाहीं त्याचें उत्तर फारा दिशींहि **बाजी**तें ॥२६॥ (२७)

तेव्हां भट मेळवुनी, **बाजी**नें त्यां विचार हा कथिला,
'**त्रिंबकजी**च्या हनना मध्यान्हीं हो[3], उद्यांच जाउं चला २७(२८,२३)

न्यायें प्रजेस रक्षी, जो दाता, धीर, वीर आणि वशी,
जयलक्ष्मी त्या वरिते, इतरा होई न ती कदापि वशी[4] २८ (२९)

यास्तव[5] **दाभाड्या**तें जय मिळणें कठिणसें गमे मजला,'
वीरांतें कथुनि असें, तो **बाजी** युद्ध द्यावया सजला ॥२९॥(३०)

प्रात:काळीं भोजन सारुनि त्या **बाजि**चें बल निघालें,
निज विक्रम दावाया, मध्यान्हीं शत्रुच्या पुरा[6] गेलें ॥३०॥ (३३)

**त्रिंबकजी**च्या शिबिरीं कोणी जेऊनि तेधवां उठले,
कोणी जेवित होते, कोणी जेऊनि मंचकीं निजले ॥३१॥ (३१)

कोणी क्रीडत होते, सावध कोणींहि तेधवां नव्हते,
एकाएकीं पडलें त्यांच्या दृष्टी सशस्त्र रिपुबल तें ३२ (३१,३२)

**बाजीरायें** तेव्हां, रिपुभट मारूनियां निजासीनें,
**त्रिंबकजी**तें वधिलें, पूर्वी तन्मार्ग रोधिला[7] ज्यानें ॥३३॥ (३४)

---

१ माझ्या धैर्याची कसोटी पाहण्यासाठीं. २ आहे. ३ संबोधनार्थक अव्यय. ४ अनुकूल. ५ मी एवंगुणविशिष्ट असल्यानें मलाच जय मिळेल, व अर्थात् दाभाड्याचा पराजय होईल. ६ गांवाला. ७ (होता).

वायु जसा निजतेजें[1] बहु-जलदांतें क्षणांत संहारी,
तैसा गाजी **बाजी** शत्रुभटांते निजासिनें मारी ॥३४॥ (३५)

नंतर निजसेनेसह गेला स्नानार्थ **गौतमी**[2]-तीरीं,
सबळ स्नान करोनी, स्तवन तियेचें यथार्थ तेथ करी ॥३५॥ (३६)

## ४. गोदावर्यष्टक (शार्दूलविक्रीडित)

माते **गौतमि**, गौतमादि मुनिही तूतें सदा प्रार्थिती,
दारा[3]-पुत्रसहीत निर्जर तुला सद्भक्तिनें पूजिती ।
जाळी अग्निशिखा तृणा जवळच्या, तूं पापरूपी तृणा
जाळीसी दुरुनीहि, गे, तुजपरी सांगें, गणूं मी कुणा ! ३६ (३७)

लोकांनीं त्यजिलीं अघें निजजलीं[4] तीं सर्व नाशावया,
सिंहातें गुरु ये तदा सुरनदी ये तूज भेटावया,
कोणीही तव वर्णना क्षम नसे, आहे परी दोष हा,
नेती पुण्यकृता[5] नरां सुर दिवीं, पाप्यांसही तूं, पहा ३७ (३८)

गो[6] देशी म्हणुनीच पंडित तुला गोदा असें बोलती,
पाप्यांचें अघ एकटीच[7] हरिसी, सामर्थ्य वर्णूं किती ! ।

---

१ बळानें. २ पुरुषोत्तमास गोदावरीची स्तुति करावयाची होती म्हणून त्यानें वाटेंत बाजीरावास गोदावरी लागली असें म्हटलें आहे. पण त्याच्या मार्गांत गोदावरी येणें शक्य नाहीं. कारण डभईच्या लढाईनंतर जयसिंहाकडे बाजीराव गेला असें कवि पुढें सांगतो अर्थात् गुजराथ आणि राजपुताना याच्यामध्यें कवि गोदेस कल्पित आहे. यावरुन मूळ कवीचें भूगोलविषयीचें ज्ञान (?) दिसून येतें. ३ दार = स्त्री; सहित = समवेत. येथें दार आणि सहित यांतील द्वितीय अक्षरें वृत्त साधण्यासाटीच दीर्घ योजिलीं आहेत. ४ आपल्या म्हणजे भागीरथीच्या पाण्यांत. ५ पुण्य आहे केलें ज्यांनीं ते, अर्थात् पुण्यवान्. ६ गो = स्वर्ग. ७ दुसऱ्या नदीच्या साह्यावांचून.

एकाकी सफलेच्छ भक्त करिशी, गंगा जरी तूजला
भेटूं ये तरि शक्ति[१] होय, अतुला[२] माते, नमीं मी तुला ३८ (३९)

नाहीं तूं पडलीस दृष्टिस शिवे, पाण्याचिया जोंवरी,
तत्पापा यम मोजितो भव-जटाजूटोद्भवे[३] तोंवरी।
'गोदा' हें वदतांच[४] पाप हरतें, त्वद्दर्शनें मुक्ति ये,
स्नानें काय घडेल ? संशय असा सल्लोक-चित्तांत[५] ये ३९(४०)

सातांही जलधींस तूं शुचिजला सातां मुखीं मीळशी
किंवा भूर्मुख[६] सप्तलोकगमना सप्तानना[७] झालिसी।
तेथें जाउनि त्यां पुनीत करणें त्वद्धेतु हा गे वृथा,
कीं जाती, तव दर्शनें शुचि असे होवोनियां, सत्पथा ॥४०॥ (४१)

गेलीं कीं कलि-भीतिनें सकल-ही स्वर्गीं पहा दैवतें,
गे, जाणारचि **विष्णु**, निर्जर-नदी, ऐशी श्रुतीचीं मतें।
एकाकी तयिं तूंच राहसि इथें पापौघ-विध्वंसिनी,
पापी उद्धरणें तुझें व्रत सदा आहे, गमे मन्मनीं ॥४१॥ (४२)

जो कोणी जड वा सजीव सहजें तुझ्या जलातें शिवे,
तीनाही पुरुषार्थ त्यास मिळती, नाहींच शंका, शिवे ! ।
**श्रीगोदे** तव तीरिंचा पवनही ज्यातें नसे लागला,
नाहीं मोक्ष तया, नृपाल[८] जरि तो, त्वत्सेवना चूकला ४२(४३)

---

१ या ठिकाणीं शक्त असल्यास बरें. २ गंगा तुझ्या साह्यानेंच पाप हरिते; पण तूं एकटीच हरितेस. म्हणून तूं अतुला. ३ शंकराच्या जटाबंधांतून निघालेली. ४ उच्चारलें जातांच. ५ विचारी, विद्वान् लोक. ६ 'भूः भुवः' इत्यादि सत्य लोकांपर्यंतचे सात लोक. ७ भूः इत्यादि सात लोकांस भक्तांना उद्धरून नेण्याकरतां तुझे सात प्रवाह झाले आहेत. ८ या पद्यांत 'उक्षा' पक्षी० इ० वाल्मीकिकृत गंगाष्टकांतील पद्याचें अनुकरण आहे.

न्हाती ज्या नृपयोषिता तव जलीं सल्लेप[1] तद्देहिंचे,
ते ज्यांचे असती असे तरहि तैं जाती पदीं **विष्णुचे** ।
माते, यास्तव याचितों, तव[2] पदीं मच्चित्त हें लागलें,
संरक्षीं मजला, स्तवूं किति तुला ? शेषादिही भागले ४३ (४४)

## ५. थोरले बाजीराव व जयपूरकर जयसिंह (आर्या)

मार्गी जे-जे भूपति, आले करभार घेऊनी त्यांतें,
तद्राज्यीं स्थापुनियां, तो **बाजी** जाय उत्तराशेतें ॥४४॥ (४६)
संरोधी **जयसिंहा** जाउनिया **जयपुरास** तो बाजी,
पूर्वी ज्यानें केला होता हय-मेध या कलीमाजीं ॥४५॥ (४७)
तो **बाजी** त्यापाशीं हट्टानें पांच कोटि धन मागे,
**जयसिंह** तदा 'देतों तुज विप्रा दक्षिणा' असें सांगे ४६(४८)
'क्षत्रिय किंवा[3] ब्राह्मण, समजुनि दे पांच[4] कोटि धन मजला,
घ्याया मी योग्य' असें, **बाजीनें** कथियलें तदा त्याला ४७(४९)
द्रव्यावर तुलसीदल ठेवुनि, घालूनियां गजावर तें,
पाठविलें **बाजिकडे**, त्या **जयसिंहें**, भिऊन **बाजीतें** ४८ (५०)
**बाजीच्या** आज्ञेनें, निज पंडित **बाळकृष्ण**[5] नामा जो,
**जयसिंहें** त्यास दिला, कीं पुढतीं रण कधींहि ना माजो ४९(५१)

---

१ सत् = चांगला, दाट असा. लेप = उटी. या पद्यांत 'प्रभाते स्नातीनां' इत्यादि गंगालहरींतील पद्याच्या अर्थाची छटा आढळते. (मूळांतील म्हणजे पु. संस्कृत शिवकाव्यांतील ४५ वें पद्य मराठींत अनुवादिलें नाहीं. व ह्यासंबंधीचें स्पष्टीकरण प्रस्तावनेंत पहावें.) २ हें वाक्य कंसगत समजावें. ३ ही उक्ति बाजीरावाच्या तोंडीं येथे देण्यांत कवीनें त्यास विनाकारणच क्षमीपणा आणिला आहे. 'मला कोणीही मान, पण पैसा दे' असे शब्द बाजीरावानें उच्चारले असणें शक्य नाहीं. ('सह्याद्री' पहा). ४ इतिहासाशीं ताडून पाहतां ही अतिशयोक्ति दिसते. ५ या पंडितास पुढें रमण्यांत, ब्राह्मणांचा सत्कार करण्याच्या कामांत प्रमुख नेमण्यांत आलें आहे.

## ६. बाजीराव व निजाम

नंतर त्या **बाजीनें**, दक्षिण देशास येउनी, भूपा ।
भेटुनि दिधलें धन तें, गणवेना **शाहु**-तोष तैं मापा[१] ॥५०॥(५२)
**शाहूभूप** वदे तैं '**बाजानें** आज धन्य कुल केलें,
पुत्र असावा **बाजी**-सम, इतरा सूततें[२] नच भुकेले' ५१(५३,५४)
देतां **पुण्यास** वेढा यवनाधीशें **निजामउलमुल्खें**,
तत्पट्टण **औरंगाबाद**चि वेढीत[३] **बाजि** तैं हरिखें ५२ (५५,५६)
निजपट्टण रक्षाया, यवनानें सोडिलें **पुणें**-नगरा,
सर्पा[४] पय पाजुं नये, वर्मीं ताडूनि नाशिजेच गरा ॥५३॥ (५७)
तुंबळ रण झालें तैं, उभयांचे संगरांत भट लढती,
निर्दयता स्वीकारुनि, सक्रोधें झगडतां रणीं पडती ५४ (५७,५८)
तीक्ष्ण शरांनीं झालीं छिन्न शरीरें अनेक योधांचीं,
तदपिहि त्यांच्या चित्तीं भीति न वागे जराहि युद्धाची ५५ (५८)
प्रातःकालापासुनि सूर्यास्तावधि सुघोर रण झालें,
हिंदूंनीं यवनांचे शरघायें[५] शूरवीरही मथिले ॥५६॥ (५९)
सायंकाळीं झालें सर्वहि रज शांत; तेधवां भूमी।
आच्छादित शिरकमळीं होउनि शोभे तडागशी नामी[६] ५७ (६०)
यवनप तैं गजपृष्ठीं बैसुनि विस्मय-भरें समर पाहे,
तद्भट पळतां त्यांतें गमलें कीं 'नाश आपुला आहे' ५८ (६२)

---

१ मापा = (१) मापानें किंवा (२) तो तोष कोणासही गणवेना, वाचक हो, तो तुम्हीच कल्पनेनें मापा (मोजा) २ इतरा सूतनें = याहून अन्य प्रकारच्या पुत्रपणाला (इच्छुक नव्हते, अन्य प्रकारच्या पुत्रांची इच्छा केली नाहीं. सुन-मधील उ-कार छंदाकरतां दीर्घ केला आहे. ह्या वाक्यांत लोक हा कर्ता अध्याहृत आहे.) ३ वेढिता झाला. ४ **अर्थ**—सापाला दूध पाजूं नये, (मर्मीं–चे स्थानीं) वर्मीं योजिलें आहे. नाजूक भागावर प्रहार करून, त्याच्या विषाचा (गराचा) नाश करावा. ५ बाणांच्या प्रहारानें. ६ खाशी, उत्तम.

आधीं यवनें, नंतर **बाजीनें** तें पुरें समर केलें,
नंतर संतोषानें भेटुनि ते उभयता सखे झाले ॥५९॥ (६२–६४)

## ७. प्र० बाजीरावाच्या स्वामिनिष्ठेचा शाहूकृत गौरव (आर्या)

**सातान्यातें** गेला, **शाहूभूपास बाजि** भेटाया
तत्तेजातें वर्णित यवनहि गेला तदा निजा ठाया ॥६०॥ (६५)
भूप वदे '**बाजी**, त्वां लोकीं निज तेज आज गाजविलें,
म्लेंच्छ-जनां नचि केवळ, इहपरलोकद्वयास जिंकियलें' ६१ (६६)
**बाजी** बोले 'भूपा, हें फल तुमच्याच शंभुसेवेचें,
प्रभुपादाश्रय नसतां, बल नच चाले कदापि अनुगांचें ६२ (६७)
सत्कृति वा दुष्कृति वा आचरिली जी असेल भूपानें,
तत्सैन्यातें मिळतें, सुयश कुयश वा तशाच मापानें[१] ६३ (६८)
यावरुनी यश तुमचें उघडचि, होतो असा पहा अर्थ,
भूपा, या दासाचें, स्तवन कशाला करीतसा व्यर्थ ? ॥६४॥

(शार्दूलविक्रीडित)

झाली पुष्पलताच कीर्ति तुझिही लोकत्रयीं विस्तृता,
सत्कर्मावलि-मूलिका* भ[२]-कुसुमें येतीं हिला तत्त्वता ।
पुष्पें घेउनि भानु तीं प्रतिदिनीं, स्नाना करी सागरीं,
वाहे विष्णुपदीं, दिवा न दिसतीं, भूपा, नभा-भीतरीं[३] ६५ (६९)
घालोनी नभ-भाजनीं हिमकरें त्वत्कीर्तिरूपी सिना,
त्यागार्थी नव तेज-रूप दहना लावियलें तत्त्वता ।

---

१ प्रमाणानें. *पुण्यकर्में हेंच आहे मूळ जीचें अशी. मूलक-ची तृतीया मूलिका. २ नक्षत्रें हींच कोणी फुलें. ३ भीतरीं = आंत.

होतां पाक तिचा सुनिर्मळ असा आकाश-पात्रांतरीं,
तारा-[1]रूप असे हिमांशु मग तो त्याचे बतासे[2] करी' ६६(७०)

( आर्या )

ऐसें स्तवूनि गेला तो **बाजी** स्वा गृहीं निजानंदें,
त्याच्या सच्चातुर्यें **शाहूच्या** तोष मानसीं कोंदे ॥६७॥ (७१)

—९—

---

१ नक्षत्रें आहे रूप ज्यांचें असे, नक्षत्ररूपी. २ भावार्थ—हे शाहू राजा, चन्द्र हा हलवाई, आकाश ही कढई, तुझी कीर्ति ही साखर, तुझें तेज म्हणजे पराक्रम ही (पेटलेली) भट्टी, आकाश ही (बतासे पाडण्याची) परात व नक्षत्रें हे बत्तासे—अशा प्रकारचें रूपक येथें कवीनें केलें आहे.

# चमत्कार १०

## १. प्र० **बाजीराव व पुणें नगर** (वसंततिलका)

जो पुण्यशील सचिवेश वदान्य **बाजी**,
घेवोनियां नृपनिदेश मुदें[१] निघे जी।
**पुण्या**भिधा स्वनगरीं बुधवर्ग-युक्ता
झाला तिथें निज चमूसह शीघ्र जाता ॥१॥ (१)

जो मूर्तिमंत यमसा गमला रिपूशी,
राहूनि तो दिन कितीक तया स्थळाशी।
बोले 'करूं निजपुरी अमरावतीशी[२]'
घेती भले जनि[३]जनां सुखवावयाशी ॥२॥ (२)

आमंत्रितां[४] बुधजनां सुयशोऽनुगांनीं[४],
आले **पुण्यास** बुध ते सकळा दिशांनीं।
नाना-कला-निपुण ते निज-कर्मसक्त,
होवोनियां निवसती स्वसुखें **पुण्यांत** ॥३॥ (३)

पण्यांगना[५], विविध वादक, नाचणारे,
शिल्पी[६], वणिग्जन, तसे बहु झुंजणारे[७]।
येवोनि राहति सदा स्वसुखें **पुण्यांत**,
देई तयां सचिववर्य अपूर वित्त ॥४॥ (४)

---

१ आनंदानें. २ अमरावती = इंद्राची नगरी. ३ जनि = जन्म. ४ बोलाविले असतां (सत्कीर्तिरूपी नोकरांनीं विद्वानांस बोलाविलें असतां) ५ वेश्या. ६ कसबी लोक, कारागीर. ७ कुस्तीगीर, पैलवान; लढवय्ये.

येती जया द्विजवरां सकला सुविद्या
संतोषदा अपपरां[१] गमतात हृद्या ।
घेऊनि ते द्विज सदा गुरु* वेतनातें,*
आनंदयुक्त वसती अपुल्या सुखातें[२] ॥५॥ (५)

( शालिनी )

ज्याज्या देशीं चांगलें वस्तु जें जें,
**पुण्य**ग्रामीं तें असे **बाजि**[३]-तेजें ।
तत्संभोगा तेथले लोक घेती,
श्रेष्ठा[४]-संगें अल्पही श्रेष्ठ होती ॥६॥ (६)

ऐसा **बाजी** त्या **पुण्या**माजि नांदे
प्रीतीनें[५] जो सौख्य गोब्राह्मणां दे ।
आले नाना-देशिंचे विप्र त्यांनीं,
त्या **बाजी**तें प्रार्थिलें सद्वचांनीं ॥७॥ (७)

## २. श्रावणमास-दक्षिणा (इंद्रवज्रा)

' वर्षा-ऋतूच्या नभमासिं[६] पाहीं,
जो विप्रवर्गा बहु वित्त देई ।
सेनेश[७] तो ब्राह्मण-कल्पवृक्ष,
विच्छेदिला त्वां सकलां-समक्ष ॥८॥ (८)

---

१ स्वकीयांस व परकीयांस. २ सुखानें. (तृतीयेच्या अर्थी तें-प्रत्ययान्त रूपाचा उपयोग चिन्त्य आहे.) *श्रेष्ठ, पुष्कळ. *वेतन = वर्षासन. ३ बाजीरावाच्या पराक्रमामुळें; त्यानें पराक्रमानें पैदा करून आणल्यामुळें. ४ बाजीरावाबरोबर त्यानें आणिलेल्या वस्तूंचा इतरांसही लाभ झाला. यावरून हा सिद्धान्त काढिला आहे. ५ आनंदानें. ६ नभम् + मास = श्रावणमास. ७ सेनापति दाभाडे.

तत्तुल्य आहेस वदान्य* तूं-ही,
विप्रांस दे वित्त तसें अनां ही।
वीरोत्तमा भक्तिमता धनेशा,
विप्रांस नाहीं तुजवीण आशा' ॥९॥ (९)

( वसंततिलका )

बोले तदा सचिव तो सकळां द्विजांतें,
'सांगा चमूपति किती धन देतसे तें।'
'एकास पांच अथवा दश रौप्य-मुद्रा[१]
देई' असें कथियलें करुणा[२]-समुद्रा ॥१०॥ (१०,११)

( इंद्रवज्रा )

ह्यांमूनि बोले सचिवेश **बाजी**
'आतां गृहातें सुखरूप जा, जी।
मासीं नभाच्या सकळांहि यावें,
द्रव्यान्न-लाभें मन तोषवावें' ॥११॥ (१२)

( वसंततिलका )

ऐकूनि हें द्विज तदा सुमनें निघाले,
स्वा-स्वा गृहाप्रति मुदें सुखरूप गेले।
शिल्प्यांस शीघ्र सचिवें तर्यि बोलवीलें,
विप्राशनास[३] बरवें स्थल सिद्ध केलें ॥१२॥ (१३)

( शार्दूलविक्रीडित )

**पर्वत्याल्य** गिरीवरी रचियलीं विप्राशनाचीं[३] स्थळें,
केलीं पाकगृहें, तसींच इतरें रम्यें महामंदिरें।

---

१ रुपये. २ ब्राह्मणाचा उपकर्ता कृपासागर बाजीराव यास. ३ ब्राह्मणांच्या भोजनासाठीं. * दानशूर.

आले ब्राह्मण सर्वही दिशिंहुनी सम्यग्दिनीं[1] उत्सवें,
शास्त्री, पंडित, वैदिकादिहि तसे, अज्ञान[2]-ही त्यांसवें १३ (१४,१५,१७)

(आर्या)

बुध **बाळकृष्ण**[3]-नामा **जयसिंहा** जिंकुनीच आणिला जो,
त्यातें द्विज-संघावरि नेमियलें ज्यास देवगुरु* लाजो ॥१४॥ (१८)

(शार्दूलविक्रीडित)

कोणा शंभर, अर्ध शंभर कुणा, कोणा दहा वा सहा,
द्रव्याची तर्यि योग्यतेपरि अशी दे दक्षिणा तो पहा ।
श्रेष्ठांतें शिबिकेमधीं बसवुनी, नेवोनियां मंदिरीं,
पूजोनी, धनहेमरत्नमणि हीं अर्पीत तो आदरीं १५ (१९,२०)

(आर्या)

अवशिष्ट विप्र-वर्गा देई अल्पा सुदक्षिणा **बाजी**,
सुज्ञा-हातीं त्यांची वेदपरीक्षा करून सामाजीं[4] ॥१६॥ (२१)

(शार्दूलविक्रीडित)

**बाजी** हा कुणवी, तसे वृषभ ते मंत्री तयाचे बळी[5],
पृथ्वी ब्राह्मणपंक्ति ती, धनहि तें भासे सुबीजापरी ।
प्रत्यब्दीं[6]-हि दिनत्रयें सचिव[7] ती पेरी वृषांच्या[8] बळें,
येती तीप्रति तत्क्षणीं रुचिरशीं सत्कीर्तिरूपी फळें ॥१७॥ (२२)

---

१ उचित-,योग्य काळीं. २ हा बहुव्रीहि समास. अर्थ—न पढलेले, अज्ञ. ३ याचा उल्लेख सर्ग ९, पद्य ४९ मध्ये आला आहे. ४ समाजामध्यें. या शब्दाचा आद्य स्वर केवळ वृत्तसुखार्थ दीर्घ केलेला दिसतो. ५ बळकट. ६ प्रतिवर्षी. ७ प्रधान, बाजीराव. ८ इतर प्रधान व सरदाररूपी बैलांच्या साहाय्यानें. * बृहस्पति.

( आर्या )

आमरण व्रत ऐसें चालविलें अंतराय ज्या नाहीं
तैसेंच पुढें त्याच्या चालविलें पुत्रपौत्र यांनीं ही ॥१८॥

( इंद्रवज्रा )

धर्में[1] जसे वाजि[2]-मखा करोनी,
संतोषवीले द्विजवर्ग दानीं ।
तैशा प्रकारें द्विज एक लक्ष
तो तोषवी जो निज-धर्मदक्ष ॥१९॥ (२३)

( वसंततिलका )

जे ज्ञानहीन परि जे द्विज सूत्रधारी,
दे त्यांस पांच रुपये धन दुर्जनारी[3] ।
जे वैद्य, वा गणक[4], वा निज-वेदपाठी,
पन्नास त्यांस रुपये सचिवेश वाटी ॥२०॥ (२४)
नारी तसे पुरुषही निज भूषणांनीं,
होती[5] अलंकृत मुदें बसती[5] वहानीं ।
देखूनि विप्र-चय[6] तो मन तोषवाया,
जाती तदा सकल ही **रमणा** पहाया ॥२१॥ (२५)

## ३. पर्वती-वर्णन

नारी शिशूप्रति जिथें स्तनपान देती,
लीला अनेक परिच्या शिशुही करीती ।

---

१ युधिष्ठिर राजाने. २ अश्वमेध. ३ दुष्टांचा शत्रु, हें विशेषण येथ तितकें शोभत नाहीं. ४ ज्योतिषी. ५ या दोन्ही क्रियापदाचे कर्ते 'नारी तसे पुरुषही, सकलही' हे होत. ६ चय = समुदाय.

वंदावया शिवपदा जन सर्व जाती,
जिंकीतसे सुरपुरीसहि **पर्वती** ती ॥२२॥ (२६)
दानोदकें सुरभि[1] सूटत जे तयांतें,
तैं हुंगिती भ्रमर संभ्रमयुक्त चित्तें।
गुंजारवा भ्रमर, कोकिल हे करीती,
जिंकीतसे सुरपुरीसहि **पर्वती** ती ॥२३॥ (२७)
जी[2] वेष्टिली शुचिजलें, लहरी तयाच्या
त्यांनींच जो पवन वाहतसे सुखाचा।
तेणें जनां सुखद यच्छिबिरेंहि होतीं,
जिंकीतसे सुरपुरीसहि **पर्वती** ती ॥२४॥ (२८)
यानें[3] रथ-द्विरद-सच्छिबिकादि नाना,
सद्विप्र वेदपठणें करिती तनाना।
होई वधूचरणिंच्या ध्वनि नूपुरांचा ॥
ती **पर्वती** मद हरी सुरगोपुरांचा[4] ॥२५॥ (२९)
पीनोन्नतें कुचयुगें तरुणी स्त्रियांची,
हारावली[5] तदुपरी रमणीय साची।
वारांगना* नटति, नाचति, चारु[6] गाती
जिंकीतसे सुरपुरीसहि **पर्वती** ती ॥२६॥ (३०)
जी वेष्टिली सकल मांडलिकां नृपांनीं,
केली सदा सुखद जी नटनर्तकांनीं।
वंदी[7], वणिग्जनहि, सूत[7], जिथें रहाती,
जिंकीतसे सुरपुरीसहि **पर्वती** ती ॥२७॥ (३१)

---

१ हत्तीच्या गंडस्थलांतून वाहणारा मद. २ जी पर्वती. ३ रथ, हत्ती, चांगल्या पालख्या इत्यादि वाहनें. ४ सुर = देव त्यांच्या (नगरीचा) शोभिवंत दरवाजा, (देवनगरींचा) ५ मोत्यांचा हार. ६ उत्तम प्रकारें. ७ स्तुतिपाठकांचे वंदी, सूत, मागध, इ. प्रकार आहेत. * वार = समुदाय, अंगना = स्त्री. वेश्या.

रंभा[1] नगे पनस, दाडिम, पूग,[2] चूत[3],
माळूर[4] आणि विविधें सुफळें अनंत।
वैदूर्य-रत्न-नव मौक्तिक-हेम-पंक्ती,
जिंकीतसे सुरपुरीसहि **पर्वती** ती ॥२८॥ (३२)

आनंदकंद हरिच्या चरणीं जनांची,
सप्रेम-भक्ति-सुख तेथिल[5] मुक्ति याची।
त्या कौतुकास्तव जिथें सुर सर्व येती,
जिंकीतसे सुरपुरीसहि **पर्वती** ती ॥२९॥

जें वस्तुमात्र सृजिलें[6] जगिं पद्मभूनें[7],
तें पर्वतीवरि असें अवघें क्रमानें।
जी अर्जुनें निरखिली रणिं विश्वमूर्ती,
जिंकी[8] तिला, गमन, यापरि **पर्वती** ती ॥३०॥ (३५)

पाताळिंचे भुजगही तिथल्या सु-गानें,
होवोनि लुब्ध, वरि येति तदा सुखानें।
ते मानिती ‘निजपुरीसहि हे न कीर्ती,’
जिंकीतसे सुरपुरीसहि **पर्वती** ती ॥३१॥ (३४)

(शार्दूलविक्रीडित)

त्यां सेनापतितें जरी वधियलें केलें कमी न द्विजा,
त्यांतें तत्सम तूंहि तुष्ट करिशी, त्वत्साम्य ना ये दुजा।

---

१ रंभा = केळ. २ सुपारी. ३ आंबा. ४ नारळ. ५ अन्वय—मुक्ति तेथिल (पर्वतीवरील विष्णूच्या संबंधीं) सप्रेमभक्ति (व) सुख याची (याचना करी).—अर्थात् मोक्षाहूनही येथील विष्णूच्या भक्तीपासून मिळणारें सुख सरस होतें. ६ निर्मिलें ७ ब्रह्मदेवानें. ८ अन्वय—यापरि ती पर्वती तिला (विश्वमूर्तीला गीता. अ० ११) जिंकी असें गमन (वाटे).

ऐसें सर्वहि विप्र **बाजि**सचिवा आशीर्वचें बोलती,
प्रत्यन्हीं[1] निजकर्म सांग करुनी प्रेमोद्गमें डोलती ॥३२॥

(वसंततिलका)

नानाविधें सुवसनें विपुलें धनें हीं,
रत्नें तशीं धवल मौक्तिकभूषणेंही।
सोनें रुपें अगणित द्विज घेउनी ते,
झाले मुदें निज पुरा-प्रति शीघ्र जाते ॥३३॥ (३९)

(मंदाक्रांता)

ऐसा **बाजी** अनुदिन झटे लोक राजी कराया,
माहात्म्यांचें[2] जनन असतें सौख्य लोकांस द्याया।
**बाजी**वृक्षा सुगुणसुमनें[3] फार सौंदर्य आलें,
तत्सौरंभा[4] जन-मधुप हे तेथवां लुब्ध झाले ॥३४॥

### ४. बाजीराव-कृतीनें शाहू संतुष्ट (साकी)

विप्रमुखें हें वृत्त सकलही आयकिलें **शाहूनें**,
तेव्हां झाला तुष्ट मनीं तो **बाजीराय**-कृतीनें ॥३५॥
**शाहू** भूपा भेटाया जैं वदान्य **बाजी** गेला,
'प्रतिवर्षी तूं वृद्धि करीं हें' वदला भूप तयाला ॥३६॥ (३७)

### ५. चिमाजीआप्पा-वसईयुद्ध (वसंततिलका)

कित्येक विप्र वदती सचिवेश यातें,
'तूं विप्रपाळ असतां भय कां अम्हांतें ?।

---

१ प्रति + अहन् = प्रत्यह; प्रतिदिवशीं. या पद्यांतील रूपास संस्कृतांत स्थान नाहीं. २ महात्मा हा शब्द वृत्त साधण्यासाठीं मा-पूर्व केला आहे. ३ सुमनस् = फूल. सद्गुणरूपी फुलानें. ४ याचे स्थानीं शुद्ध रूप सौगन्ध्या किंवा सौरभ्या असें वृत्तदृष्ट्याहि योग्य होईल.

जो नीर[1]-दुर्ग, अभिधा **वसई** जयातें,
या, तेथचे यवन पीडिति कीं अम्हांते' ३७ (४०,४१)

(सवाई)

परिसुनि हें वच **बाजि** दयाकुल होउनि बोलत विप्रवरांतें,
'निजगृहिं जा तुम्हि शांतमनें' मग देत निदेश निजानुज यातें।
'यवन वधून करीं द्विजरक्षण, धन्य करीं कुल सोदर-राया[2],'
त्वरित **चिमाजि** निघे बल घेउनि बंधु-निदेश यथार्थ कराया ३८(४२)

(शिखरिणी)

चमूच्या पूर्वांगीं पदचर, तशी तोफ चमके,
जरीपट्का शोभे, रणकुशल बार्गीरहि निके।
जयांना शत्रूंचें भय नच गमे अल्प समरीं,
**चिमाजी** तो आला बलसह अशा[3] सागरतिरीं ॥३९॥ (४४)

(शालिनी)

पाहोनीयां दुर्ग तो अब्धिमाजीं,
चिंताग्नीनें पोळला तो **चिमाजी**।
बोले 'कैसे म्लेंच्छ हें संहरावे?
बंध्वाज्ञेतें सत्य केवीं करावें?' ॥४०॥ (४५)
चित्तीं बोले "तेज माझें पहाया,
मद्बंधूनें धाडिलें याच ठाया"।
जेव्हां त्याचा यत्न कांहीं न चाले,
तैं अब्धीतें[4] लीन होवोनि बोले ॥४१॥ (४६)

---

१ पाणकिल्ला २ हे बंधुराया (चिमाजी). ३ अशा बलासह. येथें बल अनेक रूप टेवल्यानें अशा हें सामान्यरूप समर्थित होत नाहीं. ४ समुद्रास, अप् = पाणी + धा = धारण करणें + (प्रत्यय) इ = अब्धि.

(रथोद्धता)

“ हे समुद्र भगवन् दयानिधे,
मार्ग शत्रुहनना मजलागि दे।
मा-पिता असति तूं, द्विजरक्षणा
दक्ष, यास्तव अशी तुज याचना ॥४२॥ (४८)
रक्ष तूं मज अकीर्ति-पासुनी,
रक्षिता तुज वदेन मी जनीं।
शैलसें मन नको प्रभो, करूं,
धीर मी तुजविना कसा धरूं? ॥४३॥ (४९, ५०)

(आर्या)

तूं मज होशील जरी साह्य तरी मी वधीन शत्रूंतें,
नातरि कृष्णमुखें मी कैसा भेटूं पुनः स्वबंधूंतें” ॥४४॥

(स्रग्धरा)

स्वप्नीं येवोनि रात्रीं जलनिधि वदला **बाजिराया**नुजा तो,
‘शत्रुस्थाना उद्यां घे, सकलहि जल मी तेधवां आवरीतो’ (५१)
प्रातःकाळीं उठोनी यवन-वसतितें ध्यावया दुर्जनारी,
जातां, त्यातें दिला हो पथ जलनिधिनें, दूर सारोनि वारी ४५ (५२)

(दिंडी)

युद्ध दारुण जाहलें उभयतांचें,
म्लेंच्छ वरिती तें दुःख दुर्यशाचें।
**चिमाजी**नें मर्दूनि निजारीतें,
स्थापियेलें **वसई**स भूसुरांतें[2] ॥४६॥ (५३)

---

१ मा = लक्ष्मी २ ब्राह्मण.

सागरातें उतरोनि सुनीकांनीं,
**चिमाजी** तो संतोष मनीं मानी।
स्वीय नगरीतें सैन्यसहित जाई,
**बाजिराया**ची भेटि तिथें घेई ॥४७॥ (५४)
बंधु येतां म्लेंच्छांस जिंकुनीया,
हर्ष झाला अत्यंत **बाजिराया**।
तदा त्यानें उत्साह थोर केला,
निजभ्राता आदरें तोषवीला ॥४८॥
तया **बाजी**चे पुत्र दोन शूर,
थोर **बाळाजी**, सान **रघुवीर**। (५६)
**सदाशिव** हा सुत असे **चिमाजी**चा,
कलीमध्यें अभिमन्यु[1] दुजा साचा ॥४९॥ (५७)

## ६. थोरले बाजीराव व कलिकपट

वागवूनी नयरीति मनामाजी,
विप्रपालन तो करीतसे **बाजी**।
दुष्ट कलिनें तयिं[2] कपट थोर केलें,
**बाजि**सन्निध वेश्येस पाठवीलें ॥५०॥ (५८,५९)
यवन-जातीची वधू कोमलांगी,
नाम **मस्तानी** असें जियेलागी।
गान, नर्तन, मृदु हावभाव यांहीं,
नेत्र-संकेतें **बाजि**-चित्त मोही ॥५१॥ (६०)
**बाजिराये**ही संग निशीं केला,
तदा निजला **समशेर** पुत्र झाला।

---

१ ही सदाशिवरावभाऊंस दिलेली तेजस्वी उपमा भाऊंचा पराक्रम व अंत पाहतां अत्यंत योग्य आहे. २ तेव्हां.

परी **बाजीचें** सुकृत त्या गेलें,
स्वीय चित्तीं कविराज तदा धाले ॥५२॥ (६१,६२)

### ७. मल्हारराव होळकर (शार्दूलविक्रीडित)

भूपाज्ञा मिळतां निघे सचिव तो म्लेंच्छां वधाया जवें,
**मल्हारी** पृतनेश[1] **होळकर** तो होता तयाच्या सवें।
तेव्हां **होळकरें** पुढें सरुनिया राजे बहू जिंकिले,
ज्या भूमीं करभार थोर दिधला त्यां तत्पदीं स्थापिलें ५३(६१,६२)

### ८. प्रधान थोरले बाजीराव यांचा मृत्यु (मंदाक्रांता)

**रेवा**[2]-तीरीं सचिववर तो पावला ज्या कुवेळीं,
आला तेव्हां ज्वर बहु तदां क्षीणता फार झाली।
साक्षात् होता सकल यवनां काळ जो त्यास काळें
नेलें; तेव्हां वदति जन त्या "हो तुझें तोंड काळें!" ५४(६३)

### ९. स्वामिनिष्ठ राणोजी शिंदे व त्याचा पराक्रम (शार्दूलवि०)

**राणोजी** हुजऱ्यास थोर पदवी त्या **बाजिरायें** दिली.
आतां तेंच कथीन वृत्त, वरवी वेळा असे पातली।
कोणी एक दिशीं प्रधानवर तो **शाहूस** भेटावया
**राणोजी**सह जाय भूपनिमवें एकांत साधावया[3] ॥५५॥ (६४)

**राणोजी** शिशु यास ठेवुनि तदा द्वाराचिया बाहिरी
गेला आपण एकटा सचिव तो **शाहूचिया** मंदिरीं।

---

१ (पृतना = सेना) सेनापति. २ नर्मदा. ३ एकांतांत भेट घेण्यासाठीं.

तेव्हां त्या सचिवास वेळ बहुसा संभाषणा लागला,
**राणोजी** तदुपानहा[1]-सह निजे झोंपेमुळें[2] भागला ॥५६॥ (६५)

**बाजी** बाहिर येउनी जंव बघे तों झोंप आली तया,
त्याच्या पासुनि पादुका पर-करें इच्छीतसे घ्यावया ।
तो झोंपेमधिंही परांस नच दे जोडा तया **बाजि**चा,
जागा होउनियां धन्यापुढति तो ठेवीतसे हातिंचा ५७(६६,६७)

तेव्हां त्या सचिवें नृपा कळवुनी सेना दिली तत्करीं,
**ग्वालहेरी** नगरी तयास दिधली प्रख्यात जी भूवरी ।
विश्वासूकपणा बघोनि बहु तो आनंदला अंतरीं,
तैंहूनी[3] जडली प्रधान-ममता **राणोजि शिंद्या**वरी ॥५८॥

( दिंडी )

**ज्योति[4]-लिंगाचा राणु** भक्तराय,
सचिव-संदेशें उत्तरेस जाय ।
देश जिंकोनी स्वयें उत्तरेचा,
नृपा त्यानें करभार दिला त्याचा ॥५९॥ (६८)

( शालिनी )

**राणोजी**नें नाशिला शत्रुगर्व,
द्रव्य-द्वारें रक्षिले दीन सर्व ।
स्वीयाचारें रक्षुनी न्यायरीती,
विस्तारीली **शाहु**ची चारु कीर्ती ॥६०॥ (६९)

---

१ उपानह = जोडा. २ **अन्वय**—भागला राणोजी झोंपेमुळें निजे = दमल्याने झोप येऊं लागल्यामुळें निजला (आडवा झाला). ३ तेव्हांपासून. ४ करवीराजवळील जोतिबा हें शिंदे घराण्याचें कुलदैवत.

## १०. महादजी शिंदे ( शार्दूलविक्रीडित )

**राणोजीस महादजी** तनय हा शूराग्रणी जाहला,
त्यानें स्वीय बळें मथूनि रिपुला तद्दर्प संहारिला।
निर्वैरी क्षिति सर्वही करुनिया, कामादिही[1] जिंकिलें,
**शाहूच्या** रुचिरा सुकीर्तिस, पहा, लोकांत विस्तारिलें६१ (७१,७२)

( मंदाक्रांता )

त्याच्या वंशीं न जनि पवला[1] शूर **माहादजी**सा,
होता तो या कलिमधि दुजा सव्य-साचीच[2] खासा।
प्राशी प्रेमें सतत जल तो शुद्ध भागीरथीचें,
राहो कोठें जवळ अथवा दूर; हें भाग्य ज्याचें ॥६२॥ (७३)

( भुजंगप्रयात )

जयाची सुधे-सारखी खड्गधारा,
अमर्त्यापरी[3] जी करी मर्त्य वीरां।
गमे खड्गधारा न, भागीरथी, ती
जिचा स्पर्श होतां दिवीं दुष्ट जाती ॥६३॥ (७३,७५)

( आर्या )

तत्पृष्ठीतें[4] नाहीं स्वप्नींही देखिलें तदारींनीं[5]।
तदुरस्थलींहि तैसा स्पर्श न केलाच अन्य नारींनीं[6] ६४ (७४)

---

१ काम, क्रोध इत्यादि मनांतील षड्रिपु. येथील क्रम उलट, अर्थात् चुकीचा आहे. **प्रथम मनांतील** शत्रु जिंकावे; तेव्हांच बाहेरचे जिंकण्यास मनुष्य समर्थ होतो. १ जनि पवला = जन्म पावला. २ अर्जुन. ३ अमर्त्य = देव. **तात्पर्य**— महादजीच्या **खड्गधारेनें** शत्रु मृत होऊन देवरूप धारण करून **स्वर्गांत** जात असे. म्हणून ती खड्गधारा धारा नसून गंगाच आहे असें येथें उत्प्रेक्षिलें आहे. ४ तत्पृष्ठ = त्याची पाठ. वर्तमान मराठीतल्याप्रमाणें येथेंही संस्कृतांतील नपुंसकलिंगी पृष्ठ शब्द स्त्रीलिंगी योजिला आहे. ५ तत् + अरि = तदरि, अर्थात् मुळांतील दा यांतील आकार चूक आहे. ६ या पद्यांत पुढील संस्कृत पद्याची छाया आहे. (पुढील पानावर)

( शार्दूलविक्रीडित )

अश्वारूढ **महादजीस** बघतां कांपे रिपूंचा फरा[१],
धाडी वासव[२] पारिजात-कुसुमें, यानें[३], तशा अप्सरा।
'हा दीना न वधील, शूर-निचया[४] मारील तेजें निजें,
जे होतील गतायु त्यांस सुरसें[५] सन्मानिलें पाहिजे' ६५(७६)

**वाजी**सादि[६] असंख्य घेउनि सवें तो विप्र[७]—चिंतामणी
घेई खड्ग करीं, हया-[८]वरि बसे, जेव्हां प्रवेशे रणीं।
योद्धे मंडल भेदितील म्हणुनी व्योमीं थरारे रवी,
सैन्यानें गुरु होतसे क्षिति, तदा भीतीसही शेष वी[९] ॥६६॥(७७)

## १०. महादजी-शिंदे-गुणप्रशंसा

युद्धीं अर्जुनसा, रिपूंस यमसा, गानांत गंधर्वसा,
बुद्धीनें गुरुसा, धनें धनदसा, दानीं असे कर्णसा।
पत्नीतें शिवसा[१०], जनां स्वगुरुसा[११], न्यायींहि जो धर्मसा[१२],
ऐसा योग्य **महादजी**, सकलही गाती तया राजसा ॥६७॥ (७८)

---

(टीप मागील पानावरून चालू)

सर्वदा सर्वदोऽसीति मिथ्यैव स्तूयसे जनैः।
नारयो लेभिरे पृष्ठं, न वक्षः परयोषितः॥

**अर्थ**—तूं नेहमीं वाटेल ती वस्तू देतोस, अशी तुझी स्तुती उगाचच केली जाते. कारण तुझ्या शत्रूंना तुझ्या पाठीचें दर्शन मिळालें नाहीं; व अन्य स्त्रियांना तुझ्या छातीचा स्पर्श मिळाला नाहीं.

१. जूट, फळी. २ इंद्र. ३ वाहनें, विमानें. ४ निचय=समुदाय. ५ देवांप्रमाणें. सुरसें असा सानुस्वार पाठ घेतल्यास (सु-रसें) अमृतानें असा अर्थ होईल. ६ सादिन्=घोडेस्वार. ७ ब्राह्मणास इष्ट वस्तु देणारा. ८ हय=घोडा. ९ जन्म देई (शेषालाही भीति प्राप्त होई). १० शंकराप्रमाणें. पत्नीचा सर्वांत मोठा आदर शंकराचेंच ठिकाणीं दिसून येतो. कारण त्यानें पार्वतीस आपल्या देहार्धातच स्थान दिलें आहे. ११ गुरु=वडील. १२ धर्मराज.

९ शिव.

( भुजंगप्रयात )

कला जाहल्या लुब्ध तत्सद्गुणांतें,
सदां सेविती लीन होवोनि त्यातें ।
गळां घातिली माळ संपत्तिनेंही,
विपत्तीहि कोपें रिघे शत्रुगेहीं ॥६८॥ (७९)

## ११. दौलतराव शिंदे ( शार्दूलविक्रीडित )

तत्पुत्रें अभिमन्युसें यश जगीं विस्तारिलें स्वा बळें,
सच्छीलें सुगुणें नयें जनकसें[१] सुज्ञीं जया वर्णिलें ।
स्वीयें तीक्ष्णशरें रणीं क्षत करी जो शत्रुवक्षावरी[२],
श्रीमान्दौलतराव तो भट असे विख्यात ह्या भूवरी ६९ (८०)

## १२. सर्जेराव घाटगे

तोफांनीं समरीं वधी रिपुदला जो* सद्व्रती[२] धर्मसा[३],

म्लेंच्छांचा निज बुद्धिनें[१] मद हरी, श्रेष्ठत्व दे दों कुळां,
श्रीमच्छंकर विल्वनूतनदळीं प्रेमें जिनें पूजिला ॥७१॥ (८२)
स्वाहा हीच जशी कृशानु[२]-महिषी, इंद्रा शची कामिनी,
अब्धीची तनुजाच विष्णु-वनिता[३], कृष्णा जशी रुक्मिणी।
तारा ही गुरुची, उमा जशि शिवा, रामास सीता जशी,
श्रीमद्दौलतनामराज-महिषी[४] ती बायजाख्या तशी ७२ (८३)

( इंद्रवज्रा )

भ्राता[५] तियेचा सुगुणी वदान्य,
ज्याच्या परी वीर नसेच अन्य।
विप्रा-वना तत्पर जो सदाही,
यत्कीर्ति गाती विबुधां जनांहीं ॥७३॥ (८४)

( वसंततिलका )

स्त्री बायजा, पतिहि दौलतराव शिंदा,
स्वप्नींहि जीं न करिती परलोकनिंदा।
हें ब्रह्म विश्व अवघें समजोनि चित्तीं,
स्वीकारिती उभयतां व्यवहाररीती ॥७४॥ (८८)

—१०—

---

१ राजकारणांतील चातुर्यानें. २ अग्नि-पत्नी = अग्नीची ज्वाला. ३ विष्णु-लक्ष्मी. ४ येथें मूळ शब्द महिणी असा पडला आहे. ५ भाऊ, जयसिंगराव (हिंदुराव).

# चमत्कार ११

## १. प्रधान बाळाजी बाजीराव (मंदाक्रांता)

गेला ऐसें[१] परिसुनि तदा **बाजि** तो मृत्युपंथें,
**बल्लालातें**[२] सचिव पदवी दीधली हिंदुनाथें।
ताताहूनी बहु झटतसे स्वामि-कार्यास वीर,
तो **बाजी**चा तनय सुगुणी वाटला योग्य फार ॥१॥ (१)

दीनां लोकां सुखद असला **शाहु** जो सार्वभौम,
क्षोणीपांच्या[३] मुकुटमणिची कांति पादीं निकाम[४]।
क्रीडे[५], त्यातें रुचिर वचनें, नम्रतेनें, नयानें,
सच्छांतीनें, स्वचतुरपणें तुष्ट केलें तयानें[६] ॥२॥ (२)

जैं काकाच्या[७] सुमति-तनुजा[८] घेउनी वीरवर्यें,
**बाळाजी**नें स्वरिपु मथुनी साधिलीं भूपकार्यें।
तेव्हां चिंता-रहित नृप तो जाहला, स्वप्रधाना
स्वीयें वाचें बहुत सुखवी देउनी थोर माना ॥३॥ (३)

विद्वन्मान्या स्वसचिवगुणां देखुनी **शाहु** राजा
मानी चित्तीं 'गुरुहुनिहि[९] हा रक्षिता मत्स्वराज्या।
कोणी नाहीं जगतितलिं या याजला शत्रु आतां,
मत्संदेशों अचरण[१०] करी लोक-संतार-हर्ता' ॥४॥ (४,५)

---

१ बाजीराव मृत्यु पावला असें ऐकून. २ बाळाजीस म्हणजे नानासाहेबास. ३ क्षोणी = पृथ्वी. ४ अत्यंत. ५ विलसे, चमके. ६ नानासाहेबानें. ७,८ चुलता चिमाजी आप्पा याचा कर्तबगार मुलगा सदाशिवराव भाऊ यास. ९ बाजीरावापेक्षांहि. १० शुद्ध शब्द—आचरण.

**बाळाजी**च्या विविध सुगुणां ऐकुनी ब्राह्मणांनीं
वेदाभ्यासीं स्वमति धरिली, युद्धशास्त्रीं भटांनीं।
अभ्यासील्या त्वरित सकला सत्कला तीव्र-धींनीं[1],
शोभूं लागे बहु गुणिजनीं हिंदुची राजधानी ॥ ५ ॥ (६)
तो **बाळाजी** अनुदिन झटे स्वप्रजा-रंजनातें,
**शाहूनें** हें समजुनि दिलें राज्यभारास त्यातें ।
तेव्हां **शाहू** भजत हरितें, सर्व चिंता त्यजून,
भावें पूजा करुनि सुमनें, तत्पदीं होय लीन ॥६॥ (७)
**साताऱ्यातें** सचिववर तो सोडुनी ये **पुण्यातें**,
स्वप्रासादीं स्वजनक-कृतीं[2] राहिला स्वस्थ चित्तें।
वज्री[3] जैसा, स्वजन-निचया[4] जाहला आतपत्र[5],
गोविप्रांचें सदवन[6] तसें तो करी **बाजिपुत्र** ॥७॥ (८)

(वसंततिलका)

विष्णूसमान नृप **शाहु** गमे जनांतें,
इंद्रापरी सचिव तो गमला तयांतें।
भासे तदा भरत खंडहि नाक[7]-सें हें,
तो लोक-संघ सुख-सागरिं नित्य पोहे ॥८॥ (९)

(उपजाति)

ती **पुण्य**-भूमी अमरावती[8]-सी,
करुनि **बाजी** सुर-लोक-वासी।
झाला. सुतानें, करण्यास केली[9],
ताताहुनी ती बहुरम्य केली ॥९॥ (१०)

---

१ कुशाग्र बुद्धीच्या लोकांनीं. २ आपल्या वडिलांनीं म्ह० थोरल्या बाजीरावानीं बांधलेल्या शनिवारवाड्यांत. ३ इंद्र. ४ समुदाय. ५ छत्री; आतप-उन्ह. ६ उत्तम रक्षण. ७ नाक = स्वर्ग. ८ इंद्राच्या नगरीसारखी. ९ क्रीडा, करमणूक.

## २. राजधानी-पुणें-वर्णन (पद)

('वैशाखमास वासंतिक समय शोभला' या चालीवर)

हिंदु तक्त पुण्यपुरी फार शोभलें। प्रेमभरें ज्यास सदा वर्णिती भले। धृ०
राजधनें तुष्ट तसे पुष्ट होउनी ॥
रत्नयुक्त हेमहार कंठिं घालुनी ॥
राजपुरुष बैसुनियां दिव्य वाहनीं ॥
राजरंगिं[1] हर्षभरें डुलत चालले ॥१॥ हिंदु०
जनावनीं[2] सचिववर्य होय जागता ॥
कोणासहि नव्हति तदां लव दरिद्रता ॥
धनधान्यें लोक सदां तृप्त तत्त्वतां ॥
स्वर्गसौख्य हिंदुजनां पूर्ण लाभलें ॥२॥ हिंदु०
रंभाफल, नारिकेल, पूगही, तसे ॥
उद्यानीं विलसति ते कल्पवृक्षसे ॥
क्रीडति सस्त्रीक तिथें लोक इंद्रसे ॥
भासे तज्जन्म खरें धन्य जाहलें ॥३॥
हिंदु-तक्त पुण्यपुरी फार शोभलें ॥ इ० ॥१०॥ (११, १२, १३)

(वसंततिलका)

सोमा[3] निशीं विकसि तो कुमुदेंच सारीं,
नाहीं दिनीं, नच परासहि, सौख्यकारी।
हिंदु-स्त्रियानन[4]-शशी जनलोचनाब्जा
रात्रंदिनींहि विकसी, उपमा नसे ज्या[5] ॥११॥ (१४)

---

१ शोभिवंत अशा राजसभेंत. २ लोकांच्या रक्षणाच्या कार्यांत.
३ सोम = चन्द्र. सोमा–चा आकार केवळ वृत्तसिद्धचर्थच आला आहे.
४ स्त्रीचें तोंड हाच कोणी चन्द्र. असा संधि मराठीस मान्य नाहीं.
५ ज्या मुखचन्द्राला.

(आर्या)

मूळ[1]-धनाहुनि होई, धनिकांतें द्विगुण लाभ त्या नगरीं,
वैदिक विप्रवरांतें, प्रतिवर्षी हेम मिळतसे भारी ॥१२॥ (१५)
वाटे सुर—नगरीतें जिंकाया [2]पद्म-जें असे केली
ती नगरी रमणीशी पतिसह नाना[3] करीतसे केली ॥१३॥ (१६)
इंद्रभयास्तव न मिळे निर्भय त्यां स्थळ, असे महागिरि ते
वस्त्रांच्या रूपानें वसते झाले पुण्यांत सुखचित्तें[4] ॥१४॥ (१७)
हेमरजत-मुद्रांनीं करिती विनिमय[5] समस्त जन तेथें,
कदशन, कुवस्त्र[6] नव्हतें ठावें कोणा; सदाहि सुख त्यातें १५ (१८)
धनसुतगृहदारांतें देखुनिया पांथ मोहती चित्तीं,
'ह्या नगरींत वसावें आपण' ही आस तेधवां धरिती १६ (१९)
लोकहि वदती 'भटजी, रहा चतुर्मास येथ शांत मनें,
पर्जन्यकाल जातां, स्वग्रामा मग सुखें करा गमनें*' १७ (२०)

(शार्दूलविक्रीडित)

देवांच्या ऋषिंच्या तसेंच पितरांच्याही ऋणापासुन[7]
झाले मुक्त समस्त लोक तिथले, चौथें नसे त्यां ऋण।
यज्ञानें पहिलें फिटे, ऋण पहा वेदें फिटे दूसरें,
सत्पुत्रें तिसरें पहा फिटतसे, चौथें धनानें सरे ॥१८॥ (२१)
सच्छाल्योदन भोजना, प्रियतमा कांता रतीचे परी,
आज्ञाधारक पुत्रही, धनद—शी[8] संपत्ति ज्यांचे घरीं।

---

१ मूलधन = मुद्दल. २ कमलांत जन्मलेल्या ब्रह्मदेवानें. ३ (१) नानापतिसह = नानासाहेबांबरोबर किंवा (२) नाना केली = विविध क्रीडा. ४ सुखी मनानें. ५ देवघेव. ६ गचाळ कपडा. *हें रूप गमन—चे स्थानीं वृत्तार्थ आलेलें दिसतें. ७ कर्जापासून. ८ धनं दयते (रक्षितो) सः धनदः = कुबेर, इंद्राचा खजिनदार.

गाई आणि[१] सदाहि दुभत्या, ऐसे गृहस्थाश्रमी,
तेथें नांदति, शंकरास पुजितां कोणी असेना श्रमी १९ (२२)

(वसंततिलका)

प्रासादरूप गिरिच्या शिखरावरोनी,
चंद्रानना नव वधू शरदावसानीं[२] ।
नेसून नूतन दुकूल[३], सुरांगनांतें
जिंकावयाच[४] फिरती, गमतें मनातें ॥२०॥ (२३)

(मंदाक्रांता)

कोणां कोणां त्रिदिव–नगरी वाटुनी सौख्यदाती,
तेथें गेले मख करुनि ते, त्यां न आली प्रतीती।
तेव्हां आले निजपुरिमधीं शीघ्र नक्षत्ररूपें,
पश्चात्तापें स्थिरमनहि[४] ते जाहले हो अपापें[५] ॥२१॥ (२४)

(वसंततिलका)

वाटे जनांस वडवाग्निचिया भयानें,
राहे तिथें शुचिजलें जलधी सुखानें । (२५)
देती यथेच्छ पय गौ महिषीहि जाणा,
आला गमे अनु जसाच पयोधिराणा[६] ॥२२॥ (२५,२६)

---

१ (१) आणि–चे स्थानीं 'वत्सयुता' अशीं कांहीं चार अक्षरें असावीं, किंवा (२) 'गाई आणि म्हशी' असाही पाठ संभवतो. २ शरद् ऋतूच्या शेवटीं दिवाळीच्या सुमारास. येथें शरद्-वरून शरदा असें आ–प्रत्ययान्त रूप धेतलें आहे. वस्तुतः 'शरदवसानी' असें पाहिजे. ३ रेशमी वस्त्र ४ 'जिंकावयास' असा मूळ पाठ असेल काय ? ४ स्थिर आहे मन ज्यांचें असे, पुण्यनगरीच स्वर्गाहून श्रेष्ठ असा मनाचा निश्चय होऊन. ५ सहजच. ६ अर्थ—(१) असें वाटे कीं समुद्राच्या मागोमाग (=अनु) सागरांचा राजा अर्थात् क्षीरसमुद्र आला. (२) पयोधिराणा म्हणजे समुद्रांत ऐश्वर्यांत झोंपणारा कृष्ण आला; कारण त्याला लागणारें विपुल दूध येथें गायीं-म्हशींकडून मिळत असे.

### ३. बाळाजी बाजीराव (आर्या)

प्रत्यब्दीं नभमासीं तो **बाळाजी** द्विजांस तुष्ट करी,
निजजनकाधिक तेव्हां त्यांतें दे द्रव्यदक्षिणा स्वकरीं २३(२७)
भूपासन्निध गेला साधाया तो प्रधान जन-कार्या,
शास्त्रविचारें तेथें साधी नय[१], मान्य होय जो आर्या २४ (२७)

### ४. छत्रपति-शाहू-राज्यपरिपालन (वसंततिलका)

भूपालसंघ-मुकुटावरचीं सुपुष्पें
त्यांचा सुगंधित पराग पडे अपापें ।
त्यानें सुरंजित पदद्वय होय ज्याचें,
तो **शाहु** भूप विबुधें[२] स्तविजे स्ववाचें २५ (२८)

(शार्दूलविक्रीडित)

**शाहू** राज्य करी, द्विजेंद्र करिती यज्ञादिका सत्क्रिया,
राजे ही जितशत्रु होउनि निजा लोकांस पाळावया ।
झाले तत्पर, राजभक्त जनही दिव्या सुखा भोगिती,
विप्रक्षत्रियवैश्यशूद्रहि तदा धर्में निजें वागती ॥२६॥ (२९)

(आर्या)

निजदानें कर्णासहि लाजविलें त्या नृपाल **शाहूनें**,
श्रीमद्दाशरथीसे मर्दियले दुष्ट वर्ग बाहूनें[३] ॥२७॥ (३०)
ज्याचे राज्यीं गद[४]-हि न टेविति निजचरणही कदा काळीं,
कैसें रिपुभय तेथें ! वर्षति घनही तिथें यथाकाळीं ॥२८॥ (३१)

---

१ राजकारणाचा मार्ग. २ विबुध=विद्वान किंवा देव. ३ भुजानें—हें साम्य बरोबर नाहीं. रामानें स्वदेहाच्या पराक्रमानें राक्षसास जिंकिलें; पण शाहू लढाईस गेल्याचें (राज्य परत मिळविण्यासाठीं केलेली लढाई सोडून) कधीही ऐकण्यांत नाहीं. ४ रोग.

(स्रग्धरा)

जिंकी तो शाहुराजा यवनरिपु, तशी दक्षिणाशाहि[1] तेजें,
विप्रांतें दक्षिणा दे, सुरतरु गमला त्यांस, हें फार साजे[2]।
देखोनी न्यायरीती सुजन सकलही ज्या सदा मान देती,
श्रीदुर्गेच्या प्रसादें सकलहि मनिंच्या[3] कामना पूर्ण होती २९ (३२)

(भुजंगप्रयात)

समुद्रांत किंवा बलीच्या[4] गृहीं जी
शशी-माजि वा स्वर्ग-लोकीं असे जी।
वसे कामिनींच्याहि बिंबाधरीं[5] जी,
तृणामाजि ही ती सुधा शाहुराज्यीं ॥३०॥ (३३)

मुखीं घेतलें जैं तृणातें रिपूंनीं,
तदां त्यागिलें मृत्युभीतीस त्यांनीं।
जयाचेनि[6] योगें असें जाहलें त्या,
सुधा कां न मानूं नये हो पहातां? ॥३१॥ (३३)

(शालिनी)

त्या शाहूनें एकचाळीस वर्षें। ऐसें केलें राज्य तें फार हर्षें,
नाहीं झाला त्या जसा भूप अन्य।होता जो या मृत्युलोकीं वदान्य ३२ (३६)

---

१ दक्षिण दिशा.. २ योग्य होतें. ३ मनांतील. ४ बलीचें घर=पाताळ. ५ तोंडल्याच्या रंगाच्या ओठाचे ठिकाणीं. या पद्यांतील कल्पना पुढील सुभाषितावरून घेतलेल्या दिसतात. अब्धौ विधौ वधुमुखे फणिनां निवासे, स्वर्गे सुधा वसति वै विबुधा वदन्ति। ६ 'ज्याचा योग' याची तृतीया 'ज्याच्या योगें किंवा ज्याचे योगें'-याचे स्थानीं ज्ञानेश्वरींत 'ज्याचेनि योगें' असा प्रयोग आढळतो; तोच येथें योजिला आहे. याचा अर्थ— ज्याच्यामुळें.

(उपजाती)

देखोनि त्याचा सुकृत–प्रभाव । तेथें कलीचा न चले कटाव[1],
निपुत्रिकत्वें[2] नरपाल मेला । तेणेंच चित्तीं कलि तुष्ट झाला ३३ (३५)

सत्सष्ट वर्षे भरतां वयातें । वार्धक्य आलें नृप-विग्रहातें[3],
पाचारुनी स्वीय सचीव सारे । वदे "वदा, सैन्य किती असे रे!" ३४
(३८,३९)

## ५. शाहूचें सैन्यादि बल

कोणी वदे "सप्त-सहस्र वाजी"। कोणी "दहा लक्ष सुवीर गाजी",
"तोफा सहा लक्षचि" कोणि बोले। प्रधानवर्या पुसिलें नृपालें ३५.
(४०,४१)

(शार्दूलविक्रीडित)

"येथें चार सहस्र वीर असती, तैसे पुण्यामाजिंही,
जे शत्रूस रणीं गतायु करिती ऐशी चमू माजि ही।
भो शाहो, कळली जरी मम भटां त्या युद्धवार्ता जरा,
तेव्हां ते निजखड्ग घेउनि करीं जाती वधाया परा" ३६(४२,४३)

## ६. प्र० बाळाजी बाजीराव सर्वाधिकारी

ऐकोनी सचिवेशवाक्य बहु तो शाहू मनीं तोषला[4],
त्यानें तैं निज राज्यभार अवघा त्याच्या शिरीं अर्पिला।
"हा पाळील तुम्हां" असें कथियलें स्वीय प्रजेला तदा,
वस्त्रें आणि धनें दिलीं सकळिकां, केल्या दुरी आपदा ३७(४४,४६)

---

१ कारस्थान, कारवाई. २ पुत्रहीन अशा स्थितींत. ३ विग्रह = शरीर. ४ संतुष्ट झाला. सचिव म्हणजे पेशवे नानासाहेब.

( वसंततिलका )

निष्काळजी तयिं असा नृप **शाहु** झाला,
कृष्णातटीं निज-वधूसह शीघ्र गेला।
तो भक्ति-युक्त मनसें तिजला पुजोनी,
लागे करूं स्तुति तिची पटु भाषणांनीं ॥३८॥ (४७)

### ७. कृष्णाष्टक ( शार्दूलविक्रीडित )

**कृष्णे** कृष्ण-तनूद्भवे शुचिजले मुक्तिप्रदे श्रीमति,
मातें तूं करिशील शुद्ध मजला, आहे अशी मन्मति।
केलें पाप अनंत मीं म्हणुनिया[1] आशा धरोनी तुझी,
आतां सोडविशी न तूं जरि, तरी पापापहा[2]-ख्या त्यजीं॥३९॥(४८)
पाप्याचे निटिलीं[3] शिवे[4], लिहितसे जी दुर्लिपी पद्मभू[5],
ती खोटी करिशी, स्तवास तुझिया कोणी नसे गे विभू।
नेशी भक्ति[6]-मतास मुक्ति[7]-निलया, त्वच्छक्ति ही निस्तुला,
भागे शेष तुझ्या स्तवा; अमति[8] मीं कैसें स्तवावें तुला? ४०(४९)
लोकां रंजवितो म्हणून वदती भूपास **राजा**[9] असें,
सर्वांतें सुखवी क्षपा-पात,[10] तया **चंद्रा**-भिधा-[11]ही दिसे।

---

१ **अन्वय**—म्हणुनिया तुझी आशा धरोनी मी अनंत पाप केलें. २ 'पापं अपहन्ति सा' पाप नाहींसें करणारी; या अर्थी पापापहा ही संज्ञा अथवा विशेषण. ३ कपाळावर. ४ हे हित करणाऱ्या कृष्णे. ५ कमलांत जन्मलेला ब्रह्मदेव. ६ भक्ति + मत् = भक्ति धारण करणारा, भक्त. ७ मोक्षाच्या ठिकाणीं, वैकुंठास. ८ शेषास हजार तोंडें असूनही तो थकतो; तर एक तोंडाचा मी तुला काय स्तवूं? शेषाच्या विरुद्ध टोंकास असले-ल्याचें वर्णन एकमुख एतदर्थक विशेषणानें करणें योग्य आहे. म्हणून येथें तत्स्थानीं अमति (अशिक्षित) हें विशेषण योग्य दिसत नाहीं. ९ राजा प्रकृतिरञ्जनात् (रघुवंश स.४). १० (क्षपा = रात्र.) चंद्र. ११ यांतील चन्द् धातूचा अर्थ 'आनंदित करणें' असा आहे.

तैसा सूर्य जगा प्रकाशित करी त्या **भानु**[1] ऐशा रिती,
तूं पापव्रज* नासिशी म्हणुनिया **पापापहा** बोलती ॥४१॥

मी कीनाश[2]-भया गणून न मनीं, लोकापवादासही,
आधारावर तूझिया, अचरिलीं पापें असंख्यात हीं ।
**श्रीकृष्णे**, सुर-वंदितांघ्रि-कमले, त्रैलोक्य-माते, अतां
मातें काल[3] जरी शिवे, तरि जगीं त्वत्कीर्ति होई वृथा ॥४२॥(५०)

जी गंगा जगतींत वामनपदापासून संवर्तली,[4]
ती दे स्वर्गहि मानवा, जर करी तो स्नान तीच्या जलीं ।
तूं साक्षात् हरिची तनूच असती, सांगे श्रुतीही[5] असें,
देशी विष्णुपणा नरास, नच हें आश्चर्य गे फारसें ॥४३॥ (५१)

तूंतें देवनदी-सहीत तुलणें ऐसें मनीं वाटलें,
देवांनीं सुरलोक भूतल अशा पात्रद्वया[6] निर्मिलें ।
त्या वेळीं गुरु तूंच, यास्तव वसे त्वत्पात्र[7] हें भूवरी,
स्वर्गंगा तुजहून फार हलकी गेली नभा-भीतरीं ॥४४॥ (५२)

**कृष्णे**, कृष्ण-जलापगे, नर करी स्नानास जो त्वज्जलीं,
वैकुंठाप्रति जाय तो बसुनिया दिव्या विमानावरी ।
गेले यज्ञतपां करूनि नर जे आदित्यलोकाप्रति,
ते, देखोनि तया नरां, निज-तपां,—यज्ञांस धिक्कारिती ४५ (५३)

जेव्हां ये गमनानुसार रवि तो कन्याख्य राशी-प्रति,
स्वर्गंगाहि तुझ्या समीप तयिं ये स्वस्थान सोडूनि ती ।

१ यांतील धातु भा, अर्थ 'प्रकाशणें.' २ कीनाश = यम. ३ (यमलोकीं शिक्षेसाठीं नेणारा) यम. ४ प्रवृत्त झाली, निघाली. ५ वेद; लोकवार्ता. ६ तराजूचीं दोन पारडीं. ७ तुला धारण करणारें पारडें किंवा त्यांतील तुझा प्रवाह. *व्रज = समुदाय.

जाती स्वीय मतें तिला शरण जे, त्यां उद्धरावें कसें ?
तीतें तो सदुपाय तूं शिकविसी, लोकांस भासे असें[1] ॥४६॥ (५४)
“ गा हो, नित्य तुम्ही प्रभात-समयीं हें शुद्ध **कृष्णाष्टक**
कृष्णा-स्नान परी[2] खचीत तुमच्या पापा असे नाशक ।
हें गातां सुख वाटतें बहु मनीं **श्रीवासुदेवास**[3], हो
श्री**कृष्णाष्टक** कष्ट-नष्ट-कर हें ! इष्टार्थ देईल हो ॥४७॥ (५६)

### ८. **छत्रपती शाहूचा मृत्यु** ( वसंततिलका )

ऐशी करीत असतां स्तुति त्या नदीची,
झांकीतसे नयन तो नृप, मोक्ष याची ।
तेव्हां तया बसवुनी रुचिरा विमानीं,
नेलें, दिवीं वसविण्या, सुरदूत यांनीं ॥४८॥ (५७,५८)

( हरिणी )

सकल रडती त्या **शाहूच्या** स्मरूनिच सद्गुणा,
विफल गमला सर्वांनाही निजासु तयाविना,
विकल[4] पडले, कोणी कोणा तदा समजाविना
मिति न करवे त्या शोकाची, थके कवि वर्णना ॥४९॥

( रथोद्धता )

[5]चंद्र-सप्त-रस-भूमि या शकीं, जाय **शाहु** सुर-लोकिं सत्य कीं,
मर्त्य-लोकिं निज कीर्ति ठेवुनी, वासुदेव-सुख[6] पावला क्षणीं ५०(६२)

---

१ **अर्थ**—कन्यागतीं भागीरथी तुला मिळते ती, मला वाटतें, अशासाठीं कीं तिचें सेवन करणाऱ्या लोकांस तिनें कसें उद्धरावें ही विद्या तुझ्याजवळ शिकावी. २ हें पद येथें निरर्थक दिसतें. ३ श्रीकृष्णास. येथें वासुदेव भास्कर भावे हें मराठी काव्य करणारा हेंहि सूचित होतें. ४ मूर्च्छित, बेभान. ५ शक १६७१ मार्ग व. ३ शुक्रवार (इ. १७४९ डिसें. १५) सकाळीं छ. शाहू शाहूनगरींत मृत्यु पावला. ६ वासुदेव म्हणजे कृष्ण अथवा विष्णु,

(पुढील पानावर)

( शार्दूलविक्रीडित )

माझ्या अल्प कृतीस सुज्ञ जनता पाहो, तयां तोष हो,
तच्चित्तीं उपजो स्वदेशममता, दुर्वासना नष्ट हो।
काळीं मेघ करो सुवृष्टि, सुखदा होवो जनां आर्यभू॥
सत्काव्यीं कवि बुद्धिची रति असो, हें देउ राम[१] प्रभू! ॥५१॥

—११—

## पूर्वार्ध समाप्त

---

(मागील पानावरून)
त्याच्या सान्निध्याचें सुख अर्थात् वैकुंठास. येथें कदाचित् विष्णूचा वाचक म्हणून व त्याबरोबर आपलें नांव काव्यांत गुंफण्यासाठींहि वासुदेव हा शब्द कवीनें योजिला असणें शक्य आहे. १ भावे कवीचें दैवत, चमत्कार १, पद्य १ पहा.

# श्रीशिवकाव्य

## उत्तरार्ध

## चमत्कार १२

### १. प्रास्ताविक वंदन (वसंततिलका)

**श्रीरंगनाथ**, निजभक्त-[1]मनोऽनुसारा
त्वत्पादपद्मरति[2] दे मजला उदारा[3]।
इच्छेनुरूप फळतो जरि कल्पवृक्ष,
तूं सर्वसौख्यद, तुझी न तयास साक्ष[4] ॥१॥* (१)

### २. प्रधान-बंधुत्रय

**बल्लाळ-राघव-सदाशिव**-नामधेयी[5],
[6]भ्राते धनंजय-[7]समा अतुलप्रभावी ।

---

१ आपल्या भक्ताच्या इच्छेनुरूप वागणारा (रंगनाथ). २ तुझ्या चरण-कमलाची भक्ति. ३ दानशूरा (देवा). ४ बरोबरी (?) * ह्या पद्यांत व्यतिरेक अलंकार साधला आहे. ५ हा पाठ सदोष आहे. नामधेयी—(व खालील 'प्रभावी') ह्यांतील इन् प्रत्यय निरर्थक आहे. कारण बहुव्रीहीनें काम भागत असल्यास तेथें कर्मधारय करून त्याला इन् प्रत्यय जोडणें ही गोष्ट वृथा पाल्हाळ करणारी म्हणून व्याकरणांत सदोष मानिली आहे. करितां येथें 'नामध्येय' असें घेतल्यास बरें. ६ भ्राता हा शब्द येथें सख्खा भाऊ ह्या अर्थी योजिला नसून 'भाऊ नि तत्सम' ह्या अर्थी घातला आहे. ७ 'धनंजयसम-प्रवर-प्रभाव' असा एखादा पाठ येथें कल्पिल्यास बरें. त्यामुळें धनंजयसमा—ह्यांतील असमर्थनीय असा अंत्य आ-कार हाही दोष राहणार नाहीं. धनंजय = अग्नि.

१० शिव.

संरक्षिती सकल भू नृप[१]-शासनानें,
[२]श्रीमाधवांघ्रिकमलार्पित-[२]सन्मनानें ॥२॥ (२)

(शालिनी)

**नाना दादा भाउ** ऐशा तिघांना,
संज्ञा होत्या लौकिकामाजि जाणा।
हिंदुस्थानीं हिंदुजातींत ऐशा,
सन्मानार्थी ह्याच संज्ञा बहुशा ॥३॥ (३)

सद्विद्येनें वा धनें मान्य जो कां,
त्यातें दादा, रावजी, भाउ, काका, ।
बापू, अण्णा, पंत, तात्या, व नाना,
संज्ञा ऐशा लोक देतात नाना ॥४॥ (४)

### ३. प्र० नानासाहेब यांचा राज्यकारभार (वसंतति०)

जो हिंदु[३]-भूप-कमलां रविसा सुखा दे,
**नानाख्य** तो सचिव-[४]वर्य **पुण्यां**त नांदे।
सेनापतित्व करिती रणशूर **दादा**[५],
जे पूजिती सतत शंभुपदारविंदा[६] ॥५॥ (५)
**भाऊ**[७] भजे मधु-रिपु-प्रति[८] भाग्यवंत
तो यौवराज-पद पावन **शाहुदत्त**।

१ छत्रपतींच्या आज्ञेनें. २ श्रीविष्णूच्या पदकमलाचे ठिकाणीं आसक्त व म्हणून प्रसन्न अशा मनानें. ३ सूर्य जसा कमलास तसा जो (नानासाहेब) छ० शाहूस सुख देत असे. ४ प्रधानश्रेष्ठ, पेशवा. ५ राघोबादादा. ६ शंकरपदकमलास. ७ सदाशिवराव भाऊ. ८ मधु नांवाच्या दैत्यास मारणाऱ्या विष्णूस.

कारुण्य-पूरित-मनें स्वजनावनाते[१],
संपादिती निजकुलत्वन दक्ष-चित्तें ॥६॥ (६)

(भुजंगप्रयात)

प्रजारक्षणीं दक्ष ते तीन बंधु,
शशी-[२]तुल्य मानूं, पुणें-गांव सिंधु,।
न वाढे कसा तो जनीं पुण्यवानीं[३],
[४]भुईकोट कां त्या करावा तयांनीं! ॥७॥ (७)

(स्रग्धरा)

दादांनीं जाउनीयां चमुसहित तदां जिंकिली उत्तराशा,[५]
कीर्ति स्थापूनि लोकीं अमित धन दिलें वेदवेत्त्यां द्विजेशां[६] (८)
ते दादा स्वप्रजेचें अभिमत[७] करुनी कल्पवृक्षत्व घेती,
प्रीति क्षत्रीयधर्मी धरुनि अवनिच्या रक्षणीं लक्ष देती ॥८॥ (९)

(शालिनी)

देवेंद्रांचे[८] अंश होते तिघे ते,
संरक्षाया दक्ष गोब्राह्मणांतें।
ऐसें चित्तीं आणुनी सा[९] ऋतूंनीं,
धर्मज्ञां त्यां सेविलें गौरवांनीं[१०]॥९॥ (११)

---

१ आपल्या प्रजेच्या रक्षणास. २ चंद्र. ३ चरणाचा अर्थ पुण्यवान् लोकांची भर पडल्यानें पुणें नगराची वाढ कां होणार नाहीं? ४ चरणाचा अर्थ—भुईकोट, नगराच्या वाढीला प्रतिबंध करणारा असल्यानें व नगर-रक्षणार्थ प्रधानादि समर्थ असल्यानें, घातला नाहीं. ५ आशा = दिशा. ६ ईश = श्रेष्ठ. ७ इच्छेची पूर्तता. ८ देवांतील श्रेष्ठ, अर्थात् अष्ट दिक्-पाल यांचे. ९ सहा. १० आदरपूर्वक स्व-कर्तव्यें करुन.

(साकी)

सन्नृपतीच्या योगें, आयुविना[१] धर्म तेधवां आले ।
द्वापारा[२]चे सर्वहि, कलिमार्जीही अपूर्वसें झालें ॥१०॥ (१०)

### ४. वसंतांतील उपवनाचें वर्णन (द्रुतविलंबित)

तरुवरां नव पल्लव शोभती,
भ्रमर पुष्पमधूस्तव[३] गुंजति ।
जनमनां सुखकारक जाहला,
प्रथम तो ऋतु माधव[४] पातला ॥११॥ (१२)

उपवनीं पवन[५]-स्तुतशा हयीं[६],
बसुनि जाय नृपाल सुखालयीं[७] ।
ऋतु सुखावह माधव[८] पाहिला,
नर-मणी[९] रमणी-सह राहिला ॥ १२॥ (१३)

बसुनि वेगवता तुरगावरी,
नगर[१०]-पालक जाय बरोबरी ।
कुसुम-युक्त अशा तरुची मजा[११]
कथित भूपतितें मधु-[१२]मास-जा ॥१३॥ (१४)

[१३]तरु-पलाश[१३] नवे बहु फूलले,
विरहि-मानसिं अग्निच भासले ।

---

१ दीर्घायुष्य तेवढें वगळून. २ तिसरें युग. ३ स्तव = मुळें. ४ वसंत ऋतु. ५ वाऱ्यानें स्तविलेल्या अशा, अर्थात् अत्यंत वेगवान्. ६ घोड्यावर. ७ (बागेंतील) सुखावह वाड्यामध्यें. ८ वसंत. ९ नरांत रत्नासारखा, नर-श्रेष्ठ, राजा. १० कोतवाल. ११ शोभा. १२ मधु = चैत्र महिना, त्यांत उत्पन्न झालेली. १३ पळसाचीं झाडें.

मनसि-जाग्नि-शिखा[१], सुमनें न तीं,
मनिं असें विरही जन मानिती ॥१४॥ (१५)

( दिंडी )

आम्र-[२]पुष्पांचे करुनि तीव्र बाण,
विरहि तरुणांचें हृदय विदारून।
मांस पळसाच्या ठेवुनियां वृक्षीं,
मौज वाटे कीं काय ? मदन लक्षी[३] ॥१५॥ (१६)

गंधयुक्ता मंजिरी [४]**रसालाची,**
तीव्र करवतशी भासतसे साची।
मदन कापितसे विरहि-हृदय-काष्ठ[५],
म्हणुनि विरही जन त्यास वदति दाष्ट[६] ॥१६॥(१७)

नृपा, फिरती हे भृंग-वृंद साचें,
रूप रिपुच्या अपकीर्ति-मंडलाचें[७]।
तुवां युद्धीं शत्रूंस मर्दियेलें,
स्थान दुसरें हें मागण्यास आले ॥१७॥ (१८)

त्यजुनि विरहाग्नीमाजि अंगनांतें,
निघाले जे आग्रहें प्रवासातें।
त्यास मदनानें भ्रमरपंक्तिरूपा
असे बेडी ही निर्मियली भूपा, ॥१८॥ (१९)

---

१ मदन हाच अग्नि त्याच्या ज्वाला. २ पुष्प = मोहोर. ३ अन्वय— मास ठेवुनियां, (मदनास) मौज वाटे कीं काय (म्हणून) मदन लक्षी. ४ आंब्याच्या झाडाची. ५ काष्ठ = वाळलेलें लांकूड. ६ कठोर मनाचा. ७ कवीच्या मतें अपकीर्ति काळी म्हणून (काळ्या) भुंग्यांवर अपकीर्तीचें रूपक.

नव्हत भोंगे हे फुल्ल-पंकज-स्थ[१],
नृपा, गमती मज मदनबाण सत्य ।
अधोवदनीं हे कमल-तूणिरांत[२],
ऊर्ध्व-पुंखी[३] जणुं राहिले नितान्त ॥१९॥ (२०)

विरहि-हृदयातें विद्ध[४] करायाची,
शिके विद्या कीं काय मदन साची ! ।
पुष्प **बकुलीचें** सूक्ष्म लक्ष्य[५] केलें,
भ्रमररूपी शर त्यांत सोडियेले ॥२०॥ (२१)

नव्हे भूपा, हें सुमन **चंपकाचें**[६],
कनक-सिंहासन मदन-भूपतीचें ।
तिथें वसती नच मधुप[७]दास पाहे,
क्षुद्र जाती परि जपति लौकिका हे ! ॥२१॥ (२२)

सार्थ-नामा नच वृक्ष **अशोकाचा**,
भेद करितो हा पथिक[८]-मानसाचा ।
म्हणुनि केलें फल-पुष्प-हीन[९] यातें,
'परां देतां ये दुःख आपणांते' ॥२२॥ (२३)

**जपा**-पुष्पें[१०] हीं भानुकिरण मानूं,
भयें राहूच्या गुप्त टेवि भानू ।
परी राहू हा भ्रमर-मिषें[११] त्यांस,
पहा भूपा, किति झटे ग्रासण्यास ॥२३॥ (२४)

---

१ फुललेल्या कमळांत असणारे. २ कमलरूपी भात्यांत. ३ वर पिसारा असलेले. ४ छिन्न भिन्न. ५ निशाण, वेध करावयाचें स्थान. ६ सोनचांफा. ७ भृंगे हेच सेवक. ८ वाटसरू. ९ अशोक वृक्षास फुलांचे व हिरव्या फळांचे घोस असतात. पण ते निरुपयोगी, म्हणून पुष्पफलहिन गणले ? १० जास्वंदीचीं फुलें. ११ भ्रमररूपानें.

स्वीयदेहावधि[1] देइ फळें पानें
घनच्छायेनें ताप ल्यातें ने ।
सदा सुखदा ही सकलजनां **रंभा**[2],
तुच्छ वाटे इजपुढें इंद्र-रंभा[3] ॥ २४॥ (२५)

(वसंततिलका)

आहेत हीं बहु फळें न तयास मान,
निःशंक **आम्रफळ** हें अमृतासमान ।
घालूनि साखर रसासह भक्षियेली,
गोडी सुधेपरिस[4] दे [5]रसनेस पोळी ॥२५॥ (२६)

(शार्दूलविक्रीडित)

वर्णें केशरसा नवा रस असा सच्छर्कराऽभ्यंतरीं[6],
सारंगाक्षि-कृता[7] पुऱ्या घृत-युता ज्या पूर्णचंद्रापरी ।
जो भक्षी, बहु विप्र वैदिक भले पंक्तीस आमंत्रुनी,
लोकीं धन्य नृपा, खरा मनुज तो, वाटे असे मन्मनीं २६ (२७)

मोटे साधु जसे तसे मम मना हे **इक्षु**[8] कीं भासती,
लोकांनीं चरकीं जरी धरियले जे सद्रसाते विती । (२८)
'अन्यायाविण आपणास जन हे देतात दुःखें अती,'
तूं आहेस समीप, यास्तव नृपा, रक्षार्थ आक्रंदती ॥२७॥ (२९)

---

१ आपला देह उभा असेपर्यंत. २ केळीचें झाड. ३ रंभा = अप्सरा. ४ अमृतापेक्षां. ५ जीभ. ६ (आंत = ) अभ्यंतरीं हृद्याशीं मागील शब्दाचा संधी समास नसतां केला आहे. हें व्याकरणविरुद्ध आहे. ७ सारंग = हरिण, अक्षि = डोळा; सारंगाक्षी = सुंदर स्त्री, तिनें केलेल्या. ८ ऊस.

मध्यें स्थूल शरीर पांडु[१] दिसतें, अन्यस्थलीं क्षाम[२] ती,
त्यक्तालंकरणा[३] प्रखिन्नवदना[४] प्रोत्फुल्लचक्षुष्मती[५] ।
पीनो[६]त्तुंग-कुचाग्र भृंग-सम हे कैसे पहा, शोभती
ऐशी ही [७]प्रसवोन्मुखी नववधू पूग[८]-द्रुमांची तती[९] २८ (३०)

( द्रुतविलंबित )

नर[१०]-शिराकृतिशीं गुरु[११] ज्या फळें,
बहुत उंच असे तरु शोभले ।
नृपति गाधि[१२]-सुतें नव[१३] **नारळी**,
मनुजशी नव-सृष्टि च निर्मिली ॥२९॥ (३१)

( शार्दूलविक्रीडित )

पुष्पें आणि फलें दलेंहि बरवीं येती जया पाद-पा,[१४]
त्यांच्याहूनहि धन्य वृक्ष **सुरुचे** हे भासती सत्नृपा,[१५] ।
सैन्यामाजिं जसे करी[१६] विलसती कीं चंद्र तारांगणीं,[१७]
जे शोभा अतुला यया[१८] उपवना देतात अन्याहुनी ३० (३२)

( भुजंगप्रयात )

फुलें ना फळें ना नसे ज्यास छाया,
अशा या **सुरूंचें** गमे जन्म वायां ।

---

१ भिकट. २ बारीक, कृश. ३ दागिने न घातलेली. ४ तोंड उतरलेली. ५ विकसित नेत्रांनीं युक्त. ६ पुष्ट व उंच अशा स्तनांचें अग्र. ७ बाळंत होण्याच्या बेतांत असलेली. ८ सुपारीच्या झाडांची. ९ रांग, ओळ. १० मनुष्याच्या डोक्याच्या आकाराचीं. ११ मोठीं. १२ विश्वामित्रानें. १३ अद्भुत. १४ झाडांस. १५ जाणत्या राजा. १६ हत्ती. १७ तारा-गण = नक्षत्रांचा समुदाय, अर्थात् येथील अनुस्वार आगंतुक आहे. १८ यया = ह्या.

न दे भानु-तप्तां[1] जनां सौख्य जी ती,
न शोभा म्हणावी, गणावी फजीती ॥३१॥ (३४)

(वसंततिलका)

शत्रुक्षयार्थ धरितो करिं नंदकातें[2],
देतो अगाध सुख जो निज सेवकांते ।
तो विष्णु **पिप्पल**[3]-तरूंत वसे म्हणूनी,
पूजार्ह[4] होय तरु हा सकलां जनांनीं ॥३२॥ (३७)

जो नित्य पूजन करी नर पिप्पलाचें,
प्रापंचिकार्थ[5] अवघे पुरती तयाचे।
होते निरामय[6] तनू झणिं, जाय आधीं[7],
येते सुपंडितसमा विमला सुबुद्धि ॥ ३३॥

(भुजंगप्रयात)

सुगंधी दिशा सर्वही जें करीतें,
निजा[8] वायुनें चित्त-तापा हरीतें ।
जनांतें सदां फार संतोष देतें,
पहा या अशा **तूळशीच्या** बनातें ॥३४॥ (३८)

(आर्या)

आ-मूळ[9]-गंधयुक्ता, ऐशी ही **दमन**[10]-पंक्ति बघ राया,
अवतरली वाटे कीं, भूमीचा सर्व सौरभ[11] हराया[12] ३५ (३९)

---

१ सूर्य-किरणांनीं तप्त. २ नंदक = विष्णूची तरवार. ३ पिप्पल = पिंपळ. ४ पूजेस योग्य. ५ संसारी मनुष्याच्या अपेक्षा. ६ आमय = रोग. ७ काळजी. ८ आपल्या; निज–चें सामान्यरूप. ९ मुळापासून, अर्थात् सर्व अवयवांनीं सुवासिक. १० दमनक = दवणा. ११ सुगंध. १२ तात्पर्य—भूमींतील सर्वच सुवास आपणामध्यें ओढून घेण्याकरतांच कीं काय हा दवणा उगवला आहे. कारण ह्याचे मुळापासूनच सर्वांग सुवासिक आहे.

ब्रह्माण्डोत्पत्तीची विद्या शिकतां **कपित्थ**[१]-फळ केलें ।
पूर्वी परमेष्ठीनें[२] यास्तव वर्तूल[३] हें नृपा, झालें ॥३६॥ (४०)
देतिल मधुर फलास्तव [४]**बदरीला** दुःख लोक म्हणुनि विधी ।
तीतें कंटक[५]-युक्ता, करि परि सोडील दैव[६] काय कधीं ? ३७(४१)
गंध मनोरम, तैसें पुष्पहि सुंदर दिसे **गुलाबाचें** ।
सकलां सुमनांमध्यें मजला श्रेष्ठत्व मानलें याचें ॥३८॥ (४२)
ऋतु मुख्य वसंत तसा, फलांमधें श्रेष्ठ आम्रफल जेंवी ।
तारागणांत हिमकर[७] लाक्षिकसुम[८] हे सुमांमधें तेंवी ॥३९॥ (४३)

( द्रुतविलंबित )

न तरु लाक्षिक हा मदनें भला ।
जितुनि सर्व जगा ध्वज रोंविला ।
जणुं मदांध असा फिरतो करी,
न तरि पुष्प-चतुष्पद-केसरी[९] ॥४०॥ (४५)
शमवितो गुलकंद महातपा[१०],
मधुर तज्जल[११] देत सुखा नृपा ।
रुचिर[१२]-कांति तसा बहुगंध ही,
परिमलें सुखवी सकला मही[१३] ॥४१॥ (४६)
सुकविंनीं कवनीय[१४] गुलाब हा,
टवटवीत कसा फुलला पहा ।

---

१ कवठ. २ ब्रह्मदेवानें. ३ वाटोळें. (ब्रह्मांड = जग, हें वाटोळें मानण्यांत येतें.) ४ बोरीच्या झाडाला. ५ कंटक = कांटा. ६ (येथें) प्रतिकूल दैव. ७ चंद्र. हिम = थंड, कर = किरण. ८ लाक्षिक = गुलाबाचें; (पु. सं. तील टीकेप्रमाणें) सुम = फूल. ९ फुलें हींच कोणी पशू त्यांतील सिंह, अर्थात् श्रेष्ठ फूल. १० आतप = उष्णता. ११ गुलाबपाणी. १२ सुंदर वर्णाचा. १३ पृथ्वी ( = तीवरील लोक). १४ काव्यांत वर्णनास योग्य.

अजवरी कविंनीं स्तविलें न या,
धिगिति[१] त्यांस वदूं[१], त्यजिलें नया[२] ॥४२॥ (४६)

जशी स्त्री रजस्का[३] तशी **मल्लिका**[३] ही
असे फुल्लपुष्पा, नसे न्यून कांहीं।
जसे लुब्ध व्हावें रजस्केस कामी,
तसें हीस भोंगे, असें मानितों मी ॥४३॥ (४७)

वधूचे जसे ओष्ठ आरक्त तैशी
दिसे पालवी मल्लिकेचीहि ऐशी।
वधू संगमाकारणें कंटकांगी[४],
तशी मल्लिका जाहलीसे नतांगी[५] ॥४४॥ (४७)

( स्रग्धरा )

वृक्षाच्या आश्रयानें बहु वर चढली मालतीची लता ही,
वाटे भर्त्याश्रयें[६] ही चढत वधु दिवीं[७] संस्तुता[८] जी सतांहीं[९]।
साध्वी स्त्री कामुकांच्या[१०] कुटिलतर[११] वचा नायके, कण[१२]काढी,
तैशी ही भृंगगुंजारव न परिसतां, स्वीय[१३] पर्णास झाडी[१३] ४५ (४८)

नारीच्या हास्य-शीं[१४] ही धवलित[१५] सुमनें शोभती **मालतीला**,
मुग्धा[१६]-पादारविंदा-परि मृदुल मुळें, भार[१७] पुष्पांस आला।

---

१ 'त्यांस धिक्कार!' असें आम्ही म्हणूं. २ नय = न्याय, योग्य रीत. ३ तरुणी; मोगरीचा वेल. ४ कांटयांनीं किंवा रोमांचांनीं युक्त. ५ वांकले आहेत अवयव जीचे अशी. ७ भर्त्याच्या आश्रयानें. ७ आकाशांत किंवा स्वर्गांत. ८ स्तविलेली. ९ सत् = साधू, त्यांनीं. १० कामुक = चटोर लोक. ११ बीभत्स. १२ कान (लक्ष) देत नाहीं. १३ पानें हालवून संपर्काचा दोष झाडून टाकिते. १४ शीं = अशीं, सारखीं. १५ शुभ्र, पांढरी. १६ मुग्धा = तरणी. तिच्या पदकमलासारखी. १७ बहर.

त्यायोगें भासती ही पृथुल[१]-तर-कुचा सन्नितंबा[२] वधूशी,[३]
गंधाढ्या[४] फुल्लपुष्पा खचित उपवनीं अन्य वेली न ऐशी ४६ (४९)

( शार्दूलविक्रीडित )

भृंगांचा समुदाय संथ बसला, तेणें निळी जी दिसे,
ही भर्तृप्रियकारिणी कमलिनी[५] राजांगने-शी[६] असे ।
पुष्पें शुभ्र हिचीं बघून गमतें हें चांदणें मन्मना,
भूपा, ही **शतपत्रिका** बहुत दे शोभा त्वदीया वना[७] ॥४७॥ (५०)

लोकांतःकरणें हरूनि सुख दे स्वीयें सुगंधें, मना
वारंवार गमे, चलें[८] निज-दलें पाचारि[९] पांथां जना ।
मुग्धा[१०] वार-वधू[११] जशी युवजनीं तैशी द्विरेफावृता[१२],
आहे पुष्पवती[१३] स्मितानत[१४]-मुखी ही **मालती**ची लता ४८(५१)

( शिखरिणी )

नृपा, ही **दाडिंबी**[१५] कृश-तनु परी विस्तृत-फला,
फलातें सेवाया परभृत[१६] पहा गात बसला । (५७)
तरू हे **आम्रा**चे निज-फल-भरें पुष्प-निचयें,[१७]
जणों पांथस्थाचें सहज करिती स्वागत अये[१८] ४९ (५८)

---

१ फार पुष्ट (स्तनांनीं युक्त.). २ सत् = चांगला, पुष्ट; असा कमरेच्या खालचा भाग. ३ चरण तीन-मधील विशेषणें समर्थित नाहींत. ४सुवासानें दरवळणारी. ५ कमलाची वेल. ६ अंगना = स्त्री. ७ वन = उपवन, = बाग. ८ हलणाऱ्या. ९ बोलाविते. १० सुंदर. ११ समुदायाची स्त्री, वेश्या. १२ द्वि = दोन, रेफ = र-कार, द्विरेफ = भ्रमर (भुंगा), आवृत = व्यापलेली. १३ वयांत आलेली तरुणी. १४ हंसणारें व नम्र आहे मुख जीचें. १५ डाळिंबीचें झाड. १६ कोकिल. १७ निचय = समुदाय. १८ संबोधक अव्यय.

(दिंडी)

पक्व[1]-समयीं आम्रादि फळें सारीं,
सकळ लोकां रुचि देति जरी भारी।
प्रथमपासुनि माधुर्य ज्यांत राहे,
असें **द्राक्षाफल** धन्य भासतें हें ॥५०॥ (५९)

### ५. उपवनविहार (मालिनी)

बघुनि अतुळ शोभा या-परी त्या वनाची,
स्थिति वश मदनाला भूपतीच्या मनाची।
प्रखर रवि-[2]करांहीं दुर्गमा[2] सांद्र[3]-कुंजीं,
युव-युवति-समाजीं तो रमे भूप गाजी[4] ॥५१॥ (६०)

निजनिज युवतीशीं क्रीडती भाग्यशाली,
[5]मनसि-ज-शर-विद्धें तन्मनें सर्व झालीं।
सकळ[6]-शशि-मुखी त्या कामिनी चारु-गात्री[7],
भ्रमर-कच[8]-कलापा सुस्तनी पद्म-नेत्री ॥५२॥ (६१)

सुरगुरु[9]-सम वक्ता भूप **बाळाजि-राया**
शमन[10] मनसिजाचें सिद्ध झाला कराया।
वचन वधुजनांशीं बोलला, ऐकतां जें,
तनुवरति उठावे मार[11]-रोमांच ताजे ॥५३॥ (६२)

---

१ पक्व होतात तेव्हां. अशा अर्थी पाकसमयीं हें रूप योग्य झालें असतें. २ सूर्यकिरणांना जेथें प्रवेश मिळत नाहीं असे. ३ पालवीनें भरघोस अशा लतागृहांत. ४ वैभवशाली, धर्मवीर. ५ मदनाच्या बाणांनीं घायाळ. ६ संपूर्ण चंद्राप्रमाणें प्रफुल्लित तोंडाच्या. ७ सुंदर अवयवाच्या. ८ भुंग्याप्रमाणें (काळा) आहे केशाचा समुदाय ज्यांचा. ९ देवांचा गुरु = बृहस्पती. १० शांती, पूर्तता. ११ शृंगाररसामुळें उठलेले रोमांच.

(उपेंद्रवज्रा)

लक्ष्मी निघाली जलधी-मथून,
तत्साम्य खासें, लवही उणें न ।
काम[1]-प्रसू ती कमला[2] हरीची[3],
ह्या काम[4]-सू, ही उपमा[5] न नीची[6] ॥५४॥ (८९)

(वसंततिलका)

लीला जलीं करुनि या परिची अनंत,
नेसे नवीं सु-वसनें युवती-सहीत ।
अश्वावरी पुरुष, आणि मनुष्य[7]-यानीं,
नारी, असा स्वनगराप्रति जाय मानी ॥५५॥ (९०,९१)

६. प्र० नानासाहेबः राज्यकारभाराचें सुयश (भुजंगप्रयात)

शिव-प्रसादें सकलाहि आशा
झाल्या पुऱ्या, त्या नव्हती दुराशा[8] ।
स्वीय प्रजा ठेवितसे खुशाल,
वाटे परा सत्यचि कालकाल[9] ॥५६॥ (९२)

—१२—

---

१ मदनास प्रसवणारी. २ लक्ष्मी. ३ विष्णूची. ४ शृंगाररस उत्पन्न करणाऱ्या. ५ नळ्यांतून स्त्रिया वर निघत असतांना. ह्या पद्यांत त्यांस लक्ष्मीची उपमा देण्यांत आली आहे. ६ हीन, उणी, अयोग्य. ७ मेणे, पालख्या, इत्यादि वाहनांत. ८ दुसऱ्याचें अनिष्ट चिंतणाऱ्या किंवा अपूर्ण इच्छा. ९ यमाचाही यम, अर्थात् अत्यंत बलाढ्य.

# चमत्कार १३

## १. पुणें-वर्णन : वर्षाऋतु ( शालिनी )

[१]सांद्रच्छाया त्या पुण्याची अगाधा,
ग्रीष्माची ही होइना त्यास बाधा ।
जो शत्रूंना ग्रीष्म दे ताप[२] भारी,
तो भूपा दे तोष सर्व प्रकारीं ॥१॥ (१)

इंद्राज्ञेनें मेघ वर्षे सुकालीं,
संगोत्कंठा[३] बर्हि-माला[४] जहाली ।
सद्वृष्टीनें फार आनंदले तैं,
केका-शब्दें नाचती मोर थै-थैं ॥२॥ (३,५)

झंझावारे आणि विद्युद्विलास[५],
देती प्रेमें साह्य कादंबिनीस[६] ।
पर्जन्याच्या थोर धारा सरारा,
उत्खाताया[७] येति भूदेश सारा ॥३॥ (५)

विप्रांनीं जे स्वीय धर्मानुसार
केले होते यज्ञ पूर्वी अपार ।
तद्भोक्ता जो इंद्र तो योग्य कालीं
वर्षे, तेणें धन्यता त्यास आली ॥४॥ (६)

---

१ दाट सावली. २ ऊन्ह. ३ प्रियेच्या भेटीस उत्सुक. ४ बर्हिन् = मोर, माला = समूह. ५ विलास = चमक. ६ 'कादंबिनी मेघमाला.' ७ खणून वाहण्यास.

मंदाराचा[१] वृक्ष देतो अभीष्ट[२],
फारा वर्षी देव भक्तांस तुष्ट ।
एखादा तो सेवनें भूप तोषे,
प्रावड्[३]-दाता प्रार्थनेवीण वर्षे ॥५॥ (७)
सर्व प्राण्यां आणि सर्वौषधींना,
पोषी तोयें, अल्प गर्वा धरीना ।
पातालीं वा भूतलीं वा दिवीं ही,
दाता कोणी मेघसा श्रेष्ठ नाहीं ॥६॥ (८)
श्रीमंतांतें याचकांनीं स्तवावें,
तैसे मेघां प्रार्थिती मोर भावें ।
पैसा नाहीं ज्यास त्यातें न मान,
रिक्तां[४] मेघां प्रार्थिती मोर-ही न ॥७॥ (९)

## २. शरद् ऋतु

शुद्धें तोयें होय आर्द्रा[५] रसा[६] ती,
बीजें सारीं पेरिलीं, वाढ घेती ।
आलीं धान्यें, स्वस्थळा मेघराजा
जाता झाला, गुंतले लोक काजा ॥८॥ (१०)
भानूनें तैं त्यागिले ताप सारे,
मालिन्यातें त्यागिती तोय-तारे[७] ।
धान्यांनीं ही त्याग कच्चेपणाचा,
केला, झाली बंद दर्दूर[८]-वाचा ॥९॥ (११)

---

१ मंदार = पांच कल्पवृक्षांपैकीं एक. २ इच्छिलेली वस्तु. ३ प्रावड् = पाऊस. ह्या पद्यांत व्यतिरेक अलंकार आहे. ४ जल-रहित. अर्थांतरन्यास आहे. ५ ओली. ६ भूमि. ७ तारा = नक्षत्र. ८ दर्दूर = बेडूक.

इंद्रें केलें आपुलें चाप[१] मुक्त[२],
कीं भूमीच्या रक्षणीं भूप दक्ष।
भूपाल-स्त्री-रूप पाहोनि चित्तीं,
लाजे गेली वारि-वाह-प्रिया[३] ती ॥१०॥ (१२,१३)

## ३. राघोबादादांचा उत्तरदिग्विजय ( स्रग्धरा)

**दादा** जो फार साधा, प्रथित[४] रिपु-वधीं आर्य लोकांत झाला
जिंकाया उत्तराशा[५] स-बलसधनु तो विप्र-राजा[६] निघाला।
आशा[५] ती द्रव्य-पूर्णा, प्रबळ यवनही त्या दिशेलाच होते,
या दोन्ही कारणांनीं प्रथमचि तिकडे जाति **दादा** जयार्थें ११(१४,१५)

( भुजंगप्रयात )

कुरंगापरी[७] त्या सुरंगीं[८] तुरंगीं[९]
महावीर आरूढ होऊनि 'रंगीं[१०]।
झणीं जाउं' ह्या लालसेनें[११] निघाले,
गजारूढ पादाति सेनाहि चाले ॥१२॥ (१६)

जिनाचे तुरंगा बरे पक्ष झाले,
जसा श्येनपक्षी नभा-माजि चाले।
तसे चालती शोभले जे नगांनीं[१२],
तुरंगाभिधा[१३] सार्थ केली तयांनीं ॥ १३॥ (१७)

---

१ धनुष्य. २ दोरी सोडून ठेवलेलें. ३ वारि-वाह = मेघ, त्याची प्रिया अर्थात् वीज. ४ प्रसिद्ध. ५ आशा = दिशा. ६ येथें मंत्री हा शब्द युक्त वाटतो. ७ कुरंग = हरिण. ८ चांगल्या रंगाचे, सतेज. ९ घोडे. १० रंग = नाट्यभूमि, येथें समरभूमि ११ उत्कंठा. १२ अलंकारांनीं. १३ तुर = वेग + गम् = जाणें. यावरून तुरंग = वेगानें चालणारा (घोडा). अभिधा = संज्ञा.

११ शिव.

करी आणि वाजी, क्रमेला, पदाती,
रथारूढ होऊन कित्येक जाती।
असंख्यात गाडे निघाले खटारे,
अशी शीघ्र चाले चमू षट्प्रकारें[१] ॥१४॥ (२०)

( शार्दूलविक्रीडित )

**नारो शंकर**[२] अग्निसा रिपु-तृणा, रक्षीतसे वाहिनी,
तैसा सैन्य-प **रामचंद्र**[३] दुसरा जो बुद्धिवंताग्रणी। (२१)
व्योमींचा[४] धुरळा रिपूंस गमला तो धूम-केतू-परी,
हत्ती ते [५]यमवाहनापरि तयां भीतीस देती उरीं ॥१५॥ (२४)

देवोनी बहु खंडणी वदति ते **दादास** " आम्हांवरी
ठेवा प्रेम तुम्ही, अहर्निशि धरूं आम्ही तवाज्ञा शिरीं "।
मित्राराधन[६] तो करी म्हणुनियां तन्मित्र झाले अरी[७],
कर्ण-[८]प्राय सदा द्विजांस सुखवी, प्रेमा वसे अंतरीं १६ (२६)

जैं **विंध्याचल** लंघुनी पुढति तो जाई तदा शत्रुच्या[९]
सौभाग्यास सुतादिकांसहि मनीं साशंक झाल्या स्त्रिया[९]।
आले म्लेंच्छ तसेंच भिल्ल समरा त्यांते वधोनी रणीं
स्वर्गी पाठविले, असा अतुल तो **दादाख्य** शूराग्रणी ॥१७॥

---

१ सहा प्रकारची. हस्त्यश्वरथपादातं शकटोष्ट्रं च षड्विधं। हे सहा प्रकार महाभारतांत आढळतात. पैकीं प्रस्तुत ठिकाणीं शकट किंवा गाडा ह्या पदानें तोफेचा गाडा अभिप्रेत आहे. २ राजेबहादूर. मूळचें आडनांव दाणी. ३ रामचंद्र गणेश कानडे. ४ व्योमन् = आकाश. ५ साक्षात् यमाचें वाहन असलेला रेडा. ६ मित्र = सूर्य. ७ अरी तन्मित्र झाले, असा अन्वय. ८ कर्णाप्रमाणें (उदार). ९ शत्रूच्या स्त्रियां सौभाग्यास ... साशंक झाल्या असा अन्वय.

जिंकोनी **जयसिंह** तो **जयपुरीं** सत्ता निजा स्थापिली,
त्यांचा जो *जय-शब्द यौगिक[1] तया रूढार्थता[2] आणिली, ।
ऐसा तो **रघुनाथराव** विजयी **दादा** भरारी रणीं
जिंकोनी बहु मांडलीक नृप त्यांपासून घे खंडणी ॥१८॥ (२९)
आला खंडणि घेउनी शरण तो **ज्योतिष्पुराधीश**[3] ही
आश्वासून तयास, तो मग पुढें **दिल्लीस** गेला जयी ।
झाला तैं वश **दिल्लिपाल**हि तया **दादास** दासापरी,
होते ज्यावर पूर्ण **शंकर**कृपा त्यातें सदा श्री वरी १९ (३०,३१)

(भुजंगप्रयात)

असो; यापरी त्या **शका[4] पारसीका[4]**
रणीं जिंकुनी स्वप्रतापें कितीका ।
अपारा धना आणि साऱ्या चमूतें
सवें घेउनी येत **दादा पुण्यातें** ॥२०॥ (३२)

### ४. अखिल भरतखंडावर मराठ्यांचें अधिराज्य

दिशा जिंकिल्या सर्वही यापरीनीं,
दिलें द्रव्य आणून सर्वां अरींनीं, ।
अशी खंडणी येतसे सालसालीं[5],
जगीं **पेशव्यां**ची बहू कीर्ति झाली ॥२१॥ (३३)

### ५. प्रधान व त्यांचे बंधु

असे **गोपिका** नाम **बल्लाळ**-भार्या,
करी साह्य ती स्वप्रजेला सुकार्या[6] ।

---

* प्रस्तुत स्वारीपूर्वी जयसिंह व जयपूर ह्यांतील जय शब्द मूलार्थानें युक्त होता. पण आतां त्यांचा पराजय राघोबानें केल्यानें ह्या संज्ञा केवळ विशेषनामाप्रमाणें अर्थशून्य झाल्या. १ यौगिक = अवयवार्थांतून निघालेला. २ रूढ = प्रचारांत असलेला. ३ जोधपूरचा राजा (भावे-टीप). ४ यवनविशेष. ५ प्रतिवर्षी. ६ सत्कृत्यें करणारी.

जया सुंदरीला स्तवावी धवानें[1],
करी ती द्विजां रत्न-हेमादि दानें ॥२२॥ (३४)

तिला पुत्र **विश्वास**राबाख्य झाला,
प्रसिद्धा असे **माधवा**ख्या दुजाला ।
तिजा पुत्र **नारायण** प्राप्त-कीर्ती[2],
असे ते तिघे मान्य सर्वांस होती ॥२३॥ (३५)

**दादास** ही सुत तिघे स्वतनूज[3] दोघे,
प्रारंभि दत्तक जरी **अमृता**ख्य तो घे, ।
**बाजी चिमाजि** सुत नंतर जाहले त्या,
भावी कुणा न समजे, समजे विधात्या[4] ॥२४॥ (३६)

### ६. **कलिप्रभाव** (उपजाति)

प्रवर्तला देखुनि कल्कि[5] राया,
गेला **चिमाजी** तप आचराया ।
विरक्त होऊनि नदी[6]-तटाकीं
तपा करी, लौकिक कर्म टाकी ॥२५॥ (३९)

(भुजंगप्रयात)

कलीच्या प्रभावें न **भाऊस**[7] पुत्र,
दिसे दैव हें कोठकोठें विचित्र ।
स्वराज्यास त्या वृद्धि तैं फार झाली,
कलीनें अखेरी तिची हानि केली ॥२६॥ (४०,४१)

---

१ पतीनें. २ मिळाली आहे प्रसिद्धी ज्याला तो. ३ औरस पुत्र. ४ ब्रह्मदेवाला. ५ बुद्धानंतरचा कलियुगांतील अवतार. ६ श्रीक्षेत्र काशी येथें गंगेच्या तीरावर. श. १७५० = १८१८. ७ सदाशिवरावभाऊ.

### ७ श्रावणमास दक्षणा : कलिप्रभाव (इंद्रवज्रा)

हैमी[१] तशा रौप्ययुता[२] सुमुद्रा,[३]
केल्या तदा द्वादश-माप[४]-भारा ।
[५]प्रत्यब्दिच्या श्रावणमासिं देती,
विद्वद्वरांतें खिचडी तिघे[६] ती ॥२७॥ (४२)

(स्रग्धरा)

दाता **बल्लाळ** वार्धी[७], धन जल, अवघे मेघ ते ब्रह्मवृंद,
घेवोनी ईप्सितार्थी[८] निघति निजगृहा, तुष्टला ज्या मुकुंद ।
भारी पुण्यांश झाला कलिस न खपला वार्षिकी[९] पूर आला,
त्यामध्यें तो बुडाला द्विजगण अवघा, जो निशीथीं[९] निघाला २८
(४३,४४)

गेला तो नाहिं आला परत कळविण्या तोयवार्ता[१०] दुजाला,
पूरामाजीं असा त्या द्विज बहुत तदा मृत्युला वश्य झाला ।
झाल्या दुःखार्त साऱ्या द्विजगणवनिता तूटला मुख्य धारा[११],
सारासारा विचारा करिति न लवही सोडिती अश्रुधारा २९ (४५,४६)

—१३—

---

१ सोन्याच्या. २ रुप्याच्या. ३ नाणें. ४ मासा. ५ प्रतिवर्षांतील. ६ विश्वास, माधव व नारायण, श्लो० २३ पहा. ७. समुद्र. ८ इच्छिलेल्या दक्षिणेला. ९ पावसाळ्यांतील = वार्षिक, अर्थात् वार्षिकी हें रूप पद्य-रचनेसाठीं आलें आहे. ९ मध्यरात्रीं. १० पाण्याची खोली, ओढ व पाण्यांत ब्राह्मण वाहवले इ० वृत्त ११ (कुटुंबांतील कर्ता पुरुष हा) आधार.

# चमत्कार १४

## पानपतावरील युद्ध

---

### १. कलिप्रादुर्भाव : गोपिकाबाईची सूचना ( शिखरिणी )

कलिप्रादुर्भाव प्रगट दिसला जेथ बरवा
रवा[1] सद्बुद्धीच्या[1] मनुज न करी लेश परवा ।
धवातें मोहाया टपति कुटिला दुर्मति वधू,
'वधू बंधूंते' ही वदति धव, ते मूर्खचि, वदूं ॥१॥
वधू **बल्लाळा**ची पतिस सुचवी वर्म[2] मनिचें,
'तुम्हांशीं सर्वांशीं कपट करिती बंधु[3] तुमचे ।
म्हणोनी नेमोनी मम तनुज **विश्वास** बरवा,
धनातें कीर्तीतें मिळवुनि मला तोष करवा ॥२॥ (१)

( वसंततिलका )

सर्वांस हा दिसतसे सुत सार्थनामा[4],
**विश्वासराय**चि असे बहु योग्य कामा ।
राज्याधिकार अथवा गुरु युद्ध हो कां,
फत्ते[5] करील सुत हा, धरणें न शंका' ॥३॥ (२)
"कांते, तुझें वचन सत्य" असें वदोनी
सेनापतित्व दिधलें तनया नृपानीं ।
देवोनि संगति **सदाशिवरावभाऊ**
त्या प्रेपिलें रिपुवधा[6], गमला लढाऊ[6] ॥४॥ (३)

---

१ सदसद्विवेक बुद्धीनें दिलेल्या उपदेशाचे शब्द. २ रहस्य. ३ राघोबा व सदाशिवरावभाऊ. ४ नांवाप्रमाणें कृति करणारा, अर्थात् विश्वास म्हणजे अपेक्षा पूर्ण करणारा, विश्वसनीय. ५ यशस्वी. ६ शत्रूस मारण्यास समर्थ.

भाऊसवें तुरग हस्ति तसे पदाती,
वाटे जना परशुराम रणार्थ जाती ।
दूतीच ज्या यम-गृहा रिपुलागि न्याया
तोफा अशा विलसल्या समरीं झुजाया ॥५॥ (५)

शत्रूंस मर्दुनि जगीं बहु मान्य झाले,
ऐसे सु-योध रिपुशीं लढण्या निघाले ।
त्यागोनियां गृहधनादिक सर्व पाशा,
त्यांनीं तदा त्वरित गांठिलि उत्तराशा[१] ॥६॥ (६)

(स्रग्विणी)

'जिंकिली राघवें अब्धिवस्त्रा[२] मही,
जिंकु आम्ही स्वयें जाउनि स्वर्गही ।
भाउ विश्वास हे जाति या आशयें[३],
आपणांतें[४] पडे जावया निश्चयें[४]' ॥७॥ (७)

(भुजंगप्रयात)

अशी कल्पना योजिली आणि पुत्रा
गृहीं ठेविलें रक्षणातें कलत्रा ।
मिळो आपणा स्वर्गिंही अन्नपान
म्हणोनीच नेलें सुतातें रणा न ॥८॥

असे हिंदु ते शूर युद्धा निघाले,
तदा भाउंनीं अग्रजा[५] वंदियेलें, ।

---

१ आशा = दिशा. २ समुद्र हयाच वस्त्रानें युक्त. ३ (चरण दोनमध्यें सांगितलेल्या) विचारानें. ४ 'आपणांस जाणें भाग आहे' इ० हें सैनिक वीरांचें म्हणणें. ५ वडील चुलतभाऊ नानासाहेब पेशवे यांस.

नमी मायबापास **विश्वासराया,**
अश्रु राणियेलें तिहीं पुत्रराया ॥९॥

"त्वरें ये मुला" **गोपिका** बोल बोले,
जरा[१] जाहले साध्विचे नेत्र ओले ।
"यशा घे, त्वरे ये" अशी तात-वाणी,
मुदें ऐकुनी तो निघे शौर्य-खाणी ॥१०॥

## २ वीर दत्ताजी शिंदे (स्रग्धरा)

नामें **दत्ताजि शिंदे** [२]स्मर-हर-चरणा तो भजे सक्तचित्तें,
ज्याचे जंघाल[३] वाजी जित-पवन[४] असे लक्ष संख्याक होते । (९)
पाता[५] दीना जनांला, सुरतरु विदुषां[६], कालसा दुर्जनांला,
सेनानी, नागकेतु,[७] प्रथितयशहि जो तोहि संगें निघाला ॥११॥

## ३ मल्हारराव होळकर (शार्दूलविक्रीडित)

ज्यानें स्वीयबळें रिपूंस मथुनी सत्कीर्ति संपादिली,
घोडेस्वार अपार संगर-पटु[८] प्रख्याति ज्या लाभली ।
घेई खड्ग करीं बसे करिवरी[९] जो संगरेच्छा धरी,
**मल्लारी** नृपमान्य होळकर तो संगें निघे सत्वरीं ॥१२॥ (८
**शंभूचा** [१०]निटिलाग्नि जेंवि नयनद्वंद्वें प्रकर्षास[११] ये[११],
**भीष्म-द्रोण** इहीं जसा कुरु-पता[१२] कीं **धर्म** बंधुद्वयें[१३] ।

---

१ अश्रुपात अमंगल गणला असल्यामळें तो टाळण्यासाठीं गोपिकाबाईनें अश्रु गळूं दिले नाहींत. २ मदन जिंकणारा = शंकर, त्याच्या चरणास. ३. चपल. ४. वाऱ्यालाहि माग सारणारे. ५ संरक्षक. ६ सामान्यरूप अ० व०. ७ सर्पचिन्हांकित ज्याचा ध्वज. ८ युद्धकुशल. ९ हत्तीवर. १० कपाळ. ११ उत्कर्ष, विशेष तेजस्वी दिसतो. १२ दुर्योधन. १३ भीमार्जुनांनीं.

किंवा **श्रीरघुवीर** दोन [1]कपिच्या योगें जसा शोभला,
**शिंदे-होळकरीं** तसा विलसला **विश्वासराया** भला १३ (१०)
देशोदेशिं वसूल खंडणि, तशी सत्ता सुरू जाहली,
स्वारी ती पुढली ससैन्य विजयी **दिल्ली**वरी पातली ।
केला मान बराच दिल्लिपतिनें, यांनीहि त्या[2] चांगला
केला. नंतर **भाउ** सैन्यसह तो मार्ग क्रमूं लागला ॥१४॥ (११)
जैशी व्यर्थ बुधांविना सुकविता, कांता स्वभर्त्याविना,
किंवा व्यर्थ जशी जगीं श्रुति[3] गमे यज्ञादिकर्माविना ।
तैशी ही पृतना तसे अमित हे योद्धेहि युद्धाविना,
**भाऊ**तें गमलें असें कलिमुळें, तो[4] पालटी तन्मना १५ (१२)
आहे **सोन्पतपान्पताख्य** पुर तें **दिल्ली** समीप स्थलीं,
तेथें पुष्कळ मद्यपी यवन ते होते लढाऊ बळी ।
गिल्चेही अभिधा जया रिपुंस त्यां, **भाऊ** असें सांगती
" द्यावी खंडणि दोन कोट रुपये आम्हां तुम्ही संप्रती" १६(१३-१५)
" आम्हीं आजवरी न खंडणि दिली, आतांहि देऊं न ती,
आहां ब्राह्मण एक कोट रुपये घ्या दक्षिणा[5] योग्य ती "।
ऐसें मार्मिक बोलणें यवन तें **भाऊ**प्रती बोलती,
**भाऊ**तें रुचलें न तें वच, गमे दैवी विचित्रा गती ॥१७॥

## ४ मल्हारराव-सदाशिवरावभाऊंचा संवाद

' येतें तें धन फार, अल्प नसुनी, जें रक्तपाताविना[6],
घ्यावें, यांतच फार भूषण असे भासे खरें मन्मना '।
**मल्लारी** सुचवी असें निजधन्या, योद्धे जया[7] वानिती,

---

१ वानर : मारुति व सुग्रीव. २ त्याचा. ३ वेद. ४ कलि. ५ यवन, ब्राह्मणास धर्मबुद्धीनें धन देण्यास सिद्ध होणें हें अशक्य व शिवाय प्रस्तुत विधान अनैतिहासिक. ६ जें धन बरेंच असून रक्तपाताशिवाय मिळतें तें फार समजून घ्यावें. ७ ( मल्हारीच्या ) भाषणाला.

**भाऊ**तें रुचलें न तें वच, गमे दैवी विचित्रा गती ॥१८॥(१७)
' जकावा रिपु साम[1]-दान करुनी आधीं अशी नीति ही,
आहे ती हितकारिका बहु बरी, वाढे जगीं कीर्तिही '।
सांगे यापरि वृद्ध **होळकर** तो, येई न तें तन्मना,
**भाऊ**ची मति दुर्मदें बिघडली, युद्धीं धरीं वासना १९(१८,१९)
गर्वें **भाउ** तदां अतीच चढला, **मल्लारि**तें बोलला,
" काका, आजवरी तुम्ही रण बहू शत्रूसवें खेळलां।
वाटे वृद्धपणीं तुम्हां 'रण नको', आम्हीं करूं रोकडें,
राहा दूर निजा चमूसह, अम्ही शत्रूंस चारूं खडे" २०(२०,२१)
तैं **मल्लारि** वदे " मदीय पृतना नेईन, ठेवीन वा,
आज्ञा घाल जशी तसें करिन मी, मानूं नका वानवा[2]।
**नाना**च्या परवानगीवरुन मी आलों तुम्हां संगतीं,
नाहीं ऐकत बुद्धिवाद[3], बरवी मातें दिसेना गती ॥२१॥
' येऊं सत्वर सर्वही परतुनी' ऐसें वदोनी इथें
आलों, तेंवि तसेंच सर्व परतूं, ऐसें गमे बुद्धितें।
वृद्धाची मति आयका अनुभवी, युद्धास जाऊं नका,
गिल्चे देतिल एक कोट रुपये ते घ्या सुखाचे फुका ॥२२॥
पूर्वीं कौरव-पांडवेय रणही झालें इथें घोर तें,
मेले त्या गुरु संगरांत अठरा अक्षौहिणी वीर ते।
ही तैशीच **सदाशिवा**, तुज नवी दुर्बुद्धि झाली निकी[4],
बापा, व्यर्थ नको चमूवध करूं मद्भाषणें आयकीं।" २३(२५)

### ३ मराठे व गिल्चे यांची युद्धोत्सुकता

ऐसें बोलुनियां स्वसैन्यसह तो दूरस्थळीं राहिला,
तैसेंची करितील योध दुसरे, ऐसें गमे **भाउ**ला।

---

१ मित्रत्व आणि द्रव्यदान. २ शंका. ३ विचार, सल्ला. ४ खचित.

त्यांनीं स्वीयचमू[1]-सभोंवति तदा केलें महाखंदका,
शत्रूपासुनि आपणांस सहसा लागूं नये कीं धका २४ (२६,२७)
तोफा लावुनि सर्व बाजुंस मध्यें तय्यार सेना निजा
ठेवोनी यश येइ, या भरंवसें मारीत होते मजा।
वाद्यें वाजति, वीर गर्जति, तदा वाजीहि ते हिंसती,
गिल्चेही पुढती जरा सरकले, ऐशी जहाली स्थिती २५ (२८)
सेना-वारिधि हिंदुचा बघुनियां गिल्चे न भ्याले मनीं,
मोठा हर्षचि त्यांस होय समरा उत्सूक झाले रणीं[2]।
हर्षें नाचति हांसती यवन ते[3] दुर्धर्ष शूराग्रणी,
'मारूं कीं मरूं' निश्चयें वदुनियां ते सिद्ध युद्धांगणीं २६(२९)

## ४ मल्हारराव होळकराचा पुनः निरोप

(भुजंगप्रयात)

सुचेना तदा कांहिं मल्लारि यास,
भविष्यार्थ[4] जाणोनि झाला उदास।
त्वरें भाउतें पाठवी तो निरोपा,
'नको युद्ध हें माजवूं, सोड कोपा ॥२७॥ (३०)
नसे चांगला वेळ हा सत्य आम्हां,
करा मद्वचा मान्य, येईल कामा'
निरोपा अशा ऐकुनी भाउराया,
गणीना तया, तो धरी हट्ट वायां ॥२८॥
'न आम्हां हिताची गमे वृद्ध-वाणी
क्षणार्धांत जिंकूं रणीं हे दुराणी'।

---

१ स्वीय—होळकर सोडून इतर सर्व. ५ अशा हेतूनें. २ युद्धभूमीवर.
३ हल्ला करण्यास अशक्य. ४ होणारी गोष्ट.

असें तो मदानें वदे **भाउ**राया,
तया संमती देत, **विश्वासराया** ॥२९॥

## ५ युद्धसंग्राम

जशा वर्षती प्रावृषीं[1] तोय-धारा,
तसे सोडिती हिंदु तोफा सरारां ।
चमूमाजि गिल्चाचिया आयसाचा[2]
पडे गोळ, तो दूत साचा यमाचा ॥३०॥ (३१)

(मंदारमाला)

गिल्चेहि ते मद्यपानें तसे रक्तपानें बहू मत्त होवोनियां,
संप्रेपिती[3] हिंदु सैन्यावरी तप्त गोलाग्निची वृष्टि कोपोनियां ।(३२)
छेदावया हिंदु-गर्वास ते सिद्ध झाले तदा म्लेंच्छवीराग्रणी,
भासे जना वानरांच्या वधा राक्षसांचेंच हें सैन्य आलें रणीं ३१

(चामर)

म्लेंच्छ 'दीन दीन' आणि हिंदु ते 'हरा हरा',
गर्जती असे रणीं वधावया परस्परां ।
म्लेंच्छ-हिंदु हाहि भेद ये न ओळखावया,
धावतात वाटतें परस्परांस खावया ॥३२॥
म्लेंच्छ कोणि 'शंभु'नाम घेउनी निजा जिवा,
वांचवीति हिंदु 'दीन' बोलुनीहि तेधवां ।
घोर युद्ध माजलें रणीं सुयोध भीडती,
शुद्धि ना तनूवरी असंख्य वार लागती ॥३३॥

## ६. विश्वासरावाचा पराक्रम (भुजंगप्रयात)

अहो-रात्र झालें महा घोर युद्ध,
बहू पावले दों दळीं मृत्यु योध ।

---

१ प्रावृष् = पावसाळा. २ आयस = लोखंड. ३ फेकिती.

गजारूढ होवोनि **विश्वासराया,**
द्वितीयान्हि[1] आला परां संहराया ॥३४॥ (३३)
असंख्यात ते [2]वाजि-सादी सभोंतीं,
तया स्पष्ट ताऱ्यांमधें तो गभस्ती[3]।
परांतें वधाया, स्वकीयां सुवीरां,
हुरूपास दे, चमूकवी खड्गधारा ॥३५॥

### ७. सदाशिवरावभाऊंचा पराक्रम

गजारूढ होवोनि **भाऊहि** आले,
करीं ढाल तल्वार घेऊनि भाले।
'जय-श्री वरी आपणा खास आजी'
असें सांगती गर्जुनीयां समाजीं[4] ॥३६॥ (३४)

### ८. हिंदू यशस्वी पण कलीमुळें पराभूत ( स्रग्धरा )

सैन्याच्या अग्रभागीं प्रथितयश असे झुंजती हिंदु मानी,
तोफांचे तप्त गोळे अपरिमित यदा सोडिती शत्रु-सैन्यीं (३५)
चित्तीं भ्याले तदा ते यवन-रिपु रणा त्यागुनी सू पळाले,
झाले हिंदू यशस्वी. कलिस न रुचलें, विघ्न मोठें उदेलें ॥३७॥
म्लेंच्छानें कोणि एका परत फिरुनियां मारिली जोड-गोळी,
तेव्हां **विश्वासराया** क्षितितलिं पडला लागुनी ती कपाळीं ।(३६)
होता विश्वास[5] ज्याचा रणचतुर असा सर्व हिंदूंस तोच
होता वि-श्वास,[6] दुःखीं सकल पहुडले[7], ईश्वरी क्षोभ साच! ३८

---

१ दुसऱ्या दिवशीं. २ घोडेस्वार. ३ सूर्य. परंतु ही उपमा तितकी योग्य नाही. कारण, येथें वीरांचें तेज वाढविणें विश्वासरावास इष्ट आहे आणि उपमान वाक्यांत सूर्यापुढें तारे निस्तेज होतात. ४ सेनासमुदायाला. ५ खात्री. ६ गतप्राण, मृत. ७ प्रसुप्त झाले, पडले.

## ९. भाऊंचा विश्वासरावाविषयीं शोक व निर्धार (हरिणी)

श्रवण करितां तद्वृत्तांता, चमू न टिके रणीं,
अननुभव[१] तो दुःखावेग प्रचंड शिरे मनीं।
विकल[२] पडले दुःखें भाऊ, नच स्थिति वर्णवे,
जय मिळुनिही, एकाएकीं अरिष्ट जडे[३] नवें ॥३९॥ (३९,४०)

(शुद्ध कामदा)

शूर भाउ तो शोक-सागरीं
मग्न जाहला, दुःख अंतरीं
फार जाहलें, वर्णवे च ना,
अश्रु लोटले [४]आर्य-लोचना ॥४०॥

(आर्या)

विश्वास[५]-दिनकराचा अस्त पहातांच शत्रु-शलभांनीं[६],
भाऊरावाख्य दिवा वेढियला तो फिरून नीचांनीं ४१ (४१)
त्या दीप्त-शत्रु-दावीं[७], आहुतिरूपें निजासु[८] अर्पोनी,
'पुनण्यातें भेटाया जावें' भाऊ असें मनीं आणी ॥४२॥ (४३)

(भुजंगप्रयात)

जरी म्लेंच्छ तेव्हां पराभूत होते,
तरी वृत्त हें ऐकतां हर्षले ते।
तयांनीं पुन्हां हिंदुसेनेस वेढा,
दिला, त्यांस आला रणाऽवेश[९] गाढा[१०] ॥४३॥ (४०)

---

१ पूर्वीं कधीं न अनुभवलेला (दुःखावेग). २ खिन्न. ३ कोसळे. ४ सन्मान्य (सदाशिवराव भाऊ). ५ विश्वासरावरूपी सूर्य त्याचा. ६ शलभ = दीपपतंग. ७ दाव = वणवा. ८ असु = प्राण. ९ युद्धाविषयीं उत्साह. १० मोठा.

“ करी काय-वाङ्-मानसें देशकार्य,
दिवीं जाय तो प्रौढ-धी पुत्रवर्य[१] । (४२)
असें वृत्त **नानास** वा **गोपिकेतें**,
कसें सांगुनी दाखऊं मी मुखातें ! ॥४४॥
गतप्राण होतील दोघेहि वाटे,
तयांवीण माझेंहि जीवित्व[२] खोटें[३] ”
असे चिंतुनी **भाउ** वीराग्रयायी[४],
मनीं मृत्यु इच्छी करोनी लढायी ॥४५॥
नरा स्वर्गलोकीं नसे व्याधि-भीति,
द्वि-दंता[५]हुनी चांगला इंद्र-दंती[६] ।
मिळे लाभ ती अप्सरा मंजु-घोषा,
गमे यामुळें **भाउनां** स्वर्ग खासा ॥४६॥ (४४)

(रथोद्धता)

विक्रमा[७]-सम करूनि विक्रमा[८],
आठवूनि हृदयीं त्रि-विक्रमा[९] ।
स्वल्पही न करितांहि वानवा,
सिद्ध तो सतनु जावया दिवा[१०] ॥४७॥ (४५)

**१०. सदाशिवराव भाऊंचें स्वात्मार्पण** (भुजंगप्रयात)

असे मर्त्यलोकीं बहू रोगभीती,
दिवीं[१०] निर्जराचीच[११] घेऊं प्रतीती ।

---

१ पुतण्या विश्वासराव. २ जगणें. ३ व्यर्थ. ४ अग्रयायी = अग्रणी. ५ दोन दातांचा (म्हणजे मृत्युलोकांतील) हत्ती. ६ ऐरावत. ७ विक्रम राजा. ८ पराक्रम. ९ विष्णूचा वामनावतार. १० दिव = स्वर्ग. ११ निर्जर = जरेचा अभाव, नित्यतारुण्य.

असे आर्य[१] मर्त्याविरत्यत्व[२] येथें,
अमर्त्याधिरुवास भोगीत तेथें ॥४८॥ (४४)

चमूमाजिं 'शाबास शाबास' वाणी,
उठे, कापिले भाउंनीं जैं दुराणी ।
अकस्मात तो संगरीं गुप्त झाला,
गमे देहमुद्रां दिवीं भाउ गेला! ॥४९॥ (४६)

## ११. युद्धानंतरची दुर्दशा (स्रग्धरा)

दोघां[३] पंचत्व[४] आलें यवन हरखले, हिंदुसेनेस झाले
गाईना वायसे, ते चरचर चिरिती मारिती तीक्ष्ण भाले ।
रक्ताचे लोट आले, समरहि भिजले, वीर-सर्वांग न्हालें,
म्लेंच्छातें हिंदु भ्याले, अपयश जडलें, आर्यसद्भाग्य गेलें! ५० (४७)

## १२. नानाफडणीसांचें वन्याशन (आर्या)

हयगजवीर-शवांनीं खंदक सगळा क्षणामध्यें भरला,
पूर्वी भविष्य जाणुनि भाऊंनीं काय तो असे खणिला! ५१ (४८)

(इंद्रवज्रा)

आले पुण्याला फडणीस नाना
आल्या[५] असे भानु अशी जयाना ।
वन्याशनें[६] चालविली स्ववृत्ती[७],
झाली अशी फार पथीं फजीती ५२ (४९)

---

१ आर्य = श्रेष्ठ. मर्त्याचें हें विशेषण येथें संदर्भविरोधी आहे. २ त्व – हा भाववाचक प्रत्यय अतिरिक्त आहे. ३ विश्वासराव आणि सदाशिवरावभाऊ. ४ मरण. ५ आडनांव. ६ रानांतील झाडपाला हें अन्न त्यानें. ७ निर्वाह.

(शालिनी)

म्लेंच्छां भ्याले हिंदुयोद्धे पळाले । सर्वांचेंही धैर्य तेव्हां गळालें ।
आले जे जे वाहनीं आरुढोन । ते पायांनीं सूं पळाले लपून ॥५३॥

होत्या ज्या ज्या हिंदुच्या बाल-बाला । त्यांचा शस्त्रें शत्रुंनीं घात केला ।
त्रेधा झाली, नग्न कोणी पळाले । कोणी कोणी म्लेंच्छ-वेशेंच गेले ५४

द्रव्याशेनें[१] हिंदुयोद्धे अमूप । आले होते ते कुबेरा समीप ।
गेले, झालें सौख्य भारी तयांना । होई तेथें, भूवरीं एक ये ना ५५(५१)

(दिंडी)

सर्व सैन्याचा अंत रणीं झाला,
एकटा तो **मल्लारि** परत आला ।
शोक-वन्हूनी पसरला महाराष्ट्रीं,
हिंदु-शलभां जाळीत दिवा-रात्रीं ॥५६॥

'दोन[२] रत्नें हरपलीं संगरांत,
[३]होन-पुतळ्यांचें गणित नसे होत' ।
असे सांकेतिक[४] लेख पुण्यामाजीं
प्रकट झाले, होणार चुकेना जी! ॥५७॥ (५२,५३)

विनाकारण उद्विग्न चित्तवृत्ती,
होउनीयां, दुःस्वप्न पडे रातीं ।

---

१ ह्या पद्यांत कवि थट्टेनें म्हणतो, हिंदुवीर धनासाठीं युद्धास कुबेराच्या म्ह० उत्तर-दिशेला आले होते. तेथें ते युद्धांत मरून मोक्षास गेल्यानें फिरून भूलोकीं आले नाहीत. ह्यावर उत्प्रेक्षा—हे वीर, जणुं स्वर्गांत कुबेरापाशीं जाऊन व धन मिळवून तेथेंच दंग झाले. २ विश्वासराव व सदाशिवराव. ३ लहान मोठे सरदार—ह्या भाषेंत रूपक आहे. ४ गूढार्थक.

अशीं चिन्हें जीं अशुभ-शंसि[१] सारीं,
बघुनि राजा[२] काळजी करी भारी ॥५८॥ (५४)
तशामध्यें पातले खासगीचे
दूत, कथिती ते वृत्त संगरीचें।
तया दुःखें **गोपिका**-हृदय फाटे
रडे अंतर्गृह[३], असें तदां वाटे ५९ (५५-५६)

## १३. गोपिकाबाईचा शोक ( वसंततिलका )

"गेलास टाकुनि मला तनया, दिवीं तूं,
तेथील सौख्य रुचलें तुजला न कितू[४]।
माझी तनू तव [५]कृपेविण ना टिकेल,
दावी सुता, मुख तुझें मज एक वेळ ॥६०॥ (५७)
विश्वास[६] टाकुनि दिवीं सजलास जाया,
कां! बा न खंति[४] गमली मजला त्यजाया।
केलें कसें मजविशीं मन तें कठोर,
पाहूं कुठें तुज असा दुसरा किशोर[७] ॥६१॥
बाळा, पितृव्य[८]-ममता मजहूनि फार
होती तुझ्यावर, म्हणून खरे दयाळ।
पाठीं तुझ्या त्वरित **भाऊजि** तेहि गेले,
आम्हांच निर्दय, कसें मन घट्ट केलें! ॥६२॥ (५८)
बा, ब्राह्मणत्व रुचलें तव पूर्वजांना,
क्षात्रत्व आदरुनि ते करिती तनाना[९]।

---

१ अशुभ सुचविणारीं. २ प्रधान नानासाहेब. ३ अंतःपुर. अर्थात् त्यांतील सर्व बायका. ४ शंका. ५ मानेसंबंधीं तुझ्या ठिकाणीं जो आदर आहे त्यावाचून ६ भू-लोकास. ७ कुमार. ८ चुलता = भाऊसाहेब. ९ वीरोचित अनेक पराक्रम.

**भीमा**दिकीं दवडिला सुत **अर्जुना**चा
तैसाच बा, तुजविशीं ग्रह मन्मनाचा ॥६३॥ (५९)

**श्रीकृष्ण** साह्य **विजया**[१] समरांत झाला,
तेणें **सुयोधन** बली परि खिन्न केला।
दुःखप्रशांति लव होय अशा प्रकारें
तो मार्गही[२] मज नसे, बघ लाडक्या रे! ॥६४॥ (६०)

ज्या निर्दयें तुज अकस्मिक मारियेलें,
दंडीन त्यास समरीं निज-खड्गधारें।
भासे असें, परि सख्या परतंत्र आहें,
कैसें करूं! तुजविणें जगणें वृथा हें ॥६५॥

मृत्यो, कठोर-हृदया, न दया तुला रे,
आम्हांस ठेवुनि कसें वधिलें मुला रे।
बा, काय संतति तुला न दिली विधीनें!
झालास काय बहु निर्दय तूं तयानें! ॥६६॥ (६१)

दिग्पाल अष्ट असती जनरक्षणार्थ,
तूं मात्र निर्दय खरा जनता-वधार्थ।
नीचाऽधिकार[३] कर मानुनि तोष आतां,
निर्मील तो विधि जगांत तुझाहि हंता" ॥६७॥ (६२)

ऐसा करी बहुत शोक नृपाल-जाया
शोकें पडे क्षितितलीं, नच शुद्धि राया[४]।

---

१ अर्जुन. २ अर्जुनास जसा कृष्ण साह्य झाल्यानें अभिमन्युवधाबद्दल सूड घेतां आला तसा मार्ग मला साहाय्याच्या अभावीं लभ्य नाहीं. ३ लोकांना मारण्याचें दुष्ट काम. ४ (येथून नानासाहेबाच्या शोकाचें वर्णन आहे.)

'**विश्वास**' '**भाउ**'च असे भळल्यास मानी,
कीं जाहला रवि गतप्रभ[१] अस्तमानीं ॥६८॥ (६३)

(पंचचामर)

अनर्थ थोर जाहला, लहान-थोर रूदती[२],
तया जळें महानदी क्षणें जहालि वाहती।
**मुळामुठा** प्रसिद्ध ती नदी तयींच[३] पासुनी,
जलार्थ पाट आणिला नृपें अर्वाच बांधुनी ६९ (६४)

(वसंततिलका)

वेडा नृपाळ ठरतां, मिळुनी सुमंत्री
संरक्षिती निजमतें सकला धरित्री।
सेनेश **होळकर**ही धरि दक्षतेला,
म्लेंच्छादिकां शमवुनी[४] सुखवी प्रजेला ॥७०॥ (६६)

**नानां**स मृत्यु पुढतीं लवलाहिं आला,
वाटे सहोदर[५]-समागम मान्य झाला।
देवस्त्रियांसह रमे दिविं पुण्यशाली,
सर्व प्रजा सहज शोक-सरांत[६] न्हाली ॥७१॥ (६७)

---

१ मावळत्या रवीप्रमाणें नानासाहेब तेजोहीन (व भ्रांतचित्त) झाले. २ रडूं लागले. ३ कवि उत्प्रेक्षितो—ह्या सार्वत्रिक शोकापूर्वीं पुण्यास मुळामुठा नदी नव्हती. असती तर, पेशव्यांनीं दुरून पुण्यास पाणी आणलें नसतें. ४ शासन करून. ५ सख्खा भाऊ; चुलत भाऊ ह्या अर्थीं हा शब्द योजिला आहे. ६ सरस् = तळें.

## १४. विश्वासराव, भाऊसाो नि नानासाहेब प्रधान मृत्यु (शा.वि.)

काळीं पाणि-गज-र्तु-भूमि[१]- शतकीं संवत्सरीं विक्रमीं,
पौषी मासिं सिता[२]ऽष्टमीतिथि दिनीं आकाशपंथा क्रमी।
गेले भेदुनि सूर्यमंडळ दिवीं विश्वास-भाऊ पुढें,
पश्चाद् [३]भूपहि सार्ध पांच[३] महिने होतांच नाकीं[४] चढे ७२ (६८)

—१४—

१ शा० १६८२ विक्रम संवत्सरीं पौष शु. ८ (बुधवार = १७६१ जाने. १४). २ सित = शुद्ध. ३ शा. १६८३ ज्येष्ठ व. ६ मंगळवार रात्रौ दीड प्रहर. (१७६१ जून २३) नानासाहेब मृत्यु. ४ स्वर्गांत.

# चमत्कार १५

### १. कलीचें तप व कलिधर्म (शार्दूलविक्रीडित)

'कांहीं न्यून सहस्र-पंचक मला संवत्सरें[१] जाहलीं,
अद्यापीहि नसे मम प्रिय असा मद्धर्म पृथ्वीवरी'।
ऐसें चिंतुनि मानसीं कलि करी एकाच पायीं तप,
सोशी शीत तसेंच तो निशि-दिनीं गंगा-तटीं आतप[२] १ [१]
होतां[३] शंभर अब्द पूर्ण, भगवान्[४] त्या विप्र-रूपें वदे,
'मागे बा, कलिराय, तूं वर असा जो त्वन्मना सौख्य दे'
'झाले नष्ट समस्त धर्म मम जे ते मर्त्यलोकीं पुन्हां
व्हावे.—हा वर द्या,' असें कलि वदे त्या सत्य-नारायणा[४] २ [२]

(भुजंगप्रयात)

कलीला पुसे तेधवां तो दयाब्धी[५],
'तुझे कोणते धर्म ते सांग आधीं'।
कली तैं वदे "भीति वाटे मनाला,
तरी सांगतों थोडथोडे दयाळा ॥३॥ [२]

(शार्दूलविक्रीडित)

स्वस्त्री नावडती, दुजी अवडती, मातापिता त्यागणें,
लोकां वंचुनियां धनार्जन सदा, वाचें मृषा बोलणें।
वेदाचा विकरा[६], कृषीवल[७] करी यज्ञा, कुलीन स्त्रिया
भर्त्यातें वधिती, दुज्या युव[८]-नरा निःशंक भोगावया ॥४॥ [३]

१ वर्षें. २ ऊन्ह. ३ (तपाच्या आरंभापासून.) ४ विष्णु. ५ कृपासागर. ६ पैसा घेऊन शिकविणें. ७ शूद्र शेतकरी. ८ तरुणाला.

बाला[१] विप्र-सुता गत-प्रियतमा[१] शूद्रासवें क्रीडती,
होती गर्भवती, स्वगर्भ वधिती, साध्वींसही निंदिती ।
भर्ता वृद्ध म्हणून अन्य तरुणा पुत्रार्थ[२] आलिंगिती,
वृद्धाचार[३] असाच देखुनि पुढें कन्या-स्नुषा[४] वागती ॥५॥ [४]
बाल्यापासुनि पोषिलें निज-धनें ज्यानें, तयाच्या धना
घेवोनी, उपभोगणें प्रिय गमे स्वस्वामिची अंगना ।
टाकी सेवक निर्धना निजधन्या, दुग्धा न दे धेनु जी
पाळाया तिजला द्विजांसहि नको, तो शूद्र-धामी[५] यजी[६] ६ [५]
सासूचा पति जांवई, पति पिता, सांगूं दुजें काय मी !
संन्यासी कुलटां[७]-सवें रति करी[८] होती[८] गृहस्थाश्रमी ।
राखी केशकलाप बालविधवा घाली शिरीं टोप[९] वा,
रत्यर्थें विनवी युवप्रियतरा, ने दों कुलां रौरवा[१०] ॥ ७ ॥ [६]

(पंचचामर)

स्नान भोजनार्थ, आणि मौंजिही वधू-स्तव[११],
नित्य मद्यमांस भक्ष्य आवडे द्विजा नव ।
हे पसंत धर्म नित्य मद्युगांत चालती,
धर्म-हीन[१२] लोक वर्म[१३] हें मनीं न आणिती ॥८॥ [७]
म्लेंच्छभूप मान्य, हा नको द्विजातिचा प्रभु,
पूर्ण हा करावया वरास होसी तूं विभू[१४]" ।

---

१ बालविधवा. २ मुलगा व्हावा म्हणून. ३ मोठ्यांचें वागणें. ४ लेकी-सुना. ५ धामन् = घर. ६ वेदोक्त कर्म करी. ७ व्यभिचारिणी. ८ 'करी' एकवचन नि 'होती' अनेकवचन, असा येथें वचनप्रमाद आहे. कारण, दोहोंचा कर्ता संन्यासी हा एकच आहे. ९ डोक्यावर घातलेले कृत्रिम केस. १० नरकास. ११ नवरीसाठीं, अर्थात् लग्नाकरतां. १२ (कलीचे) धर्म न आचरणारे (अर्थात् वस्तुत: धार्मिक.). १३ रहस्य, तत्त्व. १४ समर्थ.

ऐकुनी कलि-प्रयुक्त[1] वाक्य हें वदे हरी
' इच्छितार्थ साधण्यास युक्ति सांगतों बरी ॥९॥ [९]

## २. कलिप्रवेश

बाळ-पुत्र[2] माधवाख्य रक्षितो निज-प्रजा
बुद्धिवंत मंत्रिवर्य साह्य त्या नृपात्मजा ।
तन्मनांत तूं शिरून धर्म आपुले कले,
रुचतीलसे करून कार्य साधि आपुलें ॥१०॥ [१०]

राघवाख्य बाल-बंधु[3], तूं शिरें तदंतरीं,
आपआपणांमधेंच भांडतील-सें करी ।
इंग्रजास साह्य घेइ राघवाख्य शूर तो, [११-१४]
हा विरोध इच्छितास[4] पथ्य[5] तथ्य[6] भासतो ११ [१५]

माधवाख्य[7] भूपतीस[7] मृत्यु येउनी दुजा[7],
माधवार्थ शोक-सागरीं बुडेल तत्प्रजा ।
इच्छितार्थ तैं तुझा घडेल पूर्ण या कलें !"
सांगुनी असें कलीस, आत्मरूप[8] झांकलें[8] १२ [१६,१७]

श्री[9]-नियुक्त युक्त तो झटे करावया कली,
क्षोणितेस[10] आर्य-भू तयींहुनीच पोंचली । [१७]

थोर भाग्यवंत आर्य-राज्य तें सुखप्रद,
होय धूळधाण काय पातकें मना, वद ॥१३॥

---

१ कलीनें उच्चारिलेलें. २ बाळाजी बाजीराव (नानासाहेब) याचा मुलगा. ३ नानासाहेबाचा भाऊ. ४ इष्ट गोष्टीस, अर्थात् तिच्या सिद्धीस. ५ हितकारक. ६ खरोखरी. ७ दुसऱ्या म्हणजे सवाई माधवरावास. ८ (विष्णु) अंतर्धान पावला. ९ विष्णूनें आज्ञापिलेली. १० अवनतीस.

### ३. निजामअल्लीची पुण्यावर स्वारी (इंद्रवज्रा)

म्लेच्छाऽग्रणी भूप **निजाम**-नामा,
वामा[१] जयाच्या द्वि-शता[२] ललामा[३] ।
भीम-प्रतीकाश[४] रणीं विलासे,
पूर्वेस ज्याचें लघु राज्य खासें ॥१४॥ (१,२*)

(उपजाति)

संपत्ति सेना अनुकूल ज्याला,
धीमान् स्वयें, जो सुखवी प्रजेला ।
शताऽब्दपर्यंत करीत राज्या
ईर्ष्या[५] तरी शत्रु-वधां नवी ज्या ॥१५॥ (१,२)

ससैन्य येऊन **पुण्यास** त्यानें,
केलें **पुणें** दग्ध महा श्रमानें ।
**गोदा**-तटाकीं परतून गेला.
आला अकस्मात **पुण्यास** घाला ॥१६॥ (३,४)

### ४. राघोबाची (राक्षसभुवन) निजामावर चढाई (मंदाक्रांता)

गेला माझा अनुज[६] विजयी, पुत्र[७] त्याचा लहान,
तोही मंत्री-वश[८] म्हणुन मी जाहलों मान-हीन । (५)

---

१ स्त्रिया. २ दोनशें. ३ प्रिय, आवडत्या. ४ भीमाच्या तोडीचा.* येथ-पर्यंतच्या १७ पद्यांना पु. सं. मध्यें क्रमांक दिलेले नाहींत. व त्याचें कारण टीपेंत 'हीं पद्यें कांहीं पोथ्यांतून आढळतात' असें लिहून सांगितलें आहे. म्हणून येथें ह्या १७ पुरते चौकटी [ ] कंस योजिले आहेत. आणि ह्यानंतर म्हणजे १७ पुढील पद्यांना १, २ असे क्रमांक नेहमीप्रमाणें पु. सं. मध्यें दिले आहेत व ते येथें वर्तुली कंसांत नेहमीप्रमाणें घेतले आहेत. ५ (दुसऱ्याहून वरचढ. होण्याची) तीव्र इच्छा. ६ येथें 'सहज' योग्य होईल. सहज = भाऊ. कारण, नानासाहेब हा राघोबाचा भाऊ होता; पण अनुज (धाकटा भाऊ) नव्हता. ७ थोरले माधवराव. ८ मंत्रिन् = प्रधान, वश = अधीन.

वाली नाहीं कुणिहि उरला मातलासी अविंधा[1],
गर्वांधा, तूं खचित समजें हा तुझा काळ **दादा**' ॥ १७ ॥

ईर्ष्येनें तो चमुसह निघे शूर **राघो** भरारी,
ज्याची नंगी सडक[2] बघतां शत्रु होती फरारी।
म्लेंच्छा गांठी त्वरित **भुवनीं**[3] [3]**राक्षसाल्या** जया त्या,
भ्याले, गेले रिपु दश दिशीं, जेविं कार्पास वाऱ्या[4] ॥१८॥ (६)

(उपजाति)

ठेवूनियां **विठ्ठल**[5] सैन्यपाला,
**गोदावरीपार निजाम** गेला।
**दादा-विठोबा** लढुं लागले ते,
ससैन्य ये **माधवराव** तेथें ॥१९॥ (८)

शैलीं[6] जशा सोडिति मेघ धारा,
**दादा**वरी बाण तसें सरारा।
ते सोडिती म्लेंच्छ, तया शरांनीं
धैर्य त्यजी तो[7], मृग जेविं रानीं ॥२०॥ (९,१०)

## ५. थोरल्या माधवरावांचे पराक्रम (इंद्रवज्रा)

हत्तीस त्याच्या[8] फिरवी महान,
आला तदा **माधवराय** तेथ।

---

१ अ-विद्ध (टोंचलेला) = अविंध—मुसल्मान पुरुषांचेंच ग्रहण येथें इष्ट आहे, कारण त्यांचेच कान इत्यादि टोंचलेले नसतात. २ तरवार. ३ राक्षसभुवन ह्या गांवाजवळ. ४ वावटळ—अर्थाचा हा शब्द येथें तृतीयान्त घेणें प्राप्त आहे. अर्थ वावटळीनें. ५ विठ्ठल सुंदर परशरामी—निजाम अलीचा दिवाण. ६ पर्वतावर. ७ राघोबा. ८ राघोबाच्या.

झालें महायुद्ध, विशीख[1] भ्याले,
अष्टौ दिशांनीं मग मू पळाले ॥२१॥ (१०)

कित्येक होऊनि फकीर गेले,
कित्येक गोईंत शिरून मेले।
भूपें[2] रणीं विठ्ठलमस्तकाला
छेदून, दादांस दिलें सुखाला ॥२२॥ (११–१३)

## ६. हैदराचा पराभव (स्रग्धरा)

आला घेवोनि संगें गज-हय-पृतना[3] भूप जो भूमि-भर्ता
येतां नूत्ना[4] जयश्री, जन-मनिं गमली माधवाख्या[5] यथार्था। (१४)
मारोनी म्हैसुरींचा द्विज नृपति, बळें म्लेंच्छ-जें[6] हैदरें तें,
[7]स्वा हस्तीं राज्य त्याचें अखिल वसविलें[7], हें कळे माधवातें २३

(इंद्रवज्रा)

युद्धीं तया जिंकुनि हैदराला,
भूपाल त्यापासुनि घे कराला।
ऐशी नृपानें कृति थोर केली,
सत्कीर्ति-गंगा जलधीस नेली ॥२४॥

## ७. स्वराज्यसंरक्षक शूर पटवर्धन

त्या दक्षिणाब्धी-जवळील सारा[8]
येऊन, शत्रूंस असो दरारा।

---

१ यवन. २ थो० माधवरावानें. ३ पृतना = सेना. ४ नवीन, ताजी. ५ (मा =) लक्ष्मी (तिचा धव =) पति हे नांव. ६ म्लेंच्छें = मुसलमान हैदरानें. ७ बळकाविलें. ८ खंडणी.

यासाठिं तेथें **पटवर्धनाला**
नेमून सौख्यास दिलें जनाला २५ (१६–१८)

जे कल्पवृक्षासम गोद्विजांना,
शोभे द्विज-क्षत्रिय-शील ज्यांना ।
यश:पटा वाढविती प्रभावें,
ते ख्यात **पटूवर्धन** आडनांवें २६ (१९, २०)

## ८. **थो० माधवरावांचा राज्यकारभार** (शा. वि.)

केलें सख्य **निजाम**भूपतिसवें, तैसे प्रतीचीसही[1]
नेमोनी [2]**पटवर्धना** स-पृतना निर्धास्त केली मही ।
श्रीमद्विष्णुपदारविंदिं रतला भूपाळ [2]आहर्निशीं,
माहात्मे असतात जे बहुगुणी सद्रीति त्यांची अशी २७ (२२)

वज्री जसें पाळित देवलोकां, (उपजाती)
रक्षी तसें **माधव**भूप लोकां ।
एकादशाब्दें[3] निजराज्य केलें,
त्यातें क्षयानें मग घेरियेलें २८ (२१)

## ९. **थोरल्या माधवरावांची शेवटची राज्यव्यवस्था** (शा. वि.)

चिंता उद्‌भवली नृपालहृदयीं 'संतान ना आपणा,
आहे बंधु परी लहान बहु तो अज्ञान राज्यावना[4] ।

---

१ येथें 'धुळपादिकां' असें एखादें पद पाहिजे. पु. सं मध्यें तसें आहेही. चारही दिशांना खंडणी घेणारे शूर संरक्षक नेमिले, हें अभिप्रेत आहे. शिवाय पटवर्धनांना दक्षिणेस नेमिलें हें कवीनें वरच पद्य २५ मध्यें सांगितलें आहे. प्रतीचीस = पश्चिमेस. २ वृत्तार्थ 'अ' चा 'आ' केला आहे. ३ अकरा वर्षें (श. १६८३–१६९४; इ० १७६१–७२) ४ राज्याच्या रक्षणास.

छिद्रान्वेषि[1] बल्लाढ्य शत्रु असतां, ज्यांनीं जनां पीडिलें ।
स्वातंत्र्यास जणों स्वराज्य मुकलें' ऐसें नृपा भासलें २९(२३,२४)

मंत्री **सखारामबापू**[2] शहाणा, (इंद्रवजा)
बोलाउनी त्यास एकांतिं जाणा (२५)
हिंदु-स्वराज्यार्थ चित्तीं भुकेला,
गुह्यार्थ ऐसा नृपें बोलिजेला ॥३०॥

(भुजंगप्रयात)

" जिवाची नसे आस **बापू**, मला कीं,
पहा, चाललों मी क्षणें स्वर्ग-लोकीं ।
अहां जाणते मंत्रि माझे शहाणे,
तुम्ही नित्य सद्यःस्थितीला पहाणें ॥३१॥
मद्राज्य विस्तृत असे, सलतें परांना,
नाहींच संतति मला, लघु मूल **नाना**[3],
हो **बापु**, यास्तव पुढें तुमच्याकडे हें ।
राज्यावनाख्य गुरु[4] कार्य अपार[5] आहे ॥३२॥ (२६)
मी सांगणें उगिच, सर्वहि जाणताहां,
हिंदु-स्वराज्यभर आपण सर्व वाहा ।
**नारायणा** करिं धरा, शिकवा तयाला ",
हें बोलतां नृपति सद्गद-कंठ झाला ॥३३॥
**सखारामबापू** वदे अग्रयायी[6],
" न शोभे तुम्हां दीन वाणी नृपा, ही ।

---

१ न्यून पाहणारे. २ सखाराम भगवंत बोकील (इ. १७६१-१७८१). ३ नारायणराव. ४ मोठें, जोखमीचें. ५ साहजीकच, ओघानें. ६ मुख्य मंत्री, पुढारी.

असें घाबरे काय आम्हां करीतां ?
अम्हां टाकुनी एकटे केविं जातां ? ॥३४॥

जरी तेंच होणार, होऊनि गेलें[१],
तरी हिंदुचें राज्य केव्हां न हाले ।
नका काळजी वाहुं **नारायणाची**,
करूं पूर्ण सेवा पुढेंही धन्याची " ॥३५॥

असें सांगतां **बापु** त्या भू-भुजाला[२],
तया अंतरीं फार संतोष झाला ।
नृपें तोंड पाहूनि **नारायणाचें**,
तनू त्यागिली नाम घेतां शिवाचें ॥३६॥

## १०. प्र० थो० माधवरावांचा मृत्यु

पतीशीं सती जाय साध्वी **रमा**[३] ती,
पतीवीण नारी जगीं होय माती (२७)
समुद्रांक[४]-नंदारि-भू शालिवाहीं,
दिवीं जाय तो कार्तिकीं नंदनाब्दीं ॥३७॥ (२९)

—१५—

१ जरी कांहींही होवो व झालें. २ पृथ्वी पालन करणाऱ्या माधवरावांला. ३ थो० माधवरावांची पत्नी. ४ समुद्रांक = समुद्र-संख्येचा आंकडा म्ह० चार. श. १६९४ नंदन संवत्सर कार्तिक वद्य ८ (इ. १७७२ नोव्हें. १८).

# चमत्कार १६

## १. प्रधान नारायणरावांचें पूर्वजन्मवृत्त

(शार्दूलविक्रीडित)

श्रीमन्माधवराव यांस नव्हतें संतान, या कारणें
सद्धर्में क्षिति रक्षिली तदनुजें प्रख्यात नारायणें।
तत्पूर्वार्जितजन्मकर्मकथना[१] वर्णावया संप्रती
झाली श्रेष्ठ कथांस लोलुप अशी इच्छीत मद्भारती[२] ॥१॥
कोणी सात्विक[३] पश्चिमाब्धि[४]-निकटीं सिद्धाभिधा[५]-नें वसे,
होती काम[६]-दुहा, विनायक[७]-पदा तो विप्र पूजीतसे।
नेमी धेन्ववनार्थ[८] सिद्ध मुनि तो चौघां सुवीरां नरां,
जाती तीसह ते वनीं, मुनिगृहीं बांधोनिया वांसरा २ (१,२)
ऐसी धेनु पयस्विनी[९] प्रतिदिनीं इच्छानुसारें चरे,
भक्षी बाल[१०]तृणांकुरा चरुन ती मागें दिनांतीं फिरे।
पाडा[११] पाजुनि, धार काढुनि तिची, तो सिद्ध पूजी नमी,
झाली कामदुहा तया मुनिवरा सिद्धि-प्रदा[१२] स्वाश्रमीं. ॥३॥
कोणे एक दिनीं वनीं फिरतसे ती धेनु शांतें मनें,
व्याघ्रानें सहसा टपून धरिली तद्रक्त[१३]-पानेच्छुनें। (३)

---

१ त्याच्या, पूर्वी मिळालेल्या जन्मांतील कर्माची कहाणी. २ भारती = वाणी. अन्वय—श्रेष्ठ कथांस लोलुप अशी मद्भारती तत्० वर्णावया संप्रति इच्छित झाली. ३ सत्त्वशील पुरुष. ४ अब्धि = समुद्र. ५ सिद्ध ह्या नांवानें. ६ कामधेनु, येथें नुसती गाय. ७ गणपती. ८ अवन = रक्षण. ९ दूध देणारी. १० कोवळें. ११ खोंड, पोऱ्हा. १२ इच्छा सिद्ध करणारी, पुरविणारी. १३ तिचें रक्त पिऊं इच्छिणाऱ्या.

तोडे[१] पेटउनी, तयार भट जे, त्यांनीं तया पाहिलें,
वेगें झाडुनि बंदुका क्षण-लवें[२] व्याघ्रास संहारिलें ॥४॥ (४)

गोळी एक चुकून ती पटदिशीं धेनूस लागे उरीं,
तेव्हां विव्हल जाहली मृदुतनू ती धेनु दीनापरी ।
टाकी आंग धरेवरी, चहुंकडे पाहे जशी बावरी,
वत्साची स्मृति जाहली कविमतें धेनूस तेव्हां खरी ॥५॥ (५)

आला ऐकुनि वृत्त तें मुनि क्षणीं घेवोनि पाडा वनीं,
तेथें दीन-मुखी सखीस निरखी तो, खिन्न झाला मनीं ।
आक्रंदे निज पाडसार्थ[३] नयनीं आणुनि अश्रूस ती,
दैवाची गति ना कळे, अवचितां दुःखीं बुडाली सती[४] ॥६॥ (६)

( वसंततिलका )

'बा वासरा, तुजसि टाकुनि मी निघालें,
लोकांमधें प्रकट निर्दय माय झालें ।
माझाच रक्षक मुला, मज काळ झाला
हे पाळितील तुज सिद्धमुनींद्र बाळा,' ॥७॥

ऐसें मनीं वदुनि, तोंड बघे द्विजाचें,
प्राणान्त होय सतिचा. यम-केंद्र[५] जाचें ।
आकर्षिला असु तिचा समयीं यमानें,
होणार होत न चुके जगिं याच मानें ॥८॥

---

१ बंदूक पेटविण्याची वळीव वात = तोडा. २ लव = अंश. ३ पाडस = वासरूं. ४ (निरपराध धेनु). ५ अन्वय—यमानें समयीं तिचा असु आकर्षिला ज्याचें केंद्र यम (होय). अर्थ—तेव्हां यमानें तिचा प्राण खेंचला, अशा रीतीनें, कीं, तो यमाकडे म्हणजे स्वतःकडे खेंचला जावा.

(शार्दूलविक्रीडित)

ज्यानें धेनु न जाणतां वधियली, घेवोनि त्याचा असी[१]
मारी टार तयास सिद्ध मुनि तो, कोपोनियां मानसीं ।
त्या योधें मरतां तया मुनिवरा उच्चा[२] वचें[२] शापिलें,
होतां सिद्ध वशी[३], परी बिघडला, होणार होतें बळें ॥९॥ (७)

'गोहत्या घडली मला न कळतां माझ्या करें स्वामिया,
झाला पात्र[४] तुम्ही मनीं समजुनी बुद्ध्या वधा माझिया ।
ह्या पापें जनि[५] होय सत्यचि तुम्हा कोणा महात्म्या घरीं
मी मित्रांसह भृत्य[६] होउनि जिवें मारीन जन्मांतरीं.' १० (८)

ऐसा शाप वदून शूर नर तो पंचत्व[७] पावे वनीं,
आला सिद्ध निजाश्रमीं, परि नसे सच्छांति त्याचे मनीं ।
आहे दैव बली, प्रयत्न अवघे होती नरांचे वुजे,
ह्या तत्त्वा मनिं आणुनी पुनरपि द्वै-मातुरातें[८] भजे ११ (९,१०)

झाला तुष्ट गणेश, सिद्ध मुनिला 'मागे वरातें' वदे
तैं लागुनि पदीं मुनींद्र वदला 'देवा मला मुक्ति दे ।
आहे सर्वहि नाशवंत जग हें, इंद्रादि जाती लया,
द्यावी मुक्ति मला, म्हणूनि वदतों देवा, करावी दया' १२ (१०,११)

"आहे शाप तुला वनांत मरतां गोरक्षकानें दिला,
आधीं तो शमवीं, जनीं जनन घे, हो क्षात्र-धर्मीं भला ।
जेव्हां मारिल तो तुला तयिच तूं जाशील मुक्ति—स्थला',
ऐसें सांगुनियां गणाधिप तिथें अंतर्हितीं[९] जाहला १३ (१२,१४)

---

१ तरवार. २ उच्च स्वरानें. ३ संयमी. ४ सिद्ध, तयार. ५ जन्म. ६ सेवक. ७ मरण. ८ पार्वती आणि हत्तीण ह्या दोन मातांचा मुलगा = गणपती. ९ येथें 'अंतर्धि–तें पावला' हा पाठ कल्पिणें बरें. अंतर्धि = अंतर्धान.

१३ शिव.

### २. प्र० नारायणरावाचें पूर्वजन्मवृत्त ( मालिनी )

यमघटि[१] भरतां तो सिद्ध पंचत्व पावे,
नृप-कुलिं पुढतीं त्या जन्म झालें स्वभावें. ।
कथिन सकल त्या मी वृत्त **नारायणाचें**,
जननमरण हें तों खेळणें प्राक्तनाचें[२] ॥१४॥

तरुण[३] मरण आलें जेधवां **माधवाला**,
अवनि नवरि झाली मान्य ताज्या[४] धवाला[४] ।
अनुज करितसे तो राज्य आत्माग्रजाचें,[५]
हरिहरचरणांला चित्त एकाग्र ज्याचें ॥१५॥

### ३. प्र० नारायणरावांचा शापोक्त मृत्यु

जनन यवन-वंशीं होय गोरक्षकाचें,
समनुचर[६] जहाले त्याच भू-पालकाचें ।
नृप-निलयिं[७] मुनीची धेनु ती धेनु झाली,
दिवसनिशिं दयेनें तीस तो भूप पाळी॥१६॥(१७,१८)

अनुचर[६] यवनांनीं त्या नृपा ठार केलें,
नृप-निधन असें तें पूर्ण शापोक्त झालें ।
निधन-समयिं भार्या गर्भिणी सत्य होती,
जठर-निहित-तेजो-राशि[८] शुद्ध प्रची ती ॥१७॥

---

१ आयुष्याचा अवधि. २ पूर्वजन्मीचें कर्म. ३ हें थो० माधवरावांचें विशेषण ४ नवीन पति = राजा, स्वीकारिला. ५ आपल्या वडील भावाचें. ६ सेवक. ७ निलय = घर. ८ उदरांत ठेविला आहे तेजस्वी गर्भ किंवा सूर्य जिनें. ह्याचें विशेष्य 'प्राची' हा शब्द येथें पद्याकरतां 'प्रची' असा पडला आहे.

(रथोद्धता)

बाण-नंद-रस-भूमि[१] या शकीं,
बालभूपति दिवास[१] जाय कीं।
व्योम-मध्य सविता त्रयोदशी,
शुद्ध भाद्रपदिं मावळे शशी[२] १८ (२०,२१)

क्रम प्रत्यहींचा[३] दिवा भोजनांतीं
निजाया निघे बाल-भूपाल-मूर्ति।
तदा त्या नृपा निर्दया **गारद्यांनीं**
जिवें मारिलें. होय शापोक्त हानी ॥१९॥

गणाध्यक्ष-वाचे[४]-नुसारें नृपाला,
असू त्यागितां मोक्षही प्राप्त झाला।
असें वृत्त मागील **नारायणाचें**
निजा कर्मयोगें रहाणें नराचें ॥२०॥

जयानें नृपा मारिलें त्या धराया
न ये धैर्य कोणा तया ठायिं जाया।
**भवान्राव**[५]-नामा मराठा[६] प्रतापी
धरी तो तया जो असे शीघ्रकोपी ॥२१॥ (२२)

नृपाचे शवा अंत्य-संस्कार केले,
गृहीं भूप-भार्येसहि शांतवीलें।

---

१ श. १६९५ भाद्र. शु. १३ सोमवार = १७७३ आगष्ट ३०, १२ वाजतां. २ चंद्रासारखा प्रधान नारायणराव. ३ प्रतिदिवशींचा. ४ गणपतीच्या वराप्रमाणें. ५ प्रतिनिधी. ६ महाराष्ट्रांतील, असा येथें देशपर अर्थ आहे. जातिपर अर्थ नाही.

तियेच्या सु-गर्भास मानूनि राजा
सुमंत्री पहाती स्वयें कामकाजा ॥२२॥ (२३)

### ४. गर्भस्थ प्र० सवाई माधवराव (वसंततिलका)

नेलें **पुरंदरगिरीवर** त्या सतीला,
मंत्र्यादिकीं जठर-गर्भ नृपाळ केला।
वाटे शशीच जठरांबरिं[1] **माधवाख्य**,
देईल तो, गमतसे, जनतेस सौख्य २३ (२५)
मेघा प्रभंजन[2], तमा रवि ने दिगंतीं,
तापा शशी सहज नाशुनि देइ शांती।
भावी नृपाल निज शत्रुंस तेवि नाशी,
वाहे तदा शुभवहा[3] जनबुद्धि ऐशी २४ (२६)

### ५. नाना फडणीस (साकी)

**सवाइ माधवराव** ठेवुनी गर्भाचें त्या नांव,
**नाना** हाकिति कर्णधार[4] तैं राज्यरूप ती नाव॥ २५ ॥
योग्य प्रसंगीं मंत्रिवरांची संमति **नाना** घेई,
राजा नसतां प्रजा-रंजनीं[5] उणें न येऊं देई ॥२६॥
शमदम ज्याच्या आंगीं जो बहु नीतिमान, बुध, दाता,
दीनां पालक सत्यवचनपटु **नाना फडणिस** होता २७ (२७)

—१६—

१ जठररूपी आकाशांत. २ जोराचा वारा. ३ भावी कल्याणाचें अनुमान करणारी. ४ सुकाणू धरणारा, चालविणारा. ५ रंजन = संतुष्ट राखणें.

# चमत्कार १७

## १. सवाई-माधवराव-जन्म ( द्रुतविलंबित )

अधिक [१]माधव-मासिं **पुरंदरीं,**
गिरिवरी जय-नामक वत्सरीं ।
धवल[२] सप्तमि योग दिवा भला,
अभिजिती[३] प्रभु **माधव** जन्मला ॥१॥ (१)

( चामर )

[४]माधवांशजात भूप **माधवाख्य**[५] शोभला,
श्रेष्ठ [६]**माधवाहुनी** गुणें प्रजेस लाभला ।
वृत्त ऐकुनी जनांस हर्ष होय अंतरीं,
जन्मला **पुरंदरीं** खराच तो पुरंदरी[७] ॥२॥ (२)

( इंद्रवज्रा )

**नारायणा** आठवितां प्रजांचे,
जे अश्रु ते जाति अपाप[८] साचे ।
आले परी तद्रिपु-लोचनांना,
तेव्हां नवे अश्रु अपाप[८] नाना[९] ॥३॥ (३)

---

१ वैशाख. २ श. १६९६ शुद्ध पक्षांतील सप्तमी ( १८।४।१७७४ ) सोमवार. ३ उत्तराषाढाचा चौथा चरण. ४ विष्णूचा अंशावतार. ५ सवाई माधवराव थोरल्या माधवरावाहून गुणें श्रेष्ठ. ६ हें अशुद्ध रूप (पुरंदर= इंद्र, पौरंदरि=जयन्त) ह्या दोन शब्दांच्या संकरानें झालें आहे. ८ आपोआप. ९ पुष्कळ.

शिरीं पूर्ण कुंभास घेऊन नारी,
मुदें ओतिती राजवाड्यांत वारी[1] ।
शची-[2]प्रेरिता त्या वधू अप्सरा हो,
न[3] कां गांग तें तोय अद्यापि वाहो ? ॥४॥ (४)

(उपजाति)

[4]बालावगाहार्थ सुरस्त्रियांनीं
जें आणिलें गांग विशुद्ध पाणी ।
पुरंदरांतून अपार वाहे,
तें आजपर्यंत तसेंच आहे ॥५॥ (४)

(द्रुतविलंबित)

मधुर कोमल दुंदुभि वाजती,
गृहिंगृहीं गुढियाहि उभारती ।
जमुनि वारवधू[5] नृपमंदिरीं,
नटुनि नाचति गाति मृदु स्वरीं ॥६॥ (५)

यदि शशी उदयाप्रति येतसे,
तम लयाप्रति जाय तदा जसें ।
जयिं पुरंदरिं माधव जन्मले,
रिपु समस्त तदा लय[6] पावले ॥७॥ (६)

---

१ पाणी. २ इंद्राणीच्या आज्ञेवरून. ३ चरण ४-चा अर्थ—सवाई माधवरावाच्या जन्मकालीं बायकांनीं पाण्याची हेल म्हणून राजवाड्यापुढें ओतलेलें पाणी पुरंदरीं अजून कां वाहात राहणार नाहीं ? अर्थात् राहीलच. कां ? तर हें पाणी उत्प्रेक्षेनुसार गंगेचें असून इंद्राणीनें अप्सरांकडून वाहविलें होतें. ४ अवगाहन = स्नान. हें पद्य ८ शीं समानार्थक. ५ नृत्यांगना. ६ नाश.

(वसंततिलका)

नाशुनिया बहुत थोर पुरें अरींचीं,
केलीं यथार्थ अभिधाहि[१] पुरंदराची[१]।
झालें सुजन्म जयवत्सरिं माधवाचें,
युद्धांत ये यश सदा म्हणवूनि साचें ॥८॥ (७,८)

## २. मराठे-इंग्रजांचें तळेगांवचें युद्ध—इ. १७७९

(भुजंगप्रयात)

बली कार्यसाधू परांतें वधाया
रणीं बंदुकांनी करीती लढाया।
सुरा-मांस-भक्षी परद्वीप-वासी[२]
असे हूण[२] आले लढाया पुण्याशीं ॥९॥ (९)

सुरा-प्राशनें धुंद ऐसे पदाती
असंख्यात शस्त्रें करीं ढाळ[३] देतीं।
यदा सह्य[४] लंघूनि आले पुढारां,
अनभ्यस्त[५] तैं भूमि कांपे थरारां ॥१०॥ (१०)

असें वृत्त पौरां जनीं आयकीलें
भयग्रस्त तैं पुण्य-वासी जहाले।
असू-तुल्य पुत्र-स्त्रिया टाकुनीयां
पळाले वनीं प्राणरक्षा[६] कराया ॥११॥ (११)

---

१ शत्रूचीं पुरें उध्वस्त करणारा (इंद्र) = पुरंदर—ही गडाची संज्ञा, तेथें सवाई माधवराव जन्मल्याबरोबर शत्रुनगरें उध्वस्त झाल्यानें अन्वर्थक झाली असी कवीची विवक्षा. २ इंग्रज इ०. ३ चकाकी, तेज. ५ सह्याद्रि पर्वत. ५ ज्याला असा अनुभव पूर्वी नव्हता ती. ६ प्राण-रक्षणार्थ.

**पुणें** गांव सारेंच उद्वस्त[१] जालें,
तदा लोक ते आडमार्गें पळाले।
दिवा भीति वाटे पथीं बावराया,
गृहीं लागलीं श्वान-गृध्रें फिराया ॥ १२ ॥ (१२)

**तळेगांव**-हद्दींत आले परावे[२],
तदा मंत्रि **नाना** महा कोप पावे।
करी सिद्ध सेना सवें ध्यावयाला,
रणीं हूण मर्दावया तो निघाला ॥१३॥ (१३)

नदी-तुल्य वर्षाभवा[३] हिंदुसेना,
दिसे अश्व-तोया[४] करी-नक्र[५], नाना।
तटींच्या तरूंचें[६] रथांच्या ध्वजांतें
बरें साम्य वाटे कवीच्या मनातें ॥१४॥ (१४)

( दिंडी )

शिरीं चर्माचे[७] टोप शिरस्त्राण
नवीं आंगीं चिलखतें तशीं छान।
जशी सूत्र-स्थित[८] सुमणि-मालिका ती
तशी हूणांची दिसे सैन्य-पंक्ती[८] ॥१५॥ (१५)

---

१ उठून गेली आहे वस्ती ज्याची असें. २ शत्रु. ३ पावसाळ्यांत वाहणाऱ्या. ह्याचें नदी हें सामान्यरूप. ४ सैन्यांतील घोडे हेच नदीचें पाणी. ५ हत्तीरूप सुसरींनीं युक्त. ६ इंद्रायणी नदीकांठचीं झाडें. ७ कातड्याचें. ८ दोऱ्यांत ओंवलेली. ह्या सेनेवर दोऱ्यांत ओंवलेल्या मण्यांची उत्प्रेक्षा कवीनें केली आहे. सारखा गणवेष धारण करणारी व शिस्तीनें एका रांगेंत चालणारी ही अपूर्व सेना पाहून पाहणाराच्या मनावर काय परिणाम झाला, हें ह्या उत्प्रेक्षेनें चांगलें दिसून येतें.

( पृथ्वी )

परस्पर-भयें तदा उभय-पक्ष-सेनापती
रणांगणिं तटस्थ, ते प्रथम युद्ध नारंभिती।
पराभव जरी घडे कुलकलंक कीं तो नवा[1]
जडेल म्हणुनी[2] मनीं उपजला असा[2] वानवा[3] ॥१६॥ (१६)
पुरंदरगिरीवरी वसत बाल भूपाल तो,
करी तृण-शरासना[4], तृण-शरां-सवें खेळतो।
अशांत चर[5] येउनी वदत राजराजेश्वरा,
"अम्हांस रिपु नावरे, त्वरित युक्ति कांहीं करा" ॥१७॥ (१७)
नृपें तृणधनूस त्या तृणशरां तदा जोडिलें,
करून मुख पश्चिमे सहज त्या शरा सोडिलें।
नृपाल लघु मूर्ति ती वदतसे तया जासुदा,
'रिपूंस वधिलें, कथीं निज-दलीं,[6] त्वरें जा मुदा[7]' १८ (१८,१९)

## ३. कॅ. स्टुअर्ट-चा पराभव

असें परिसुनी चरें लघुनृपोक्त हर्षान्वितें
रणा परत जावया, त्वरित वंदिलें स्वामितें।
क्षणीं परत पावला[8] बसुनिया सदश्वावरी,
स्वसैन्य दिसलें तया रिपु-गजास सिंहापरी १९ (१९)
स्टुअर्ट[9] अभिधा जया, वदति लोक ज्या फांकडा[10],
पहा सुजनहो, तया समय पातला वांकडा।

---

१ अपूर्व. २ हीं दोन्हीं पदें वानवा-चें स्वरूपबोधन म्हणजे एकच कार्य करीत असल्यानें त्यापैकीं एक अतिरिक्त आहे. ३ शंका, संशय. ४ शरासन =धनुष्य. ५ दूत. ६ दल=सेना. ७ आनंदानें. ८ येथें 'चालला' हें पद समुचित होईल. ९ ऐटदार वीर. १० कॅप्टन् स्टुअर्ट Stewart.

न धान्य तृणही मिळे, बळ[१] समस्त झालें ढिलें,
म्हणूनि रण सोडिलें स-बल इस्टुरें[३] निष्ठुरें २० (२०)

न काल अपणां बरा समजुनी स्वमुंबापुरी-
मधें अचुक तो शिरे, परि सदा झुरे अंतरीं।
मिळेल मजला कशी सुखद हिंदुची पुण्यभू
सुवर्ण-मणि-मंडिता, वदत 'मैं न छोडूं कभू'[२] २१ (२१)

( वसंततिलका )

होते बलाढ्य परि हूण पळून गेले,
हर्षे पुण्यास विजयी नृप-सैन्य आलें.।
केली अपार धन खर्चुनि राज-मौंजी[३],
होती प्रजाजन समस्त नृपास राजी २२ (२२)

जे योध हिंदचमुशीं लढण्यास आले,
त्यां भूप-सैन्य-पतिंनीं हत-शक्ति केलें।
होते घन-स्थिति जशी पवनें निराळी[२],
तैशी समस्त रिपुची[३] समरांत झाली २३ (२३)

## ४. पुणें–नागरिकांचें सौख्यवर्णन

तें पुण्यपत्तन तदा अमरावतीसे
तेथील सुज्ञ-जन-संघ सुरांश भासे।
देवस्त्रियांसम वधू, तटिनीहि[४] गंगा,
ऐरावतापरि करी, न तुळा तुरंगा ॥२४॥ (२४)

---

१ स्टुअर्टचें मराठींतील रूपांतर. २ हिंदी कभी-चें वृत्तसाधनासाठीं रूपांतर, अर्थ 'कधीं'. ३ सवाई माधवरावांची मुंज श. १७०१ वैशाख शु. ५ (१७७९ एप्रिल २१) स पर्वतीवर झाली. २ आकाशांत. ३ (हयाचें विशेष्य स्थिति.) ४ मुठामुठा ही नदी.

(मदिरा)

पावक-तेज[१] रमा-धवसा[२] नृप **माधव** आर्य[३] जनावनिं[४] जागे,
नाथ अनाथ जनां जनकापरि, दुष्टजनार्दन[५] होय निजांगें ।
वर्षति मेघ यथाऽवसरीं, धन-धान्ययुता क्षिति सर्वहि झाली,
मानिति इंद्रपदास मनीं जन तुच्छ, अशी सुख-पर्वणि[६] आली २५(२५)

(शार्दूलविक्रीडित)

आलें नूतन जोडपें [७]दिविं-हुनी वृद्धि-क्षयांचें यदा,
तेव्हां सर्व पदार्थ सेविति मुदें वृद्धीस बुद्धिप्रदा[८] ।
झाला[९] क्षीण, अशा क्षया द्विजनृपें तत्काल आज्ञापिलें,
'पंचांगीं,[१०]शशिमाजिं वा जलचयीं[११]राहें क्षया, स्वस्थ रे'[११]२६(२६)

ज्ञानें वृद्ध परी वयें युव, असे जे दक्ष राज्यावनीं,
दाते, सत्यपरावलंबि[१२], समरीं झुंझार शूराग्रणी ।
दीनां बाप, खलांस काल, असले मंत्री जया **माधवा,**
तो भूपाल सदा स्वकीय विभवें अर्चीतसे मा-धवा २७ (२७)

रात्रीं उंदिर धान्य चोरिति, दिवा पक्वें फलें माकडें,
दोघांवांचुनि चौर्य-कर्म नव्हतें राज्यांत कोणाकडे[१३] ।
कामक्रोधमदांस वर्तन नसे कोठेंहि [१४]आज्ञेविना,
योग्यायोग्य बघूनि काल रमती घेऊनि आत्मांगना ॥२८॥ (२८)

---

१ अग्नीसारखा तेजस्वी. २ विष्णु. ३ श्रेष्ठ. ४ अवन = रक्षण. ५ दुष्ट लोकांना शिक्षा करणारा. ६ क्वचित् येणारा सुखदायक काल. ७ स्वर्गाहून. ८ येथें ऋद्धि-प्रदा (उत्कर्ष देणारी) असा शुद्ध पाठ असेल काय? ९ क्षय (अध्याहृत.) १० पंचांगांत तिथीचा, चंद्रामध्ये कलांचा आणि समुद्रांत ओहोटीनें येणारा क्षय. ११ ह्या पद्यांत परिसंख्या अलंकार आहे. शंकातीत अशा ठिकाणीं क्षयास राहावयास सांगण्याचें तात्पर्य पेशव्यांच्या राज्यांत त्याला स्थान नव्हतें हेंच होय. १२ सत्याचा मनापासून आश्रय करणारे. १३ पूर्वार्धांत परिसंख्या अलंकार आहे. १४ (शास्त्राच्या). ह्या आज्ञेचें स्वरूप कामाच्या संबंधांत पुढें पद्य २९ मध्ये दिसून येतें.

(भुजंगप्रयात)

ऋतुस्नात-भार्येसवें अंतरंगीं[१]
प्रजोत्पादनार्थें निशीं सुप्रसंगीं ।
जरा[२] क्रीडती लोक धर्मानुवर्ती,
परस्त्री स्वसा[३] कन्यका मानिताती ॥२९॥

## ५. सवाई माधवरावांच्या राज्यकारभाराचा सुपरिणाम

(वसंततिलका)

सद्वर्ण[४]-संकर नसे लवही जनांत,
तो गान-चित्र-कवनांत वसे निवांत ।
राज्यांत ज्या परवधू जननी-समान
तेथें कसा मग मिळेल खलांस[५] मान ? ३० (३०)

भूपप्रतापरविच्या किरणीं समस्ता
नेलें क्षणें रिपु-तमा सहजीं दिगंता ।
दारिद्र्य माहित नसे लवही कुणाला,
प्रख्यात **माधव** असा क्षितिपाल झाला ३१ (३१)

(चामर)

'कालरूप राजबुद्धि' वाहते चहूंकडे,
मानिती जगांत तें न **माधवास** आवडे ।
'कालहेतु भूप' हें नृपें जनांस दाविलें,
भारतीय कुंतिवाक्य सत्यतेस आणिलें[६] ३२ (३२)

---

१ एकान्तांत. २ परिमित. ३ बहीण. ४ हें पद श्लिष्ट आहे. त्याचे अर्थ जाति, रंग नि अक्षरें असे तीन आहेत. ५ दुराचारी जनास. ६ कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणं । इति ते संशयो मा भूत् राजा कालस्य कारणम् ॥ (भीष्माची युधिष्ठिरास उक्ति) पु. सं. मध्येंहि चुकीनें टीकेंत हें कुंतीचें वचन म्हणून म्हटलें आहे.

६. **सवाई माधवरावांचें लग्न** (पहिलें) (भुजंगप्रयात)

सुशीला सुरूपा कुलीना प्रसिद्धा
वधू सारसाक्षी[१] अशी जी **यशोदा**[२]।
नृपा **माधवा** योजुनी नोवरी ती,
मुदें लाविलें लग्न तें सन्मुहूर्तीं[३] ॥३३॥ (३३)

(शार्दूलविक्रीडित)

पत्रें धाडुनि मांडलीक अवघे लग्नार्थ पाचारिले,
**शिंदे गायकवाड होळकर** हे सैन्यासवें पातले।
झाला उत्सव पूर्ण एक महिना, लाभे द्विजां दक्षिणा,
तैं **नाना फडणीस**-मंत्रि बरवे आहेर[४] देती जनां ३४ (३४)
अंबारी द्वि-[५]रदावरी विलसली, माहात गंडस्थलीं,
मोर्चेलें[६] चवऱ्या कुणी उडविती राहून बाजूवरी।
सीताराम-समा[७] वधूवर मधें अंबारिच्या शोभले,
सीतारामपदाब्जभृंग[८] कविला हें साम्य भासे भलें ॥३५॥

(आर्या)

श्रीराम-कृष्ण-नल-नृप यांच्या उत्सव जसा विवाहांत,
तैसाच **माधवाच्या**, नदी घृताची अपूर्व वाहात ॥३६॥
नृप-वैभव-थाटाची लोकांनीं पाहिली वरात निशीं,
नयन-चकोरा झाला विशिखेसह[९] **माधवाख्य** भूप शशी ३७ (३५)

---

१ कमलनेत्री. २ ही दुसरी बायको, गणेश विश्वनाथ गोखले कन्या ३ श. १७१४ फा. व. ९ (१७९३ मार्च ६). ४ परत आहेर. ५ हत्ती. ६ मोर (-पिच्छ-) चवरी (=चवर) ह्यांच्या संक्षेपानें मोर्चेल शब्द झाला असेल काय? ७ हा शब्द 'सीताराम तसे' असा कल्पिल्यास बरें. कारण वधूवर हे ह्याचें विशेष्य आहे. ८ येथेंही भावे-कवीनें आपलें प्रिय दैवत राम हें सुचविलें आहे. ९ विशिखा-नक्षत्रयुक्त चंद्र विशेष शोभतो.

श्रीकृष्ण-रुक्मिणीचें लग्न जसें कलहहेतु[1], हें न तसें।
**माधवराय-यशोदा** यांना झाले समस्त जन नत-से ३८(३६)

### ७. ग्रीष्मऋतुवर्णन ( वसंततिलका )

स्वच्छांबु[2] कोमळ तृणें नगरोपकंठीं[3],
गो-वृंद[4] शांत चरती रुचिरार्थ[5]-दृष्टी।
छाया निदाघ[6]-समयीं सुखदा मनास,
पाहूनि[7] भानु-हय चालति सावकाश ॥३९॥ (३७)

### ८. शरदृतुवर्णन

ओला नवा हरवरा रविच्या हयांला,
लोकानुसार[8] गमतो प्रिय खावयाला।
ते आक्रमूनि दिवसां झणिं सर्व वीथी[9],
स्वस्थान्त[10] भक्षिति चणे शरदीं निशांतीं[11] ४० (३८)

---

१ युद्धास कारण. २ अंबु=पाणी. ३ उपकंठ=जवळचा प्रदेश. ४ वृंद हा शब्द नपुंसकलिंगी असल्यानें त्याचें अनेकवचन वृंदें असें व्हावयास पाहिजे. आहे ह्या रूपावरून तो पुल्लिंगी योजिलेला दिसतो. ५ अर्थवट मिटल्यामुळें सुंदर आहे दृष्टि ज्यांचीं अशीं गो-वृंदें. हें विशेषण वस्तुतः चरणाऱ्या गुरास योग्य नाहीं. बसून रवंथ करणाऱ्या गुरासच योग्य आहे. ६ निदाघ=उन्हाळा. ७ चरण ४—मध्यें उन्हाळ्यांत दिवस मोठे कां ह्याचें कारण उत्प्रेक्षिलें आहे.तें असें-सूर्याचे घोडे सावकास चालतात म्हणून. तें तरी कां? उन्हाळ्यांत इष्ट अशी सांवली त्यांच्या मनास लोभविते म्हणून. ८ मनुष्याच्या कल्पनेप्रमाणें. ९ (आकाशांतील) [illegible]. १० स्वस्थ आहे (अंतः-करण=) अंत ज्याचें तें, स्वस्थ मनानें. [illegible]. हिवाळ्यांत दिवस लहान कां ह्याचें कारण उत्प्रेक्षिलें आहे. ह्या दिवसांत हरबरा ओला असल्यानें तो (रात्रीं) खाण्यास लवकर मिळण्यासाठीं दिवस वेगानें चालून संपवितात.

## ९. पुणें नगर-वर्णन ( शिखरिणी )

चिरेबंदी वाडे, लघु-गुरु पथीं सर्व फरशी,
गृहद्वारीं शोभे रजत[1]-निलयीं कृष्ण तुलसी ।
समृद्धीनें पूर्णा विलसलि अशी **पुण्य-नगरी**,
नसे लोकांमध्यें लव कुटिलता[2], नांदत गरीं[3] ४१ (३९)

( वसंततिलका )

शीतांशु[4]-मंगल-बुधांऽगिरसादि चित्रें
तेजस्विता वरिति भानु-करें[5] विचित्रें ।
भानूदयीं गगनिं निष्प्रभ सर्व तारे,
होती **पुणें-नगरिं** ते द्युतिमान[6] सारे ४२ (४१)

झालें प्रभंजन[7]-ज मारुति-नाम रत्न,
तेजोदरीं[8] प्रकटलें रवि दिव्य रत्न ।
लक्ष्मी प्रसिद्ध जल-जा, नभ पंढ[9] आहे,
विश्वंभरा[10] प्रसवली नगरी **पुणें** हें[11] ॥४३॥ (४२

प्रासाद सुंदर शिलामय सात-ताली[12],
गच्चा मनोहर, फिरे जल भोंवतालीं (४३)
जाई-जुई-बकुल-चंपक-शेवतींचीं,
देती सुगंध सुमनें नव मालतींचीं ॥४४॥

---

१ चांदीचें वृंदावन. २ दुष्टपणा. ३ गर = विष. ४ आंगिरस = गुरु, चंद्र, मंगळ, बुध, इ. ५ सूर्यकिरण. ६ तेजस्वी. ७ प्रभंजन = वारा. ८ तेजस् + उदर ह्यांचा शुद्ध संधि तेजउदर असा आहे. ९ नपुंसक. १० पृथ्वी. ११ ह्या पद्यांत पंचभूतांचें सर्वश्रेष्ठ असें एकेक अपत्य सांगितलें आहे. अर्थात् पुणें हें सर्व नगरांत श्रेष्ठ ठरतें. १२ सात मजली.

भूरादि[१] लोक, **मथुरादि** पुऱ्या समस्ता,
ही त्यांत **पुण्य** नगरी गमली वरिष्ठा ।
सर्वांस ऊर्जित दशा जगतांत येते,
नीच स्थितीसहि तसें जग सर्व जातें ॥४५॥

## १०. सवाई माधवरावांचें वैभव

ज्याचे पदीं नृपति-मस्तकिंच्या किरीटीं,
संघर्षणें[२] दिसति हेम-समान दीप्ती ।
तो **माधवाख्य** नृपवीर **पुण्यांत** नांदे,
सौख्याब्धिमग्न[३] करिती जन कामधंदे ॥४६॥ (४६)
ऐसें **पुणें**-नगर फारचि रम्य होतें,
जेथें निशीं स्रवति चंद्र-शिला[४] सुधेतें ।
स्पर्धा जणों करितसे अमरावतीशी,
त्या **माधवाख्य** मदना नवरी रतीशी[५] ॥४७॥

( मंदाक्रांता )

मंत्री **नाना**, **हरि**[६] चमु-पती, **रामशास्त्री**[७] गुरूजी,
भूपाज्ञेनें अवन करुनी ठेविती लोक राजी ।
राजा मंत्री चमुपति तिघे लोक-रक्षार्थ दक्ष,
ऐसा राजा कलियुगिंहि ह्या पावला राम-साक्ष[८] ४८ (४७)

---

१ भूः, भुवः इत्यादि सात लोक = भुवनें. २ मांडलिकांच्या मुकुटांवरील रत्नें सवाई माधवरावांच्या पादपीठावर घांसल्यानें. ३ ह्याचें विशेष्य जन. सुखसागरांत मग्न. ४ चंद्रकांतमण्यांना रात्रीं चांदण्यांत पाणी पाझरत असतें. त्या पाण्यास अमृत म्हटलें आहे. ५ ह्या स्वर्गतुल्य पुणें नगरींत सवाई माधवराव मदनाच्या स्थानीं व राणी यशोदा रतीच्या स्थानीं होती. ६ हरि बल्लाळ फडके. ७ रामशास्त्री विश्वनाथभट प्रभुणे. ८ साक्ष = साम्य, बरोबरी. साक्ष शब्दाचा हाच अर्थ चम. १२ पद्य १ मध्यें आला आहे.

### ११. फर्मानवाडीसमारंभ महादजी शिंदे (शार्दूलविक्रीडित)

दिल्लीहूनि वजीरिची[१] सु-वसनें शिंद्यांनिं जीं आणिलीं,
मोठा थाट करून माधवनृपा अत्यादरें तीं दिलीं।
शिंदा शूर महादजी सचिवता[२] मागे नृपा माधवा,
त्यातें ती न दिली नृपालचतुरें, आला मनीं[३] वानवा ४९.

(स्रग्धरा)

लंका दारू[४]-मयी तैं करुनि उडविली पर्वतीच्या समीप,
दारूच्या मारुतीनें सकल विनटली[५] दाखवीलें अमूप[६]।
केलासे रंग मोठा, सकलजन समारंभकालीं,[७] नृपातें
रंगानें शिंचिती, तें असकृत[८] बघतां ना हले नेत्र-पातें ॥५०॥

### १२. से. हरिपंत फडके व महादजी शिंदे यांचा मृत्यु

(मंदाक्रांता)

ऐशी आली बहुत भरती हिंदुराज्याब्धिलागीं
किंचित् कालें, पुनरपि तया ओहटी येइ वेगीं।
आद्या भार्या नृपतिचि मरे, तैं दुजें[९] लग्न केलें,
दोघे[१०] योद्धे[१०] चमुपति पुढें स्वर्गलोकास गेले ५१ (४८,४९)

---

१ वजीर-इ-मुतालिक, मंत्र्यांतील सर्व श्रेष्ठ, ह्या अधिकाराचीं वस्त्रें, श. १७१४ आषाढ शु. ३ (१७९२ जून २२). २ सर्वाधिकारत्व. ३ (सवाई माधवरावांच्या) मनात. ४ शोभेच्या दारूची बनविलेली. ५ विनष्ठ केली. ६ अपरिमित, अपूर्व. विनटली व अमूप ह्यांचे येथील अर्थास कोशाचा वा रूढीचा आधार नाहीं. ७ रंगपंचमी-समारंभ श. १७१६ फा. व. ५ (११-३-१७९५). ८ पुष्कळ वेळ, एकसारखें. ९ सवाई माधवरावांची दुसरी बायको यशोदा. पण हें लग्न झाल्याचा उल्लेख पूर्वी (पद्य ३३ पहा) आला आहे. १० हरिपंत फडके (श. १७१६ ज्ये. व. ७ शुक्र. २०-६-१७९४) व महादजी शिंदे (श. १७१५ माघ शु. १३ बुध. १७९४ फे. १२).
१४ शिव.

(शार्दूलविक्रीडित)

**शिंदे वानवडी**मधेंच असतां आला तयांना ज्वर,
ते गेले त्रिदिवालयीं[1] मिरवुनी सत्कीर्ति भूमीवर।
**टिप्पु**तें जितुनी[2], बहू कर तयापासूनि घेवोनिया,
गेले स्वर्भवनास[1] **पंत फडके**, कालें न केली दया ॥५२॥
जातां दोन चमू-प देव-भुवनीं[1] तें राज्य झालें ढिलें,
म्लेंच्छांना कळतां असें, निज-बळें त्यांनीं तया वेढिलें।
पंकीं दिग्गजही[3] पडे जरि तरी मंडूक[4] तन्मस्तकीं
[5]आरूढे, खलरीति ही चहुंकडे आहेच सुश्लोक्त कीं ५३ (५०)

## १३. निजाम-मशिरुन्मुल्कांचा राजनीतिपर संवाद

(भुजंगप्रयात)

**निजामा** वदे मंत्रि नामा[6] **मशीरा***
'अबी[7] वख्त खासा[8] अया है हमारा।
उडा देउं गा तख्त[9] जो है **पुने** का,
हमारी कुवत[10] बंमनोने[11] न देखा' ॥५४॥

(वसंततिलका)

'जो दक्ष भूप रिपुच्या अपकर्ष[12]-कालीं
घाला स्वसैन्यसह जाउनि त्यास[13] घाली।

---

१ स्वर्गास. २ इ. १७८७ व १७९०–९२. मध्यें टिपूवर यशस्वी स्वारी. ३ (आठ) दिशांचे रक्षक हत्ती. ४ बेडूक. ५ तुल्यार्थक वचन—पंके निमग्ने करिणि भेको भवति मूर्धंग:। ६ ह्या शब्दाचा विवक्षित अर्थ नांवाचा असा आहे. म्हणून येथें नाम्ना (नांवानें) असें असणें योग्य आहे. *ह्याचें मूळचें नांव मोइनउद्दौला. ७ आतां. ८ उत्कृष्ट. ९ सिंहासन. १० सामर्थ्य. ११ बंमन-ची तृतीया. १२ पडत्या काळीं. १३ त्यावरी.

त्यातें रणीं जय मिळे, धन-कीर्ति जोडे,
जे स्वस्थ भूपति अशा समयास, वेडे ॥५५॥ (५१)
आहे सु-वैभव जरी तरि हीं शहाण्या
भूपें प्रयत्न करणें पर-राज्य घेण्या।
राजा न तुष्ट बरवा, द्विज जो अतुष्ट,
तैशी सलज्ज गणिका, समजा च नष्ट[1] ॥५६॥ (५२)
तूं स्वस्थ-चित्त[2] नृप, संप्रति जाहलास
हें होय इष्टचि तया नृप-**माधवास**।
आतां तरी समय हा दवडूं नको बा,
स्वारी करूनि बसवी अपुलाच ताबा' ॥५७॥ (५३)

(शिखरिणी)

**निझामें** ऐकोनी **मशिर**-वच, त्या उत्तर दिलें,
'द्विजांना ह्यापूर्वी मम जनक-सैन्यें हटविलें।
स्वतां मी म्हातारा, म्हणुनि करिती शत्रु गमजा,
तयांतें जिंकाया चमुसहित तूं शीघ्र निघ, जा' ५८ (५४,५६)

**१४. मशिरन्मुल्काची प्रतिज्ञा!** (भुजंगप्रयात)

**मशीरें** अशी ऐकुनी ती नृपाज्ञा,
सभेमाजि त्या थोर केली प्रतिज्ञा।
'करूं भिक्षु **नानास, काशीस** धाडूं,
न होतां असें, देह अग्नींत मांडूं' ॥५९॥ (५७)

---

१ उत्तरार्धाशी तुल्यार्थक पद्य—असंतुष्टा द्विजा नष्टाः संतुष्टा इव पार्थिवाः। सलज्जा गणिका नष्टा निर्लज्जेव कुलांगना॥ २ आक्रमणापासून विमुख.

(शार्दूलविक्रीडित)

ऐसें बोलुनियां प्रधान **मशिरें** तय्यार सेना निजा
केली देउनि पारितोषिक तिला, शृंगारवीलें गजां ।
घोडे स्वार तसे पदाति सजले, प्रख्यात योद्धे, रथी
सेना जाय निजाम-सन्निध, जणों अब्धीस भागीरथी ६० (५८)

—१७—

# चमत्कार १८

## खड्यांची लढाई

### १. सवाई माधवराव–नाना फडणीस–संवाद (आर्या)

**श्रीमन्माधव**-पावक[१] पेटविला पत्रलेख[२]-वायूनें,
क्रोधें भक्षूं इच्छी यवनांचा गर्व, नव खवा यूनें[३] ॥१॥ (१)
निज[४]-वच-निकषावरतीं भूपाचें मन-सुवर्ण घासून
**नाना फडणिस** पाहे, सासूनें पाहवी जशी सून ॥२॥
'स्वस्थाना त्यजुनि जवें[५] पंचानन ये गजास माराया,
तैसा **निजाम**केसरि आला, गमसी गजा-समा[६] राया' ३ (३)
भूप वदे 'ईश-कृपा गिरितें अणु करि, अणूस गिरि करिते,
अस्मत्पूर्वज-वारणिं[७] केलें हतवीर्य विशिख[८]-केसरितें ४ (४)
पूर्वी नरवर-रामें नर-भक्षक राक्षसाधिपा[९] वधिलें,
भगवत्सत्ता[१०] नसतां पडतें सुतराम[११] जाति-शौर्य[१२] ढिलें ५ (५)

---

१ पावक हें माधवरावांवर रूपक आहे. अग्नीसारखा तापट स० माधवराव हा अर्थ. माधवः एव पावकः असा विग्रह. २ निजामदरबारांत पेशव्यांच्या अपमानार्थ निजाम अधिकाऱ्यांनीं केलेले चाळे तेथील गोविंदराव काळे ह्या पेशव्यांच्या वकिलांनीं कळविले, त्या पत्रलेखरूप वायूनें. ३ यून = तरुण. ही उपमा केवळ यमकार्थ आलेली दिसते. ४ आपल्या भाषणरूप कसोटीवर. ५ वेगानें. ६ मम–चें समा हें रूप वृत्तार्थ केलें आहे. ७ वारण = हत्ती. ८ शिखानष्ट यवन, निजाम. ९ रावणास. १० सत्ता = अस्तित्व; येथें कृपा. ११ पद्याकरतां म्–ला अ जोडलेला आहे. अर्थ अत्यंत, निश्चित. १२ जाति = जन्म. अंगचें शौर्य हा अर्थ.

जिंकील **दौलताख्य** श्री-**शिंदे** एकटाच यवनातें,
तो मूर्त[1] धनंजय-[2]सा होइल त्या म्लेंच्छ-खांडव[3]-वनातें ६ (६)
**शिंद्या दौलतरावा** भूपाशय जाणुनी सु-समय-ज्ञीं
**नाना फडणीसांनीं** उद्गाता[4] नेमिलें समर-यज्ञीं ॥७॥ (७)

## २. तोफ–दारु–बंदुक इ० शब्दसिद्धि

शस्त्रास्त्र-शब्द-सिद्धी[5] भूपाप्रति सांगती सचिव **नाना**,
ऐकुनि संतोष तदा झाला त्या **माधवाख्य** भूप-मना ॥८॥
" तुफ् धातू हिंसार्थी या-वरुनी शब्द साधिला तोफा[6],
हिंसा करणें धर्मचि त्यांचा नैसर्गिकी[7] असे भूपा, ॥ ९॥ (९)
लघु-मध्यम-मोठी हे तोफांचे भेद तीन आहेत,
सोडिति परस्परांवरि शत्रु-वधाचा धरूनियां हेत[8] ॥१०॥ (९)
दॄ[9] धातु दारणार्थी, व्यवहारीं दारु शब्द त्यावरुनी,
स्त्रीलिंगी गीर्वाणीं[10] परि पुल्लिंगी दिसे कृतीवरुनी ॥११॥ (१०)
गंधक सोरा तैसा शेंडा[11]-चा कोळसा तिन्ही मिळुनी,
दारु असें नाम तया ठेवियलें मिश्रणास तद्ज्ञांनीं ॥१२॥ (१०)

---

१ मूर्तिमान्. २ धनंजय-चे अर्थ दोन : (१) अग्नि, (२) अर्जुन. येथें अग्नि असा अर्थ, पण तो अर्जुनानें चेतविलेला असा अर्थ सूचित होतो. ३ धर्मराजास स्वतंत्र राजधानी वसविण्यासाठीं अर्जुनानें खांडवन जाळून भूमि सिद्ध केली. ही कथा येथें लक्षित आहे. ४ यज्ञकर्मातील सामवेद गाणारा मुख्य ऋत्विज. ५ शब्दसिद्धि = संज्ञांची व्युत्पत्ति. ६ तोफंति (हिंसा करते) सा तोफा. ७ 'नैसर्गकीं' असा मूळ पाठ असणें संभाव्य आहे. नैसर्ग = निसर्गसिद्ध. ८ हेतु, उद्देश. ९ (दारणार्थी) फोडिते ती, दारु (दॄ + उ = दारु). १० देवांमध्यें (आपसांत बोलतांना, अर्थात् संस्कृतांत). ११ रुईचा (?) शेराचा कोळसा वापरतात. ह्यासच मुसलमानांत शेंडाचा म्हणतात.

ध्वन्यथ बग [1] धातू या-वरुनी शब्द साधिला बाण,
सूं सूं गर्जत जाउनि रणीं परांचे हरीतसे प्राण ॥१३॥ (११)
दण्ड[2] तया वदती कीं जो दारूदर[2] दशाधिका वधितो,
जी भेदि बिंदुलक्ष्या[3] तीतें बंदुक वदे रणीं सुधि तो १४ (१२)

## ३. युद्धार्थ मराठे सैनिक निघतात ( द्रुतविलंबित )

सकल यंत्र-समूह निघे जरी । समरिं शत्रु-वधा नृप-केसरी, ।
गिरि अशेष खणून तृणापरी । उडवितील[4], कसे टिकती अरी १५(१३)

(उपजाति)

प्रतिक्षणीं **दौलतराव शिंदे** । असंख्य तोफा उडवील छंदें[5] ।
ती वृष्टि होतां रणिं गोलकांची । त्रेधा उडे म्लेंच्छप-सैनिकांची १६ (१४)
जो कस्पटप्राय रिपूंस मानी । सेनेश तो **होळकराख्य**[6] मानी,
मोठीं विदारी रिपुरूप शेतें। विध्वंसिती सैन्यप **पानसे**[7] ते १७(१५,१६)

( शार्दूलविक्रीडित )

जे योद्धे **पटवर्धनाख्य**[8] तुमचे आहेत शूराग्रणी,
मूर्तागस्ति[9] पराब्धिचे[10] गमतसे भूपा, असे मन्मनीं ॥१७॥

---

१ बण्—शब्द करणें. यावरुन 'बवयोः अभेदः' ह्या वचनानुसार बाण साधला आहे. २ दारुनें भरलेला बाण. पु. सं. मध्यें ह्याचें वर्णन सदण्डः बाणः असें आहे. अर्थ—धरण्यासाठीं काठीनें युक्त असलेला बाण. येथें ह्या-बाणास दंड असें म्हटलें आहे. ३. पु. सं. मध्यें लक्ष्यं एव बिंदु खनति सा बिंदुखा = बंदूक. ४ ह्याचा कर्ता, 'यंत्रसमूह' यांतील, यंत्रें हा घ्यावा. ५ सहज, लीलेनें. ६ काशीराव व बापूराव. ७ सखारामपंतादि निघे. ८ परशुरामभाऊ, विठ्ठल धोंडदेव, चिंतामणराव इ. ९ मूर्तिमंत अगस्ति ऋषि. १० शत्रुरूप सागराचें.

**रास्ते**[१], **गायकवाड**[२], **पाटणकर**[३], प्रख्यात **निंबाळकर**[४],
नेमे जातिल भूप **नागपुर**[५]-चे चालून शत्रूंवर" १८ (१८–२१)
**नानां**नीं समरांगणार्थ अपुलें सामर्थ्य वर्णीयलें,
तोफा एक सहस्र आणि दलही **शिंद्यासवें** धाडिलें (२१)
'आणा येथ निजाम-मंत्रि[६] धरुनी' श्री**माधवा**ज्ञा अशी
झाली, वंदुनि ती शिरीं निघति ते **शिंदे** स्वसेनेनिशीं १९ (२२)

### ४. सवाई माधवराव नि नाना फडणीस (पृथ्वी)

यशःकिरणिं ज्याचिया उजळिल्या दिशा सर्वही,
बसून सदलंकृता नव गजावरी तो मही–
सुर-प्रिय[७] तदा निघे, सचिवही[८] तया संगतीं,
निघे, रवि-शशी-परी रसिक-लोचनां भासती ॥२०॥ (२४)

(शार्दूलविक्रीडित)

**शिंदे-होळकरा**दि शूर सगळे सिद्ध स्वसेनेनिशीं
होवोनी निघती रणांत लढुनी जिंकावया शत्रुशीं ।
त्या सेने-मधले तुरंग सजले, माळा गळां शोभती,
चाळे पायिं, जिनें[९] सुरत्न-खचितें, मोरापरी नाचती २१ (२५)

### ५. युद्धभूमि (उपजाति)

**सिना**[१०] **खरी**[११] या नदिनींमधें ती[१२] । अपार मेना निमरी नदी ती[१२]।
सरस्वतीचा यमुनेस झाला । जो संग, गंगौघ तिथें मिळाला २२ (२६)

---

१माधवराव रास्ते. २ गोविंदराव. ३ बहिरोजीराव. ४ जानराव नाईक. ५ दुसरे रघोजी. ६ मशीरुन्मुल्क. ७ ब्राह्मणांना प्रिय = स० माधवराव. ८नाना फडणवीस. ९ खोगिरें. १०, ११ खड्यांजवळील दोन नद्या. खैरा = खरी ह्या नदीचें पाणी खारट होतें. पद्य २६ पहा. १२ ह्यांपैकीं एक ती अतिरिक्त पडली आहे.

## ६. निजामाचें सैन्य

**भागापुरा**[१]-हून निजामभूप । घेवोनियां सैन्य सर्व अमूप ।
धान्यें धनें यांसह सिद्ध झाला । **मशीर**-मंत्र्यासह तो निघाला २३ (२७)

संततिमुळें दुःख रघूत्तमाला । झालें तसें होय **निजाम** याला ।
नेऊन युद्धांत जनानखाना । दुःखास भोगीत[२] निजाम नाना २४ (२८)

होता जरी वृद्ध **निजामराज** । युवस्त्रियांचें बहु त्यास चोज[३] ।
रणांत हत्तीवर बैसवूनी । नेई स्त्रिया तो प्रमदा[४]ऽभिमानी २५ (२८)

## ७. निजाम-सैन्यास पाण्याचें दुर्भिक्ष

वसून झालें दश वर्ष ज्यातें । **खर्डा**भिधा गांव नवें असें तें ।
त्यारें नसें स्वल्पचि नीर वाहे । **निजाम** तेथें सह-सैन्य राहे २६ (२९)

( वसंततिलका )

सायंदिनीं यवन नित्य निमाज-वृत्ती[५],
ते पश्चिमाभिमुख होउनियां करीती ।
डोळे मिटून करही पसरूनि दोन्ही,
पाणीच याचिति गमे वरुणास मानी[६] ॥२७॥ (३०)

जे तापले रविकरें भट गौरवर्णी[७],
ते म्लेंच्छ[७] पूसति जनां ‘ कवण्या ठिकाणीं

---

१ हैदराबाद. २ भोगता झाला. ३ कौतुक, प्रेम. ४ तरुणींचा शोकी. ५ वृत्ती = विधि, क्रिया. ६ पहिल्या तीन चरणांत यवनांच्या प्रार्थनेचें वर्णन आहे. याच संधीस त्यांना पाण्याची अतिशय टंचाई पडली होती. ह्यावरून कवि उत्प्रेक्षितो—डोळे मिटणें, हात पसरणें इत्यादि कृत्यांनीं हे यवन पश्चिमदिशेचा राजा वरुण याजवळ, आपला ताठा सोडून, पाणी मागत होते. ७ रंगानें गोरे असे यवन.

पाणी असे', कथिति लोक तदा समाजीं,
'नेत्रोदकाविण नसे जल अल्पही जी' ॥२८॥ (३१)
तैं म्लेंच्छ-भूपति कथी मशिरास तोड[१],
"संप्राप्त होय तुज[२] देशचि मारवाड (३२)
तोयाविणें सकल सैन्य मरेल खास,
हें स्थान सोडुनि, चला सजल स्थलास ॥२९॥
संक्रामिला[३] सजल देश तुझ्या रिपूंनीं,
तोयाविना मरण तें बरवें न मानी।
येवो सुखें मृति रणीं परलोक-दा[४] ती,
भीमा'समीप करुं या जन-ताप-हा[५] ती ॥३०॥ (३३)

(इंद्रवज्रा)

भीमा नदी शंकर-घर्म-जाता[६]। जी दर्शनें नाशित पाप-जाता[७]।
कीं तोय जीचें अमृतासमान। स्वर्गा न देती जन तेथ मान ३१ (३४)

(वंशस्थ)

ती शत्रुदेशीं सरिता असे जरी। होईल तेथें स्थिति आपणा बरी।
जा पाठवा सैन्यप एक आपला। ठाणें तिथें खास करा, त्वरा चला
३२ (३४)

(इंद्रवज्रा)

भीमा सुधा-तुल्य-जला सुर-स्तुता,
ग्रीष्मींहि जी लेश सुके न तत्त्वतां।

---

१ उपाय. २ तुला (व तुजबरोबर आम्हांसही). ३ व्यापिला. ४ स्वर्ग देणारी. ५ मनुष्याचा ताप हरण करणारी (भीमा). ६ घर्म = घाम. ७ जात = समूह.

**बाजी**नि **निबाळकरें**[1] भटा ऽवृतें,
जावें पुढें हें मज योग्य वाटतें" ॥३३॥ (३४,३५)

## ८. परशुरामभाऊंचा पराक्रम (आर्या)

**नाना**च्या वृत्त असें दूतमुखानें समस्त ये कानीं,
**पटवर्धना**स आज्ञा रिपु-पथ रोधावया दिली त्यांनीं ३४ (३६)
आज्ञानुसार केलें गमन झणीं **परशुरामभाऊं**नीं,
रणशूर वाजि-सादी[2] पदाति सेना असंख्य घेवोनी ३५ (३७)
**बाजी**शीं युद्ध करी द्विज[3] परि भट[3] **परशुराम-भाउ** रणीं,
सेना परस्परांच्या युद्धाची दाविती परां सरणीं[4] ३६ (३८)
ते श्येन[5], पोळ किंवा वन्य करी, एडके जणों लढती,
**भीष्मार्जुन**से किंवा **भीमसुयोधन** परस्परें भिडती ३७ (३९)
जय हेतु मनीं धरुनी चमकाविति वीर खड्ग निज करिचें,
हाणिति शर तीव्र जवें, दाविति उग्रत्व वन्य[6] केसरिचें ३८ (४०)
ऐशी ही घटिकाद्वय युद्ध-चमत्कृति रणांगणीं झाली,
परि[7] **भाऊं**ची सेना स्वर्गीं बहुतेक संगरीं गेली ३९ (४१)

## ९. दौलतराव शिंद्यांचा पराक्रम

अवलोकुनि ऐसें हें **दौलतरावा**ख्य सैन्यपति आले,
त्यांनीं तोफा सोडुनि भय[8] **भाऊं**चें क्षणें लया नेलें ४० (४२)

---

१ निबाळकर. २ घोडेस्वार. ३ जन्मानें ब्राह्मण असूनही पेशानें क्षत्रिय. ४ कौशल्य, शिताफी. ५ ससाणे. ६ वनांतील, बेफाम. ७ ह्या जागीं 'तें' शब्द योग्य झाला असता. कारण (विरोधदर्शक) परी-नें येथें विरोध दर्शित होत नाहीं. ८ ह्या कल्पनेस वास्तवांत वा मूळांनही आधार नाहीं. यास्तव हा ४ चरण 'भाऊंच्या संकटा लया नेलें' असा वाचावा.

(पृथ्वी)

कपित्थ[१]-फळसे किती, कितिक कंदुकांचे[२] परी,
[३]खगासम दिनात्ययीं[४] जणुं समस्त आले घरीं।
तसे प्रखर गोळ ते वरिवरीं जवें येउनी
निजामपृतने[५]वरी, करिति टार शूरा रणीं ४१ (४२)

(उपेंद्रवज्रा)

[६]मेघां-मधूनी सहसा[७] निघाली,
तीं भानु-बिंबें चमकूनि गेलीं।
ऐसेच ते आयस[८] तप्त गोळ,
कवीस वाटे उपमा अमोल ४२ (४३)

(शार्दूलविक्रीडित)

तैं दोहीं-कडचे समस्त जमले सेनेश सेनेनिशीं,
आवेशें लढले, अतीव चढले क्रोधास जे मानसीं।
कोणी अश्वसहीत तोडुनि परां, पाडूनि भूमीवरी
अन्याचा शर लागतां अपणही देह त्यजी संगरीं ॥४३॥ (४४)
भासे, ते बणव्यांत टोळ शिरती कीं[९] म्लेंच्छ गोळानळा-[१०]
माझारीं शिरती बसून तुरगीं, सोडीत तीव्रा शरां।
तो संग्राम परस्परांत रविच्या अस्तावधी जाहला,
जाई मंडळ[११]-भेद-भीति धरुनी तैं भानु अस्ताचला ॥४४॥ (४४)

---

१ कवठ. २ चेंडू. ३ खग = पक्षी. ४ अत्यय = अंत. ५ पृतना = सेना. ६ याचें उपमेय काळ्या मोठ्या तोफा. ७ वेगानें. ८ लोखंडी. ९ हें भासे-चें स्वरूपबोधक अव्यय. १० तोफांच्या अग्नीसारख्या दाहक गोळ्यांत. ११ ह्या वेळींच सूर्य अस्तास गेला. ह्यावर कवीनें केलेल्या उत्प्रेक्षेस आधारभूत पद्य. पान ३०, टीप ७ मध्यें दिलें आहे तें पहा.

## १०. निजाम-सैन्याचा पराभव ( स्रग्धरा )

काळा नेसून शालू विलसत रजनी, भानु अस्तास जातां,
हिंदूंनीं शीघ्र **भागानगर**-पति-चमू वेढियेली समस्ता।
**इंदूराधीश**[1] मानी, भट-वर[2] विजयी **भोसले**, शूर **रास्ते**,
यांनीं म्लेंच्छेश-सैन्यें समर-जित[3] पराभूत[3] केलीं समस्तें ४५(४५)

( मंदाक्रांता )

आल्या होत्या यवन-महिला युद्ध तें पाहण्याला,
त्यांच्या चित्तीं निज-परिभवें[4] खेदही फार झाला।
मोठ्या कष्टें परत फिरल्या भूषणादी त्यजूनी,
पायीं गेल्या, रडत शिरल्या पंथ सोडूनि रानीं ॥४६॥ (४६)

रक्तें न्हाले, पळस फुलले, म्लेंच्छ तैसे जहाले,
चित्तीं भ्याले, परत फिरले, शेष[5] कित्येक मेले।
अंधा झाली यवन-पृतना[6] वांकडा काळ येतां,
नानाऽनर्थीं पतन घडतें, ही असे ईश-सत्ता ४७ (४७,४८)

तेव्हां सल्ला[7] बहुत बरवा म्लेंच्छ लोकांस वाटे,
'अल्ला अल्ला' वदत पळती प्राण-दा[8] आडवाटें।
हिंदू झाले वृक[9]-सम तदा म्लेंच्छ ते भ्याड एण[10],
होते लोकीं असुख सुख वा चक्रनेमिक्रमेण[11] ४८ (४७)

(इंद्रवज्रा)

लागे महावायु वहावयाला,
तेणें रजो[12]-धूम नभीं उडाला।

---

१ होळकर. २ वीरश्रेष्ठ. ३ युद्धांत जिंकून मागें पिटाळून लावलेली. ४ परिभव = पराभव. ५ राहिलेले कांहीं. ६ सैन्य. ७ तह. ८ ह्याचें विशेष्य आडवाटें. ९ वृक = लांडगा. १० हरिण. ११ चाकाच्या धावेच्या खालीवर होणाऱ्या भागाप्रमाणें. १२ धुळीचा धुरासारखा लोट.

होती भयार्ता यवनेश-सेना,
झाली नदी अंध निळा दिसेना ॥४९॥ (४८)

( स्रग्धरा )

सूर्याचा अस्त झाला, निबिडतर-तमो-व्यापिनी[1] रात्र आली,
ईशान्येतें[2] समस्ता यवन-पति-चमू प्राण घेऊन गेली (५०)
आलें श्री**माधवा**तें बहु यश, यवनां माळ दुष्कीर्ति घाली,
हर्षामर्ष[3] प्रकर्षें[4] सुयश कुयश वा होतसे योग्य काळीं ५० (५१)

( भुजंगप्रयात )

दिवांधें[5] **निजामें** न भानूस[6] ध्यावें,
अनैसर्गिकें[7] हें कसें केंवि व्हावें ?
पळाला चमू आणि घेवोनि दारा,
चढे स्वीय दुर्गा[8]-वरी तो भरारा ॥५१॥ (५४)

## ११. निजाम मशीरुन्मुल्कास मराठ्यांचे ओलीस देऊन तह करतो

भिऊनी विदेशीं किती म्लेंच्छ जाती,
तया मागुनी हिंदुची कीर्ति-दूती।
त्वरें त्यां धराया गमे सत्य गेली,
फुले म्लेंच्छ यांची अपत्काल-वेली[9] ॥५२॥ (५६)

---

१ अतिशय गाढ अंधार पसरविणारी. २ ईशान = शंकर. ह्या देवतेवरून प्रस्तुत दिशेची संज्ञा वस्तुतः ऐशान अशी पाहिजे. ३ अमर्ष = सहन न होणें, मत्सर, खेद. ४ उत्कर्ष—सामग्री, कौशल्य इ. गोष्टींतील. अर्थात् उत्कर्षाच्या अधिक-उणेपणामुळें. ५ घुबडीच्या खोटामुळें दिवसाही अंध बनलेला = दिवांध = घुबड. ६ नाना फडणीस ह्या भानूस (सूर्यास). ७ ह्यांतील ए-कार पद्यार्थ आलेला आहे. ८ खड्यीचा किल्ला. ९ संकटकालरूपी लता. वृत्तार्थ आपत् हा शब्द ह्रस्वादि (अपत्) करण्यांत आला आहे.

[1]**रघुनाथ**-मंत्री **निजामास** बोले,
नृपा, घेरिलें म्लेंच्छ दुष्कीर्ति-जाळें[2]।
असे हेतु[3] याचा स्वमंत्री **मशीरा**,
प्रतीकार त्याळाच याचा विचारा ॥५३॥ (५७)

( आर्या )

यवन-प निजाम तेव्हां **रघुनाथा** बोलला ' न लाजावें,
श्रीमन्**माधव**सन्निध मोर्तब[4] घेऊनि आजला[5] जावें ५४ (५८)
माझें राज्य समस्तहि अर्पण केलें, पुरें करा आजी[6],
आज्ञा कराल जी ती मानुनि राहूं अम्ही सदा राजी ॥५५॥
ऐशी कळवा जा जा, हिंदूंच्या [7]मद्विनंति भूपाला,
आहे सुविचारी तो, करील शरणागतीं[8] न कोपाला' ॥५६॥

( शार्दूलविक्रीडित )

आणा शीघ्र **मशीर**-मंत्रि धरुनी,' आज्ञा [9]नृपाची अशी
झाली, ती शिरसा नमूनि निघती **शिंदे** स्वसेनेनिशीं।
**खडर्या**चा तह[10] ज्यास लोक वदती, प्रख्यात झालें रण,
झाले हिंदु जयी, **निजाम** रुतला पंकीं[10] जसा वारण[11] ॥५७॥

( आर्या )

**माधवराया**-सन्निध निजाममंत्री प्रसिद्ध **रघुनाथ**,
मोर्तब[12]-शिक्का[13] घेउनि जाय तयाचा धरोनियां हेत ५८(५९)

---

१ रघूतमराव खं. ५ ले. २१. २ जाल = जाळें. ३ ( ह्या लढाईस) कारण. ४ निजामाची मुद्रा, शिक्का. ५ आज. ६ लढाई. ७ हा संस्कृत-मराठी समास आहे. ८ शरण आलेल्यावर. ९ स० माधवरावांची. १० ही प्रथमा कोणत्याच शब्दाशीं अन्वित होत नसल्यानें लोंवत पडली आहे. १० चिखलांत. ११ हत्ती. १२ राजपत्रावर शेवटीं लहान पत्रप्रारंभीं असलेल्या शिक्क्याच्या आकारासारखी, मुद्रा असते तो मोर्तब. १३ पत्र-प्रारंभीं मोठी अधिकारदर्शक मुद्रा असते तो शिक्का.

( शार्दूलविक्रीडित )

‘ द्यावी खंडणि तीन कोटि रुपये, ह्या स्वारिचा खर्चही,
**खडर्या**च्या असपासचा मुलुखही चौथाइ देऊन ही ।
द्यावा मंत्रि **मशीर** ओलिस[१]’, अशा साधी तहा **माधव**,
**शिंद्याचे** करिं अर्पिला **मशिर** तो मुझें निजामें तंव[२] ५९.

(६०,६१)

छेदी दूषित अंगुली[३] बुध जशी, रक्षी शरीराप्रती
तैशी देउनियां **मशीर** बरवी केली **निजामें** कृती ।
**शिंदा** त्या **मशिरा**हिला[४] गरुडसा, श्रीकृष्णसा रुक्मिला[५],
बांधी द्रोण-सुतास[६] अर्जुन तसा, घेवानियां चालिला ६०
तो मार्जार-मुखांत उंदिर जसा, व्याघ्राननीं मेषसा[७],
किंवा सर्प जसा खगेश्वर[८]-मुखीं, सिंहाननीं हस्तिसा ।
तैसा मंत्रि **मशीर दौलत**-करीं श्री**माधवें** पाहुनी,
**शिंद्यातें** तैं अर्जुनाख्य[९] पदवी प्रेमें दिली वाहुनी ॥६१॥

## १२. विजयी स० माधवराव परत पुण्यास व प्रजासौख्य

( वसंततिलका )

संपादुनी विजय मंत्रि-चमू-सहीत,
आले **पुण्यास** नृप **माधव** भाग्यवंत ।

---

१ एखाद्या कराराच्या पूर्ततेपर्यंत बंदिवान म्हणून दिलेला. २ तेव्हां. ३ ‘त्याज्यो दुष्टः प्रियोऽप्यासीदंगुलीवोरगक्षता’ ह्या कालिदासोक्तीचें येथें स्मरण होतें. ४ मशीर हाच कोणी अहि (सर्प). ५ रुक्मिणीचा भाऊ (कृष्णाचा द्वेष्टा) रुक्मी. ६ अश्वत्थामा. ७ मेंढा. ८ खग = पक्षी + ईश्वर = मुख्य गरुड. ९ अश्वत्थाम्यास अर्जुनानें बांधून आणिलें ही कथा येथें लक्षित आहे.

झाली प्रजेस नृप-दर्शन-जा खुशाली[1],
त्या **माधवास** वदती जन भाग्यशाली ॥६२॥ (६५)

टेवूनि **पुण्य**नगरींत विशाल सेना,
संरक्षि सर्व जनता स्वसुता-समाना ।
जो [2]**भारताख्य**-कमला रविसा सुखा दे,
भूपाल तो सकल-वैभवयुक्त नांदे ॥६३॥ (६६)

(शालिनी)

संतोषा दे मेघराजा महीला,
दानें देई भूपही भू-सुराला[3] ।
द्वापारींचे धर्म आले कलीला,
प्रेमें गाती लोक ते कृष्ण[4]-लीला ॥६४॥

(इंद्रवज्रा)

थंडी न लागे वसन[5]-प्रभावें,
कोणा न लागे फल[6]-पर्ण खावें ।
नाहीं निरभ्यंग[7], वनांत वास,
हीं[8] सर्व होतीं तयिं वानरास ॥६५॥ (६८)

पुत्रापरी रक्षुनिया प्रजेला,
स्वर्गास तो **माधव**भूप गेला ।
वर्षें चतुर्विंशति राज्य केलें,
स्वर्गाप्रती पूर्वज सर्व नेले ॥६६॥ (६९)

---

१ आनंद. २ भरतखंड हेंच कोणी कमल त्यास. ३ ब्राह्मण. ४ भगवत्कथा ५ वस्त्रांच्या पुरवठ्यामुळें. ६ अन्नाभावीं कसलीं तरी फळें व रानपाला ७ स्नानापूर्वी तेल लावावयास न मिळणें. ८ पद्यांतील तिन्ही चरणांतील चार गोष्टी.

## १३. सवाई माधवरावांचा मृत्यु ( वसंततिलका )

झाला समर्थ यम त्या न वधावयाला,
चंद्रास रोग गुरु[१] जो क्षय-नाम झाला ।
तो येइ **माधव**[२]-वधास यमास कामा,
ज्ञाते चिकित्सक[३] जया वदतात यक्ष्मा[४] ॥६७॥ (७०)

( साकी )

गच्चीवरतीं देखुनि मित्रां-सह **माधव**[५]-नृपतीला,
दुष्ट कलीनें खालिं ढकलिलें एकाएकीं त्याला ॥६८॥ (७१)
कारंजावर देह पडोनी छिन्न-भिन्न बहु झाला,
राजा दिव्य विमानीं बैसुनि मोक्ष-पदाला गेला ६९ (७२)
ऐकुनि ऐशी दुःसह वार्ता **नाना** विव्हल झाले,
जाणो सायक[६] लागुनि त्यांचें हृदय विदारुनि गेलें ॥७०॥
श्रीकृष्ण परात्मा[७] श्रीयोगीश्वर जातां वैकुंठाला,
पार्थ जसा हतवीर्य तसा तो **नानाफडणिस** झाला ७१ (७३)
शोक-व्याप्ता पुण्यपुरी ती झाली, नवल कशाला ?
दुःखें **माधव**-शत्रुहि रडले, रडली यवन-प-शाला[८] ॥७२॥

---

१ असाध्य. २ प्रधान थोरले माधवराव. ३ वैद्य. ४ क्षय. ५ सवाई माधवराव. (दोन्ही माधवरावांस, सामान्यतः लोकांस मरण येतें तसें आलें नाहीं. थोरले माधवरावांस मारण्यासाठीं यमास क्षयाचें साहय घ्यावें लागलें आणि दुसऱ्या म्ह० सवाई माधवासाठीं कलीचें साहय घ्यावें लागलें. दोन माधवरावांतील हा साम्य-विरोध दर्शविण्यासाठीं येथें पूर्वार्धांत माधव-नृपतीला ह्याचे पूर्वी 'या' असें पद अध्याहृत घ्यावें. ६ बाण. ७ परमात्मा. ८ शाला = सभागृह. येथें लक्षणेनें सभेंतील मंडळी.

शक सतराशें सतरा राक्षस वत्सर आश्विनमासीं,
[1]राकातिथि ते दिवशीं झाला मुक्त भूप गुण-राशी ७३ (७४)
नंतर **नाना फडणीस** होते तीन[2] वत्सरें[3] लोकीं,
ज्ञाते चतुरशिरोमणि तेही अंतीं गेले नाकीं[4] ७४ (७४)

**१४. दुसरे बाजीराव** (वसंततिलका)

गंगातटीं वसत जो तप आचराया,
झाला [5]रसाधिपति अंतिम[6] **बाजिराया**।
होता रस-ज्ञ परि वीररसानभिज्ञ
मिष्टान्न-लोलुप जया वदतात सुज्ञ ॥७५॥ (७५)
ज्याला रुचे प्रबल-शत्रुसवें न आजि,
राजा असा बहुत कर्मठ भट्ट **बाजी**।
देखोनि त्यास बहु खिन्न मनांत झाले,
**ग्वालेरि**ला त्वरित **दौलतराव** गेले ॥७६॥ (७६)

**१५. दौलतराव शिंदे व करवीरकर छत्रपति** (शार्दूलविक्रीडित)

स्त्रींते मन्मथसा, नृपा विजयसा,[7] जो ब्राह्मणा कर्णसा,
श्रीमंतास कुबेरसा, गमतसे न्यायी जनां [8]शुक्र-सा।
नांदे सांप्रत **दौलता**ख्य सु-कृती[9] तो **जान्हवी**च्या तिरीं,
किंवा तो **करवीर** नाम नगरीं वास्तव्य शास्ता करी ७७ (७७)

—१८—

---

१ श. १७१७ आश्विन शु. १४ घ. ७—नंतर पौर्णिमा मंगळवारीं रात्रीं ७ वा. २ नाना फडणीस श. १७२१ फा. व. ३—स दिवंगत झाले. अर्थात् तीन—चे जागीं चार पाहिजे. ३ वत्सर = वर्ष. ४ स्वर्गास. ५ पृथ्वीपति. ६ शेवटला (राजा). ७ अर्जुन. ८ राजनीतीवर ग्रंथ लिहिणारा एक ऋषी. ९ दैववान्.

# चमत्कार १९

## १. प्र० अमृतरावाची छोटी राजवट (द्रुतविलंबित)

बुधजनीं नमनार्ह सुलक्षणी,
[१]नमित-शत्रु, पटू जन-रक्षणीं।
प्रथित राघव-पुत्र लवा[२]-परी,
अमृतराय रसा[३] नवरा वरी ॥१॥ (१)

शरद नामक जो ऋतु त्यामधें,
अमृतराय निघे समरा मुदें।
नति[४] तशी स्तुतिही विविध स्थलीं,
खलजनीं सुजनीं बहु जाहली ॥२॥ (१)

निजबलें अरिला भय दे रणीं,
सुरतरू-सम जो द्विज-रक्षणीं।
शिव-पदांबुजिं भक्ति धरी सदा,
[५]नयपथान्यपथा न वरी कदा ॥३॥ (३)

जनपदास[६] यदा नृप हा असे,
स्थल गदां[७] विपदांस[८] तदा नसे।
अमृतरायनृपास पित्यापरी,
समजुनी जन वागति आदरीं ॥४॥ (४)

---

१ ज्यानें शत्रूंना नमविलें आहे असा. २ लव. रामाच्या दोन जुळ्या पुत्रांपैकीं एक. ३ पृथ्वी. ४ नम्रता, शरण येणें. ५ न्याय्य मार्गाहून इतर मार्गास. ६ चरणाचा अर्थ—देशास हा राजा प्राप्त झाला असतां. ७ रोगांना. ८ दरिद्र्यांना.

**अमृतराय** असा सु-कृती परी,
धरितसे कलिभीतिस[1] अंतरीं ।
म्हणुनि राज्यसुखास दुरावला,
हरपदांबुजि षट्पद[2] जाहला ॥५॥ (५)

२. **कलिप्रभाव–इंग्रज** (भुजंगप्रयात)

कलिप्रेरिता मद्यमांसाशनांनीं[3],
धरा आक्रमीली तदा म्लेंच्छजांनीं[4] ।
नसे योग्य शास्ता[5] असें पाहुनीयां,
निघे शीघ्र गंगातटाकास जाया ॥६॥ (६)

(आर्या)

श्री**काशी**वास करी, **भागीरथि**च्या तटीं करी तप तो ।
त्यागुनि ऐहिक विषया, ज्ञानी परमार्थ-साधना जपतो ॥७॥

—१९—

१ पापप्रचुर कलियुगांत सद्धर्माचा जय होणें नाहीं, अशा प्रकारचें भय. २ भृंग. ३ दारु, मांस सेवन करणारे इंग्रज. ४ हयांतील 'जा' वृत्तार्थ योजिला आहे. ५ ह्या इंग्रजांना वठणीवर आणणारा.

# चमत्कार २०

### १. अमृतराव व बाजीराव (शार्दूलविक्रीडित)

रावोबास तनूज दोन असती, बाजी असे धाकला,
मोठा जो अमृताख्य तोच पुढती राज्यावरी बैसला।
व्याप्ता देखुनि भूमि सर्व विशिखीं[१] गोमत्स्यमांसाशनीं,
गेला टाकुनि राज्य तो, तप करी गंगातटीं जाउनी ॥१॥
त्याचा सोदर[२] बाजीराय चरमीं[३] साधीत राज्याऽसना,
दाता, कर्मठ, भू-सुर-[४]प्रिय, असे धर्मावरी वासना।
ज्याला क्षात्रगुणांश लेश नव्हता, स्वब्रह्मकर्मीं[५] रती[६]।
त्याच्या संप्रति वर्णनास कविची संवर्तली[७] भारती[८] ॥२॥

### २. कालमहिम्यानुसार हिंदुस्थानची दुरवस्था

[९]द्व्यर्थी काव्य असे मुळांत कविचें, तैसें न साधे मला,
भाषा प्राकृत, तींतही[९] निपुणता आंगीं नसे निर्मला।
जो [९]सत्यार्थ मुळांत तो ग्रथियला, [९]मिथ्यार्थ तो सोडिला
झाला अंतिम बाजि दुर्नृप, जसा उंदीर पासोडिला[१०] ॥३॥

---

१ अहिंदु, इंग्रज इ. २ चम. १३ पद्य २४ मध्यें अमृतराव दत्तक आणि बाजीराव व चिमाजी हे औरसपुत्र सांगितले आहेत. व तेंच बरोबर आहे. पण येथें सोदर म्ह० सख्खा भाऊ असें म्हटलें आहे हें उघडच विसंगत व चूक होय. ३ शेवटीं. ४ ब्राह्मण. ५ स्वतः ब्राह्मण असल्यानें आपल्या म्ह० ब्राह्मणाच्या धार्मिक कृत्यांविषयीं. ६ आवड. ७ प्रवृत्त झाली. ८ वाणी. ९ येथून पुढील वर्णन मुळांत संस्कृतांत दोन अर्थ दाखविणारें आहे. त्यांतील एक सत्य म्ह० सांगावयाचा अर्थ, व दुसरा मिथ्या म्ह० केवळ दिखाऊ अर्थ. ह्याविषयीं अधिक विवरण प्रस्तावनेंत पहा. १० येथें कवीनें

(पुढील पृष्ठावर)

(स्रग्धरा)

देशा देशत्व[१] नाहीं, उदरभर पुरें अन्न हिंदूस नाहीं,
बुद्धी हीनत्व पावे, सहज मग पुढें लोपलें सर्व कांहीं।
हा हिंदुस्थान झाला जरठ[२] मृगपती-तुल्य, त्याच्या पुढारा,
कोल्हे नाचूं निघाले, चरम नृपतिच्या मस्तकीं दोष सारा ४

झाले **नाना** व **शिंदे** चतुर[३]-रणपटू एकमेकां विरोधी,
'दोषी **बाजीच**' ऐसें प्रगट मत करूं स्पष्ट इच्छी न बुद्धी।
'हा कालाचाच आहे अनुपम महिमा' मानणें हेंच आतां,
द्या हिंदुस्थान देशा अवन[४] करिल तो काळरूपी नियंता[५] ॥५॥

## ३. दुसरे बाजीराव (उपजाति)

संपत्ति सर्वा अनुकूल ज्याला। वदान्य[६] कर्णासम जो जहाला।
द्विजातियोग्या कृति सर्व ज्याची। ज्याला असे भक्ति गजाननाची६ (१)

द्वापार[७]-धर्मी रत चित्त ज्याचें। ज्या प्रेमही ब्राह्मणपूजनाचें
संगीतवाद्यादि कलांस भोक्ता। जयास दारा[८] असती असक्ता[९] ७ (२)

---

(मागील पृष्ठावरून)

बाजीरावाच्या कृतीला उपमा दिली आहे. पण ती अर्धवट आहे. उपमान-वाक्यांत पासोडिला अनुरूप कोणतीच वस्तु सांगितली नाहीं. राज्य ही विवक्षित दिसते. १ देशवासीयांतील ऐक्यतेनें देश स्वतंत्र व समृद्ध ठेवण्या-विषयीची भावना. २ वृद्ध, म्हातारा. ३ हीं विशेषणें क्रमानें नाना व शिंदे ह्याचीं. ४ रक्षण. ५ सर्वसत्ताधीश. ६ उदार. ७ द्वापरयुगांत धर्म एक-द्वितीयांश होता व कलियुगांत तो एकचतुर्थांश आहे अशी कल्पना. ह्यामुळें कलियुगाच्या तुलनेनें द्वापरयुगांत धर्माधिक्य होतें. तात्पर्य, हा बाजीराव धर्मप्रवृत्तिप्रधान होता. ८ ह्या संज्ञेचा अर्थ पत्नी असा असून येथें प्रमादानें तो 'स्त्री' असा सामान्य अर्थानें योजिला आहे. ९ संदर्भानुसार येथें आसक्त हा अर्थ अपेक्षित आहे. अर्थात् पद्याकरतां 'असक्ता' पडलें आहे.

सदा स्वदारा प्रिय ज्या उदारा। जो त्रासला दीनजनांस थारा ।
ज्याची असे कोमल दिव्य[1] काया। होता असा अंतिम[2] बाजिराया ८(२)
तैं, मेघही वर्षति योग्य कालीं। प्रजाजनां मृत्यु नसे अकालीं,
राज्यामधें आधि[3] नसे कुणाला। असा सुखी सर्वहि देश झाला ९(३)

(भुजंगप्रयात)

प्रजामारणीं रोगही भीत होते। कसे शत्रु त्या त्रास देतील हो ते?।
अनेक प्रकारें मही देत धान्यें। भली शोभली सर्वदा उत्सवानें[4] १०(४)

### ४. बाजीरावाचा नवा राज्यकारभार (पृथ्वी)

सुराज्यविभवा पुढें उतरती कळा लागली
नृपाल-मति गुंगली नवनवी तऱ्हा काढिली।
जुने सचिव काढिले, चमु-प तेहि केले नवे,
सदा भरति-ओहटी, क्रम असा जनीं संभवे ॥११॥

(वसंततिलका)

जे पूर्विचे चमु-प ते प्रतिकूल[5] झाले,
काढून त्यांस नव सैन्य-प हूण[6] केले।
होती चमू बहुत ज्यांजवळी पदाती,
त्यांणीं रणीं नृप-मतें मथिले अराती[7] १२ (१२,१३)
राज्यावनीं चतुर भूप-मतानुवर्ती,
ज्याच्या गुणास भुलली नृप-चित्त-वृत्ती।
ऐसा नवा सचिव राघवदत्तचित्त[8],
नामें **सदाशिव**[9] जनां बहु देत वित्त १३ (१४)

---

१ तेजस्वी. २ शेवटचा. ३ मानसिक चिंता. ४ पद्यें ६–१० मध्यें आलेलें वर्णन वस्तुस्थितीला धरून नाहीं. शिवाय तें पद्य ३–५ शीं विसंवादी आहे. ५ अप्रिय वाटले. ६ इंग्रज. ७ शत्रु. ८ श्रीरामभक्त. ९ सदाशिव माणकेश्वर.

टाकुनि त्या उभयतांवर[1] सर्व राज्य,
तीर्थाटणें करित हिंडत **बाजिराज**।
आसेतु[2] सर्व फिरत्या हिमपर्वतादि[2],
तीर्थ-स्थलीं करित दान तसे जपादि ॥१४॥ (१५)

## ५. संस्कृत शिवकाव्यकर्त्यांचें वृत्त (आर्या)

तेव्हां निजानुजासह[3] कवि **पुरुषोत्तम, सदाशिवाला,** मी
द्रव्याशेनें गेलों भेटाया **पेडगांवि** तद्धामीं[4] ॥१५॥
**भीमोत्तरतटिं** निर्मळ **मुद्गलमुनिचें** असें महास्थान।
सिद्धिप्रद गणपतिचें[5] दुसरें तसेंच सर्व पापघ्न ॥१६॥ (१७)
या दोहोंच्या मध्यें मत्पूर्वज-सेव्यमान जो गांव।
लोकीं प्रसिद्ध ऐसा आहे त्या **पेडगांव** हें नांव ॥१७॥ (१७)
विद्वत्सभेंत सचिवें[6] तोषविलें मज, करोनि सत्कारा।
वदला तो नति[7] करुनी 'कवे, समस्या मदीय पूर्ण करा' १८ (१८)
सचिव **सदाशिव** याची विकट समस्या* असे बुधां मान्य।
ईशकृपें बुध-सदसीं[8] केली मी त्या क्षणींच ती पूर्ण ॥१९॥ (१९)
मत्कवन-लाघवातें[9] ऐकुनि संतोष तो सचिव पावे,
कविता-वनिता[10] पाहुनि रसिक-वराचेंच[11] चित्त झेंपावें २० (२४)

---

१ सदाशिव माणकेश्वर व इंग्रज ह्यांजवर. पण इतिहास सांगतो कीं, सदाशिव माणकेश्वरावरच राज्यभार होता. २ हिमालयापासून ते सेतु (रामेश्वर) पर्यंत. (पण इतका विस्तृत प्रवास बाजीरावानें केल्याचें इतिहास सांगत नाही.) ३ अनुज = धाकटा भाऊ गोविंदभट. ४ धामन् = वसतिस्थान. ५ सिद्धटेकचा गणपती. हें भीमानदीच्या दक्षिण तीरावर आहे. ६ सदाशिव माणकेश्वरानें. ७ नमस्कार. ८ सदस् = सभा.* ही समस्या व तिचे पूरणाचे चार श्लोक पु० सं० मध्यें दिले आहेत. ह्या श्लोकांपैकीं एक श्लोक येथें उद्धृत केला आहे. ९ काव्य करण्याचें चातुर्य. १० स्त्री. ११ झेंपावें—च असा अन्वय.

मजला आश्रित करुनी जवळी ठेवोनि घेतलें त्यांनीं,
कर्तव्य योग्य केलें, जें करणें सुजन-योग्य, दात्यांनीं २१ (२४)

"भो[1], **पुरुषोत्तम** कविवर, छत्रपतीच्या[2] समस्त वंशाचें,
आपण काव्य करावें, ऐसें इच्छी मदीय मन साचें" २२ (२५)

ऐकुनि सचिव-वचातें मज नाहीं मनुज-वर्णनीं प्रेमा,
कथुनी असें तयातें, गेलों निर्भ्रांत[3] मी स्वका धामा २३ (२६)

रात्रीं **व्यास**मुनींनीं स्वप्नीं येवोनि बोधिलें मातें,
'**श्रीशिवकाव्य** करावें, मानुं नये मनुजतुल्य भूपातें' [4]२४ (२७)

---

(मागीलवरून पुढें चालू)

( शार्दूलविक्रीडित )

अन्योरस्थलकुंकुमांकिततनुं संवीक्ष्य राधा हरिं
क्रुद्धा प्राह भवेयमस्य वशगा स्याच्चेदिदं दूतिकं ।
भानुः पश्चिमदिग्जनुः शशधरोऽखंडो हिमोऽग्निस्तथा
गंगातीरकरीरपत्रपुटके मीनं यतिः खादति ॥१॥

अन्य स्त्रीच्या वक्षःस्थलावरील केशराची उटी लागलेल्या कृष्णाला पाहून रागावलेली राधा आपल्या दूतीला म्हणते, "हे दूती, जर पश्चिमेकडे सूर्य उगवेल, अथवा चंद्र न्यूनाधिक न होतां अखंड राहील, किंवा अग्नि शीतल असेल, तसेंच गंगातीरावरील कळकाच्या कोमलांकुरपत्राच्या द्रोणांतून मत्स्य जर संन्यासी भक्षण करील तर ही मी राधा हरीला वश होईन.

१ येथें 'भो' असें निर्विसर्ग संबोधनार्थक अव्यय घेतलें आहे. ह्यापासूनच 'लोकहो' असल्या प्रयोगांतील 'हो' आलें आहे. २ श्रीशिवाजी राजे छत्रपती भोसले. ३ स्वस्थ मनानें. ४ राजा देवाचा अंश आहे. तुल्यार्थक वचन—

महती देवता ह्येषा नररूपेण तिष्ठति । मनु.

ब्रह्मा चार मुखांनीं, शेष सहस्राननें, वदे जें तें।
वदले एकमुखानें व्यासमुनीश्वर, म्हणून निरुपम ते[1] २५ (२८)

## ६. महाराष्ट्रराज्याचे त्रिमूर्ति-अंशावतार

" श्रीमच्छिवाजि पहिला, **संभाजी** हा दुजा नृपाल खरा[2]।
तिसरा **शाहू** राजा, ब्रह्मांश[3] तिघे करीं धरींति धरा[4] २६ (३०)
अंश पुढें विष्णूचे **बाळाजीविश्वनाथ**मुख[5] राजे।
**माधवरावावधि**[6] ते चार[7] दयाशील शूर बहु तेजें[8] २७ (३०)
रुद्रांश यापुढें ते नृप अंतिम-**बाजीराव**-पर्यंत।
चार,[9] असे एकादश वर्णावे त्वां त्वदीय काव्यांत ॥२८॥ (३०)

जिव्हाग्रीं मी बसतों, भीति नको, सरस काव्य होईल।
कर्तव्य साधुनीया, कीर्ति तुझी ही दिगंत जाईल ॥२९॥
वाचिति न द्वादशिला सुज्ञ पुराणिक मदीय[10] काव्यातें[10]।
**शिवकाव्या** वाचावें, त्या दिवशीं फळ मिळेल तें त्यातें " ३०(३०,३१)
ऐसें बोधुनि मातें, व्यासमुनी जाहले तदा गुप्त।
ह्या नूतन काव्याला निर्माया हाच जाहला हेत[11]* ॥३१॥ (३२)

## ७. बाजीराव व कलि (मंदाक्रांता)

इंग्रेजाचे चमुपति तदा साह्य **बाजीस** होते,
ते काढोनी चमुपति नवा **गोखले बापु** यातें।

---

१ व्यास मुनी. २ हें पद पद्यपूर्तीसाठीं आलेलें दिसतें. ३ ब्रह्मदेवाचे अंशावतार. ४ पृथ्वीला. ५ मुख = इत्यादि. ६ अवधि = पर्यंत. ७ बहु तेजें युक्त अतएव शूर. ८ बाळाजी विश्वनाथ, थो० बाजीराव, बाळाजी-बाजीराव = नानासाहेब आणि थो० माधवराव. ९ नारायणराव, स० माधवराव, अमृतराव व धाकटे बाजीराव. १० व्यासकृत महाभारत. ११ कारण. *पद्यें १५ ते ३१ हीं, त्यांत सदाशिव माणकेश्वराचा संबंध असल्यामुळें आलीं आहेत.

जेव्हां[1] केलें, मति फिरविली तें[1] कळीनें नृपाची ।
आत्मकार्यी प्रथम विघडे बुद्धि देवादिकांची[2] ॥३२॥ (३३)

दूरी केला सचिव पहिला स्थान तें दीक्षिताला[3]
बाजी भूपें अचतुरपणें दीधलें, घात केला (३४)

दीक्षीतांनीं यजन करणें वेदपाठादि कर्मे,
युद्धें ठावीं कधिं नच तया राजनीतिस्थ मर्मे ॥३३॥

## ८. बाजीरावाचें इंग्रजाशीं युद्ध (स्रग्धरा)

झाले तय्यार बापु[4]-प्रमुख भट रणा पर्वती-देव-धामीं ।
त्यांना वाटे क्षणार्धे समरिं रिपु वधूं युद्धनिष्णात आम्ही,
पक्वान्नें भक्षुनीयां प्रथित[5]-रण-कथा ऐकिल्या मात्र ज्यांनीं ।
भ्रांतीनें टाकियेल्या [6]शलभ-सम उड्या शत्रुवन्हींत त्यांनीं ३४(३५)

(आर्या)

त्या युद्धरूप यज्ञीं दीक्षित पशु इंग्रजाख्य वन्हींत ।
हुत झाला नवलचि हें, यज्ञीं पशु होमिती न दीक्षीत ३५(३६,३७)

(शालिनी)

ज्या ज्या देशीं बाजि[7]-पक्षी पळाला । त्या त्या देशीं श्येनसा शत्रु[8] गेला,
थारा नाहीं, जो मनीं फार भ्याला । इंग्रजांनीं तो असा जेर केला
॥३६॥ (३८)

---

१ ह्या अव्ययांबरोबर सांगितलेल्या गोष्टींत कार्यकारणभावाचा विपर्यास झाला आहे. मति फिरल्यामुळेंच भलता सेनापति नेमण्यांत आला हें येथें सांगावयाचें आहे. २ ह्या पद्यांत 'विशेष-सामान्य' साधल्यामुळें अर्थान्तर-न्यास हा अलंकार घडला आहे. ३ मोर दीक्षित. ४ बापू = नरहर गणेश गोखले. ५ प्रसिद्ध. ६ शलभ = दीपपतंग. ७ बाजीराव. ८ इंग्रज.

(उपजाति)

पाळीस विंचू गरुडास साप। पंचानना हस्ति भितो अपाप।
**एल्फिस्टना बाजि** तसाच भ्याला। सोडून युद्धा जल्दी पळाला
॥३७॥ (३९)

### ९. बापू गोखले मृत्यु (स्रग्धरा)

जैसा कां गोफणीचा दगड निसटतां भोरट्या[1] अंतराळीं,
तोफांच्या धूममात्रें भिउनि दशदिशा **बाजि**-सेना पळाली (४०)
भ्याला पाहून **बाजी**, सचिववर[2] तदा **गोखले-बापु**-नामा,
आणी चित्तीं विचारा, 'रिपुस नच भिणें, साधणें कार्य कर्मा' ॥३८॥
गेला युद्धांगणीं तो, परि नच टिकला **गोखले-बापु**, मेला
स्वामीकार्यार्थ युद्धीं बहु-परि लढला, स्वर्ग-लोकास गेला।
तेथें इंद्रादिकांचें अनुपम सुख त्या प्राप्त झालें अपाप,
कर्तव्या आचराया कधिं न दचकणें, जाणणें पुण्य-पाप ३९(४२-४४)

### १०. बाजीराव ब्रह्मावर्तास व इंग्रज पुण्यास (उपजाति)

सजीव होता जरि **बाजि**राजा। निर्जीव भासे जनतेस राजा।
विरक्त गेला मग जान्हवीला। तेथें[3] शिवाऽराधनिं मग्न झाला ४०
इंग्रेज तेव्हांच **पुण्यास** गेले, । संतुष्ट त्यांनीं जनतेस केलें,
म्लेंच्छादिकां[4] जिंकुनि जें मिळालें। तें राज्य त्यांच्याच करांत गेलें।
॥४१॥

---

१ ह्यास संस्कृतांत क्रौंच पक्षी म्हणतात. मराठींत रानटी चीमण्या इ. पांखरें. २ मुख्य प्रधान असलेला सेनापति बापू गोखले. ३ ब्रह्मावर्तास. ४ म्लेंच्छ (म्ह० यवन) व इंग्रज हे दोघेही आर्येतर, अनार्य म्हणून त्यांचा अभेद, व तो 'त्यांच्या च' येथील च-ने सूचित होतो.

'नाहीं झेंपत राज्यभार [१]अपणां, देहा वृथा कष्ट कां ?
आम्हीं चालउं सर्व राज्य तुमचें, चिंतेस वाहूं नका।
देऊं वेतन[२] आठ लक्ष रुपये, घेऊन राहा सुखें,'
ऐसें इंग्रज **बाजि** यास कथिती, तें त्यास माने निकें[३] ४२

(शालिनी)

ब्रह्मावर्ती तेथवां **बाजि**राया। तेव्हां[४] गेला ब्रह्मकर्मे कराया।
'गेलें सारें राज्य' हा खेद नाहीं, धिक्कारीला यामुळें सज्जनांहीं ४३

## ११. स्वराज्याचा लोप (पृथ्वी)

ख-वेद-ऋषि-भू[५]-शकीं सकल पेशवाई बुडे,
नवा पति तयाहुनी भरतभूमिला आवडे।
सुनीति-पटु धूर्त ते करिती राज्य या भूवरीं,
सुखांत जनता वदे 'श्रम करून खा भाकरी' ॥४४॥

(स्रग्धरा)

देशा देशत्व येवो, धन-कनक इहीं राज्य हें वृद्धि पावो,
काळीं मेघांबु वाहो, बुध-जन-मन ही कार्यकर्मांस लाहो।
भोळे भावीक हिंदू, परि कितिक जया मानिती मूढ हूड,
प्रेमें रक्षोत त्यांना सतत निजकृपें सातवे **एडवर्ड**! ॥४५॥

## शिवकाव्य उत्तरार्ध समाप्त

—२०—

## शिवकाव्य संपूर्ण

---

१ तुम्हांस. २ वर्षासन. ३ चांगलें. ४ येथें 'गेला, लागे' असा पाठ कल्पिल्यास बरें. म्हणजे तेथवां ह्या शब्दाच्या अर्थाची पुनरुक्ति टळेल. ५ श. १७४० = १८१८.

# सूचि

श



स



ह